सचित्र



# भारतीय उपकथा.

## ( पूर्वार्ध. )

यथा समुद्रो भगवान् यथा हि हिमवान् गिरिः ।
ख्यातावुभौ रत्ननिधी तथा भारतमुच्यते ॥

सौति.

हें पुस्तक

रा. रा. दत्तात्रय गोपाळ लिमये बी. ए.

यांनीं लिहिलें; तें



पुणें येथें

रा. रा. शंकर नरहर जोशी यांनीं

'चित्रशाळा' छापखान्यांत ( सदाशिव पेठ ८१८ ) छापून

प्रसिद्ध केलें.

आवृत्ति पहिली.

---

सन १९१३ इसवी.

---

किंमत एक रुपया.

# परिशिष्ट.

---

उत्तंकाच्या कुंडलहरणाची कथा आदिपर्वांत प्रथमतः आली असून ती पृ० ५ ते १० पर्यंत दिली आहे. पण हीच कथा आश्वमेधिक पर्व अ० ५६-५८ मध्यें बऱ्याच निराळ्या रीतीनें दिली आहे; तिचा सारांश असाः—" **गौतमऋषींस** अनेक शिष्य होते; पण त्यांत उत्तंक हा गुरुभक्ति, मनोनिग्रह, शुचिर्भूतता व मनाचा थोरपणा या गुणांत सर्वांहून वरचढ होता. **गौतमानीं** विद्या पूर्ण झाल्यावर अनेक शिष्यांस आपल्या घरीं जाण्याची अनुज्ञा दिली; उत्तंकाचे मागाहून आलेले शिष्यही विद्या संपवून परत गेले. पण उत्तंकावर गुरूचें विशेष प्रेम असल्यामुळें त्यानीं त्यास परत जाण्याची आज्ञा दिली नाहीं. याप्रमाणें चाललें असतां इतका काळ लोटला कीं, उत्तंकास गुरुगृहीं गुरुसेवा करीत असतांनाच वार्धक्य आलें. वस्तुतः याची वार्ताही उत्तंकास नव्हती ! परंतु एके दिवशीं डोकीवरून आणलेला लांकडांचा भारा, अतिशय थकल्यामुळें, उत्तंकानें एकदम आश्रमाचे आंगणांतच झुगारून दिला; त्यासरशीं त्यास अडकलेली त्याची पांढऱ्या जटेची एक बटही तुटून आली. ती पाहतांच उत्तंकास फार वाईट वाटलें. 'आपणास म्हातारपण आलें तरी आपली गुरुसेवा अजून संपत नाहीं व गुरुही आपणास अद्याप गृहस्थाश्रम करण्याची आज्ञा देत नाहींत; आपणास आतां वैवाहिक सुख कसचें मिळणार.' असा विचार मनांत येऊन उत्तंक मोठमोठ्यानें शोक करून अश्रु ढाळूं लागला. **गौतमांचे** आज्ञेवरून त्यांचे कन्येनें उत्तंकाचे अश्रु आपले ओंजळींत धरले. ही गुरुकन्या मोठी सुंदर व बांधेसूद असून तिचे डोळे फारच पाणीदार होते. उत्तंकाचे तोंडून त्याच्या शोकाचें कारण कळल्यावर **गौतमानीं** त्यास घरीं जाण्याची अनुज्ञा दिली; येवढेंच नव्हे, तर त्यास १६ वर्षांच्या वयांतलें भर तारुण्य व आपली सुंदर कन्याही देऊन कृतार्थ केलें. **गौतम** व त्यांची पत्नी अहिल्या यांस उत्तंक 'गुरुदक्षिणा काय देऊं' असें आग्रहानें विचारूं लागला. पण '**शिष्यानें आपल्या सेवेनें व वर्तनानें गुरूस संतुष्ट व प्रसन्न करणें हीच खरी गुरुदक्षिणा आहे;** निराळ्या दक्षणेची गरज नाहीं.'

असें उभयतांनीं त्यास परोपरींनीं सांगितलें; पण उत्तंक आपला हट्ट सोडीना. तेव्हां अहल्येनें त्यास सांगितलें कीं, ' सौदास राजाची पत्नी मदयंती जीं रत्नकुंडलें धारण करीत आहे, तीं गुरुदक्षिणा म्हणून मला आणून दे. ' गुरुपत्नीच्या या आज्ञेप्रमाणें उत्तंक सौदासराजाकडे गेला. हा एका ब्राह्मणाचे शापामुळें लांब दाढीमिशांचा राक्षस होऊन नरमांस भक्षण करीत वनांत हिंडत असे. राक्षसांच्या भोजनाची वेळ सायंकाळीं असते. त्यावेळीं उत्तंक जवळ येतांच सौदासराजाचे तोंडास पाणी सुटलें. पण उत्तंक त्यास म्हणाला:—' गुरुकार्याकरतां मी तुजकडे आलों आहें; तुझ्या पत्नीचीं रत्नकुंडलें मला देऊन हें माझें कार्य कर. मी गुरुपत्नीस तीं देऊन पुनः तुजकडे परत येईन; मग तूं मला खुशाल भक्षण कर. गुरुकार्य पार पडेपर्यंत तूं माझे प्राण घेऊं नको. ' उत्तंकाचें हें म्हणणें मान्य करून सौदासराजानें त्यास मदयंतीकडे पाठविलें. तिजजवळचीं हीं रत्नकुंडलें दिव्य असून त्यांतून सदोदित सोनें बाहेर पडत असे; व तीं रात्रीं नक्षत्रांप्रमाणें झळकत ! हीं धारण करणारास तहान-भूक किंवा कसलेंही भय यांची बाधा होत नसे. तसेंच हीं धारण करणाराचें वय जसें लहान मोठें असेल त्याप्रमाणें तीं लहान मोठीं होत ! असलीं हीं कुंडलें मदयंतीपासून हिरावून घेण्यास देव, यक्ष, राक्षस व नाग हे टपलेले होते. हीं कुंडलें जमिनीवर ठेविलीं तर नाग, जेवून आंचवलेल्या हातानें तीं घेतलीं तर यक्ष व तीं घेऊन कोणी निजला तर देव तीं हिरावून नेणार होते ! मदयंती हीं कुंडलें उत्तंकाचे हवालीं करण्यास कबूल झाली. पण तिनें आपल्या नवऱ्याची पटण्यासारखी खूण मागितली. उत्तंक पुनः सौदासाकडे परत आला; तेव्हां त्यानें त्यास एक खुणेचा श्लोक सांगितला. उत्तंकानें मदयंतीकडे जाऊन तो श्लोक म्हणून दाखवितांच तिनें कुंडलें त्याचे हवालीं केलीं. तीं घेऊन उत्तंकानें पुनः सौदासाकडे येऊन त्यास विचारलें कीं, ' तुझी माझी आतां मैत्री झाली आहे; तर तूं मला मित्रास योग्य असा सल्ला दे. माझें आतां इष्टकार्य झालें आहे व तूंही नरमांसभक्षक आहेस. अशा स्थितींत मीं तुजकडे परत यावें कीं नाहीं हें मला खरें खरें सांग.' यावर सौदास म्हणाला ' कीं, खरें सांगावयाचें तर तूं मजकडे पुनः येऊं नये हेंच श्रेयस्कर आहे; येशील तर खास प्राणांस मुकशील.' सौदासाचें हें म्हणणें मान्य करून मदयंतीनें सांगितल्याप्रमाणें आपल्या

कृष्णाजिनांत दिव्य कुंडलें बंदोबस्तानें बांधून घेऊन उत्तंक चालूं लागला. वाटेंत त्यास भूक लागली; तेव्हां हें कृष्णाजिन बिल्व वृक्षाचे फांदीस बांधून तो वर चढला व बेलफळें काढून खालीं टाकूं लागला. त्यानें टाकलेली कांहीं बेलफळें त्याचे कृष्णाजिनांत पडून त्याचे भारानें तें कुंडलांसह खालीं पडलें. लागलीच ऐरावत कुळांतल्या एका नागानें तीं कुंडलें घेऊन तोंडांत घातलीं व तो बिळांत पळून गेला! उत्तंकानें खालीं येऊन हातांत एक लांकूड घेतलें; व त्यानें तें बिळ तो एकसारखें खणूं लागला. पसतीस दिवसपर्यंत त्यानें असें खणलें तरी त्यास नागाचा पत्ता लागला नाहीं. 'कांहीं झालें तरी कुंडलें परत मिळेपर्यंत उद्योग सोडावयाचा नाहीं; मग त्यांत मरण आलें तरी बेहत्तर.' असा उत्तंकाचा निर्धार पाहून इंद्रानें आपल्या वज्राची सर्व शक्ती उत्तंकाचे दांडक्यांत घातली. तेव्हां त्याचे प्रहारानें पृथ्वी विदीर्ण होऊन नागलोकचा रस्ता त्यास खुला झाला. तेथील घरें सोनें, मोतीं व रत्नें यांचीं बनविलीं असून स्फटिकाच्या पायऱ्यांच्या विहिरीही तेथें होत्या. या नागलोकाचें महाद्वार तर शंभर योजनें लांब व पांच योजनें रुंद होतें! नागलोकांत आपण आलों, तरी आपलीं कुंडलें कोणत्या नागानें नेलीं, हें आपणास कसें कळणार? अशी विवंचना उत्तंक करीत आहे; तोंच तेथें एक पांढऱ्या शेपटीचा काळा घोडा आला. त्याचे तोंड व डोळे लाल असून तो अत्यंत तेजस्वी होता. हा त्याच्या गुरूचाच पेटविलेला पवित्र अग्नि असून तोच त्याचे साहाय्यार्थ तेथें आला होता. त्याचे सांगण्यावरून उत्तंकानें त्याचे अपानद्वारांतून फुंकलें, तेव्हां हा अग्नि अतिशय भडकला; त्याचे रोमरंध्रांतून धुक्याप्रमाणें अतिशय दाट असा धूर निघूं लागला. हा धूर सर्व नागलोकभर पसरून त्यांस कांहींच दिसेनासें झालें! तेव्हां सर्व नाग उत्तंकास शरण आले, आणि त्याचीं कुंडलें त्यास परत देऊन नागांनीं त्यास प्रसन्न केलें. उत्तंकानेंही परत येऊन तीं दिव्य कुंडलें गुरुपत्नीस आनंदानें अर्पण केलीं."

———

# चित्राची अनुक्रमणिका.




| चित्रांचीं नांवें. | पृष्ठ. |
|---|---|
| १ परीक्षित राजा आपला जीव वांचविण्याची धडपड करूं लागला. | ३८ |
| २ ' माझे सर्व राज्याची तूंच स्वामिनी हो; व मजशीं गांधर्वविवाह कर. ' | ५० |
| ३ ' धर्मतः तुझें माझें भाऊबहिणीचें नातें आहे. ' | ६७ |
| ४ ' तूं नरमांसभक्षक राक्षस होऊन पृथ्वीवर भटकत राहशील. ' | ९७ |
| ५ सुंदानें तिलोत्तमेचा उजवा व उपसुंदानें डावा हात धरला. | ११२ |
| ६ दमयंती व नल यांस परस्परांची मनोमय ओळख पटली. | १३३ |
| ७ त्यानें अर्धवस्त्र नेसलेली व जमिनीवर निजलेली दमयंती पाहिली. | १४५ |
| ८ दमयंतीनें नलास घट्ट मिठी मारली. मुखपृष्ठ. | १७९ |
| ९ जनस्थानांत घडलेली सर्व हकीकत शूर्पणखेनें रावणास सांगितली. | २६७ |
| ० सीतेला प्रतिबंध करून लक्ष्मण तिला म्हणाला. | २६९ |
| १ ' तुझी इच्छा असेल तिकडे तूं जा. | २९४ |
| २ प्रत्यक्ष यमधर्म सावित्रीस दिसला. | ३०२ |
| ३ सावित्री सत्यवानास सांवरून घेऊन चालली. | ३०६ |




# प्रस्तावना.

‘ भारतीय युद्धा ’ च्या दुसऱ्या आवृत्तीचे प्रस्तावनेंत दोन वर्षांपूर्वी वचन दिल्याप्रमाणें ‘ भारतीय उपकथां ’ चा हा पूर्वार्ध महाराष्ट्रांतील तरुण विद्यार्थिवर्गास आज सादर करीत आहें. चोवीस हजार श्लोकांचें मूळचें भारत बहुतांशीं उपकथांमुळेंच १ लक्ष श्लोकांचें महाभारत झालें असल्यामुळें या सर्व उपकथा सारांश रूपानें देऊं म्हटलें असतें, तरीही हें कार्य एका भागांत संपणें अशक्य झालें असतें; आणि हें जाणूनच भारतीय उपकथांचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग केले असून पूर्वार्ध आज महाराष्ट्रीय वाचकांचे हातीं देत आहे. महाभारतांतील उपकथांचें सामान्यतः पुढील चार प्रकारानें वर्गीकरण करतां येईल:— १ ऐतिहासिक, २ पौराणिक, ३ नैतिक व ४ धार्मिक. ऐतिहासिक उपकथांत एकाद्या प्राचीन पुरुषाचें चरित्र किंवा प्रसंगाचें वर्णन दिलेलें असतें; ( उदा० वनपर्वांतील रामोपाख्यान ). पौराणिक कथांमध्यें ( mythological) पौराणिक पुरुष किंवा प्रसंग वर्णिलेला असतो; ( उदा० कर्णपर्वांतील त्रिपुराख्यान ). नैतिक उपकथांत एकाद्या सामान्य नीतितत्त्वाचा आणि धार्मिक उपकथांत एकाद्या धर्मतत्त्वाचा सोदाहरण उपदेश केलेला असतो. ( उदा० वनपर्वांतील शिबिराजाची कथा व मुद्गलचरित्र ). उपकथांचे जे हे चार वर्ग केले आहेत, ते केवळ स्थूल दृष्टीनें केलेले आहेत. ह्या उपकथांत निवळ ऐतिहासिक, निवळ पौराणिक, निवळ नैतिक किंवा निवळ धार्मिक अशा कथा फारच थोड्या आहेत. ऐतिहासिक कथेंतही पौराणिकत्वाचें थोडेंबहुत मिश्रण असून त्यांत धर्मनीतिबोध मुळींच नसतो, असेंही नाहीं; व पौराणिक कथांचे मुळाशींही ऐतिहासिक सत्य असून त्यांत धर्मनीतिबोधाचाही अंश बहुधा असतो. नैतिक व धार्मिक उपकथांचाही प्रकार असाच आहे. तथापि उपकथा प्राधान्यें करून ऐतिहासिक, पौराणिक, नैतिक किंवा धार्मिक यांपैकीं जशी असेल तशी ती त्या त्या वर्गांत घालून वरील वर्गीकरण केलेलें आहे. नैतिक व धार्मिक उपकथांचें मुख्य भांडार शांति व अनुशासन या दोन पर्वांत असून त्यांतील सर्व उपकथा आणि इतर पर्वांतील नैतिक व धार्मिक स्वरूपाच्या पांच सात कथा उत्तरार्धाकरतां ठेवून महाभारताच्या इतर पर्वांतील बहुतेक सर्व ऐतिहासिक व पौराणिक कथा या

पूर्वार्धांत दिल्या आहेत. भारतीय युद्धाच्या दुसऱ्या आवृत्तीप्रमाणेंच यांतही निरनिराळ्या प्रसंगांचीं १३ चित्रें व प्राचीन भरतखंडाचा नकाशा हींही घातलीं आहेत.

गोष्टी सांगण्याची व ऐकण्याची प्रवृत्ति, मानव जातीस फार प्राचीनकाळीं समाजाचें स्वरूप येऊं लागल्यापासून, सर्व देशांत व सर्व काळीं एकसारखी चालू आहे. या गोष्टींमध्यें दोन प्रकारच्या पुरुषांचें चारित्र किंवा त्यांचे चरित्रांतील एकादा प्रसंग वर्णिलेला असतो. आपापल्या गुणांनीं मनुष्यजातीस एक अत्यंत उच्च व अनुकरणीय असें उदाहरण किंवा ध्येय दाखवून देणाऱ्या पौराणिक, ऐतिहासिक अगर काल्पनिक महापुरुषाचें चारित्र वर्णिलेलें असतें, हा एक प्रकार; आणि असल्या उच्च ध्येयाकडे दृष्टि देऊन संसारमार्ग आक्रमण करीत असतां पुराणें, इतिहास अगर वर्तमानकाल यांतील खऱ्याखुऱ्या किंवा कथारचना करणाऱ्याच्या कल्पनेनें निर्माण केलेल्या सामान्य मनुष्यांस अनेक प्रकारच्या मायामोहांशीं कसें झगडावें लागलें किंवा लागतें याचें वर्णन केलेलें असतें, तो दुसरा प्रकार. पहिल्या प्रकारच्या गोष्टींतील पुरुषांकडे श्रोता किंवा वाचक आदराच्या व पूज्यभावाच्या नम्र दृष्टीनें पाहतो; व दुसऱ्या प्रकारच्या गोष्टींतील पुरुष श्रोत्यांशीं किंवा वाचकांशीं समस्थानीय असल्यामुळें त्यांकडे तो सहानुभूतीच्या किंवा स्वानुभवाच्या सोत्कंठ दृष्टीनें पहात असतो. अशा प्रकारच्या गोष्टींवरील मनुष्य जातीचें प्रेम इतकें विलक्षण आहे कीं, मानवी मनोवृत्ति आरोपित केलेल्या पशु-पक्ष्यांच्याही गोष्टी तो अत्यंत आवडीनें ऐकत किंवा वाचीत असतो. अरेबियन नाइट, इसापनीति, पंचतंत्र इत्यादि कथाग्रंथ सर्व भाषांत भाषांतर होऊन सगळ्या जगाच्या आदरास पात्र झाले आहेत, आणि सांप्रतही सर्व देशांतील सामान्य वाचकांचा भर कादंबऱ्या, गोष्टी आणि चरित्रें यांजवरच विशेष असतो, याचें बीज तरी वरील सर्वसामान्य मानवी मनोवृत्तींतच आहे.

महाभारतांतील उपकथांचा विशेष हा आहे कीं, त्यांत ऐतिहासिक, पौराणिक व काल्पनिक अशा तिन्ही प्रकारच्या गोष्टींचें स्वारस्य, अरेबियननाईटचें अद्भुत रम्यत्व, आणि इसापनीति, पंचतंत्रादिकांचा सुलभ नीतिबोध हीं सर्व एकवटलीं आहेत; येवढेंच नव्हे तर ह्या गोष्टी भारतीय आर्यांच्या राष्ट्रीय संस्कृतीशीं व परंपरेशीं अगदीं एकजीव झालेल्या असल्यामुळें महाराष्ट्रीय तरुणांचा त्यांशीं निकट

परिचय होणें अत्यंत अगत्याचें आहे. इंग्रजी विद्याप्रचाराशीं फारसा संबंध नसलेल्या स्त्री-पुरुष समाजास कथांचा परिचय अद्यापही कथा-पुराणांचे द्वारें थोडाबहुत होत असतो. पण इंग्रजी शिक्षण-पद्धतीच्या भोंवऱ्यात पुरते सांपडलेल्या विद्यार्थिवर्गास इंग्रजीशाळा-कॉलेजांत पोपच्या ईलियडेचें किंवा मिल्टनच्या पॅराडाइज लॉस्ट काव्याचें अध्ययन करणें भाग पडत असल्यामुळें ग्रीक व ख्रिस्ती पुराणांतील (Mythology) अनेक पुरुषांची माहिती करून घेऊन ती ध्यानांत ठेवावी लागते. पण ह्याच विद्यार्थ्यांस आमच्या पौराणिक वाङ्मयाशीं प्रत्यक्ष परिचय होण्याची मात्र संधी मिळत नाहीं; एवढेंच नव्हे, तर त्यांच्या या अज्ञानांत ' पुराणें हीं निवळ शिमगा किंवा उकिरडा आहेत ' अशी आत्मघातक दुराग्रहाची कित्येकांकडून भरही घालण्यांत येते ! शाळा-कॉलेजांतील विद्यार्थ्यांस संस्कृत वाङ्मयाचा परिचय मुळींच नसतो असें नाहीं; पण तो भारत, रामायण, व पुराणें यांखेरीज अन्य वाङ्मयाचा मात्र आजपर्यंत झाला असल्यामुळें मूळ भारत व रामायण यांतील कथांची त्यांस बहुधा मुळींच माहिती नसे. पण अलीकडे विश्वविद्यालयीन अधिकाऱ्यांच्या वृत्तींत इष्ट फरक पडला आहे ही समाधानाची गोष्ट होय. पी. ई. परीक्षेच्या संस्कृत विषयांत यंदा महाभारतांतील नलोपाख्यान व सावित्र्युपाख्यान व पुढील सालीं वाल्मीकिरामायणाच्या बालकांडांतील कांहीं भाग नेमला आहे, हें या पालटलेल्या वृत्तीचें उत्तम दर्शक आहे.

इंग्रजी शिक्षणामुळें नवीन आलेल्या चिकित्सक दृष्टीनें जरी ह्या कथा कोणीं वाचल्या तरी त्यांचें मन मोहविणारे व आनंदविणारे प्रसंग यांत बरेच सांपडतील. महाभारतांतील नल-दमयंतीचरित्रांत मन भारून टाकण्याचें व हृदयवृत्ति उचंबळून आणण्याचें केवढें सामर्थ्य आहे याचा प्रस्तुत लेखकास अनेकदां अनुभव आला आहे; व म्हणूनच त्यानें ही गोष्ट बहुतेक मुळाबरहुकूम व विस्तारानें या पुस्तकांत दिली आहे. महाभारतकारांच्या या उपाख्यानास, कथारचनाकौशल्य, कथेंतील भिन्नभिन्न प्रसंग मूर्तिमंत डोळ्यांपुढें उभे करण्याचें चातुर्य, अनेक कोमल व सूक्ष्म मनोवृत्तींचें स्पष्ट चित्र रेखाटल्याची हतोटी, अत्यंत शुद्ध व उच्च असें दांपत्य-प्रेम, करुणरसपरिपाक यांपैकीं कोणतीही एक किंवा सर्व कसोट्या लावून पहा; इच्या तोडीची हृदयंगम कथा जगांतील कोणत्याही प्राचीन व अर्वा-

चीन वाङ्मयांत आढळणार नाहीं, असा प्रत्यय सहृदय वाचकास आल्यावांचून राहणार नाहीं. अकबराचे वेळीं **महाभारताचें फारशींत** भाषांतर झालेंच; पण त्या काळच्या एका **संस्कृतज्ञ** फारशी पंडितानें **महाभारतांतील** ही कथा **विशेष** आदरानें व प्रेमानें हातीं घेऊन तिचे आधारें '**नलदामन्**' नांवाचें उत्कृष्ट **फारशी** काव्य निर्माण केलें, यावरूनही वरील गोष्टच सिद्ध होते. करारी व तामसी गुरु आणि गुरुभक्त पण स्वाभिमानी शिष्य यांचीं स्वभावचित्रें व भाषणें एकाद्या उत्कृष्ट नाटककाराच्या कुशलतेनें अंबोपाख्यानांत देतांना **महाभारत**-कारांनी कशी बहार केली आहे, हेंही चिकित्सकांनीं पाहण्यासारखें आहे. सारांश, अशा प्रकारच्या मनोहर व चटकदार प्रसंगांनीं युक्त असलेल्या ६० कथा, महाराष्ट्रीय तरुणांस मनोरंजन, बोध आणि आर्यांच्या ऐतिहासिक व पौराणिक परंपरेचें ज्ञान यांचा लाभ व्हावा ह्या हेतूनें, या भागांत देऊन तो आज त्यांचे हातीं देत आहें. वैशंपायनानें ग्रंथाचे अखेरीस **भारताची** जी महती वर्णन केली आहे, ती त्याचेच शब्दांत देऊन व ही महती यथार्थ आहे असा अत्यल्प तरी प्रत्यय हें पुस्तक वाचून वाचकांस येईल अशी उमेद बाळगून ही प्रस्तावना पुरी करतों.

**भारतं शृणुयान्नित्यं भारतं परिकीर्तयेत् ।**
**भारतं भवने यस्य तस्य हस्तगतो जयः ॥**
**भारतं पावनं पुण्यं भारते विविधाः कथाः ।**
**भारतात्प्राप्यते मोक्षो भारतं परमं पदम् ॥**

सोमवार,
आषाढी एकादशी, शके १८३५.
७१५ सदाशिवपेठ, पुणें शहर.

**दत्तात्रय गोपाळ लिमये.**

# अनुक्रमणिका


उपकथा. पृष्ठें.

१ **धौम्यगुरु व त्यांचे तीन शिष्य.** ... ... १–४

आरुणीची परीक्षा १; उपमन्यूची परीक्षा २–४; वेदाची परीक्षा ४.

२ **वेद व त्यांचे तीन शिष्य.** ... ... ५–१०

उत्तंकाची सत्वपरीक्षा ५; उत्तंक कुंडलें आणण्यास जातो ६; उत्तंक व पौष्यराजा ७-८; उत्तंकाचें नागलोकीं गमन ९; गुरुपत्नीस तो कुंडलें देतो १०.

३ **च्यवन भार्गव व रुरु.** ... ... ... ... ११–१६

भृगु व पुलोमा ११; च्यवनजन्म १२; अभिशाप १३; च्यवनांचा नातू रुरु व प्रमद्वरा यांचा विवाह १४।१५; रुरु व सहस्रपात् ऋषि १६.

४ **जरत्कारुऋषीचा विवाह व आस्तिकजन्म.** १७–१९

जरत्कारूचे पूर्वज १७; जरत्कारूचा विवाह १८; आस्तिक-जन्म १९.

५ **समुद्रमंथन.** ... ... ... ... ... २०–२१

६ **कद्रु व विनता.** ... ... ... ... २२–३८

कद्रु व विनता यांचा सवतीमत्सर २२; त्यांचें भांडण २३-२४; विनतेचें दासीत्व २५; गरुड अमृत आणण्यास निघतो २६; गरुड, हत्ती व कूर्म २७; गरुड व देव यांचें युद्ध ३०; अमृतहरण ३१; विनतेची मुक्तता ३२; शेषनाग कद्रूचा शाप व नागांची चिंता ३३; संरक्षणाची युक्ति ३४.

७ **परीक्षितराजाचा वध.** ... ... ... ... ... ३४–३९
परीक्षित व शमीकऋषि ३४; शृंगीचा शाप ३५; राजाची चिंता व एकखांबी वाडा ३६-३७; मंत्रवेत्ता काश्यप व तक्षक ३७; परीक्षिताचा वध ३८.

८ **सरमेचा शाप.** ... ... ... ... ... ३९–४२
जनमेजयाचें दीर्घसत्र ३९; सरमेचा शाप ४०; सर्पसत्राचा निश्चय व तयारी ४१-४२.

९ **सर्पसत्र,** ... ... ... ... ... ... ४२–४५
सर्पसत्रास अपशकुन ४२; अस्तिकागमन ४३; तक्षकाचें संरक्षण ४४.

१० **शकुंतला चरित्र.** ... ... ... ... ४५–६१
दुष्यंताची मृगया ४५; कण्वांचें तपोवन व आश्रम ४६-४७; शकुंतलादर्शन ४८; शकुंतलेची जन्मकथा ४९; उभयतांचा गांधर्वविवाह ५०-५१; कण्व व शकुंतला यांचें भाषण ५१-५२; सर्वदमन-जन्म ५२; शकुंतलेचें हस्तिनापुरास आगमन ५३; दरबारांतील प्रसंग ५३-५४; भार्या व पुत्र यांची योग्यता ५५-५६; दुष्यंतानें केलेला धिःकार ५७; शकुंतलेचें उत्तर ५८-५९; आकाशवाणी व शकुंतलेचा स्वीकार ६०-६१.

११ **देवयानी, शर्मिष्ठा व ययाति.** ... ... ... ६२–८१
देवदानवांची स्पर्धा ६२; कचाची गुरुसेवा ६३; कचाचा वध व संजीवन ६४; शुक्रांचा निर्बंध ६५; कच-देवयानी-संभाषण ६६-६७; देवयानी व शर्मिष्ठा यांची जलक्रीडा व भांडण ६७-६८; बापलेकींचा संवाद ६९; शुक्राचा क्रोध ७०; देवयानीचें समाधान ७१; देवयानी व ययाति, ययातीची जन्मकथा ७२-७३; देवयानी-ययाति-विवाह ७४; शर्मिष्ठेचा गांधर्व-विवाह व पुत्रोत्पत्ति

७५-७६; गौप्यस्फोट ७७; शुक्र-शाप व ययातीचें वार्धक्य ७८; ययातीची पुत्रपरीक्षा ७९; ययातीचें वन-गमन ८०; ययातीचें पतन व पुनःस्वर्गप्राप्ति ८१.

१२ **उतथ्य-पुत्र दीर्घतमा.** ... ... ... ... ८२–८४
उतथ्यपत्नी ममता व बृहस्पति ८२; दीर्घतमा व प्रद्वेषी यांचें भांडण ८३; दीर्घतम्याचा त्याग व बलिराजा ८४.

१३ **अणीमांडव्य उपाख्यान.** ... ... ... ८५–८७
मांडव्यावर चोरीचा आळ ८५; सुळावरील चमत्कार ८६; मांडव्याचें पातक ८७.

१४ **व्युषिताश्व राजा.** ... ... ... ... ... ८७–८८
व्युषिताश्वाचें भद्रेवरील प्रेम ८७; त्याचा मृत्यु व भद्रेस पुत्रप्राप्ति ८८.

१५ **श्वेतकेतुमुनि.** ... ... ... ... ... ८९
श्वेतकेतूच्या मातेचा कामाचार व श्वेतकेतूनें घातलेली स्त्री-धर्माची मर्यादा ८९.

१६ **तपती व संवरण.** ... ... ... ... ... ९०–९२
तपती व संवरण यांची प्रथम भेट ९०; संवरणाचा शोक व तपतीनें केलेलें सांत्वन ९१; उभयतांचा विवाह, दुष्काळ व संवरणाचें पुनरागमन ९२.

१७ **वसिष्ठ व विश्वामित्र.** ... ... ... ... ९३–१०३
विश्वामित्र कामधेनु मागतो ९३; नंदिनीच्या हरणाचा प्रयत्न ९४; विश्वामित्राचा पराजय ९५; कल्माषपाद व शक्ति यांचा तंटा ९६; शक्तीचा शाप व कल्माषपादाचें पातक ९७; कल्माषपाद राक्षस वसिष्ठपुत्र मारतो ९८; वसिष्ठांचें दुःख ९९; कल्माषपादाची शापमुक्तता १००; मदयंतीचे पोटीं नियोगविधीनें पुत्रोत्पत्ति १०१; पराशर-जन्म १०२; राक्षससत्र १०३.

१८ **और्व-उपाख्यान.** ... ... ... ... ... १०४-१०८
कार्तवीर्यांनीं केलेलें भार्गवद्रव्यहरण १०४; और्वजन्म व कार्तवीर्यांचें अंधत्व १०५; और्वांचा क्रोध व क्षात्रियसंहार १०६; और्वांची क्रोधमीमांसा १०७; वडवानलोत्पत्ति १०८.

१९ **सुंद व उपसुंद.** ... ... ... ... १०८-११३
सुंदोपसुंदांची तपश्चर्या व वरप्राप्ति १०९; त्यांचा पराक्रम व विजय ११०; तिलोत्तमेची उत्पत्ति १११; दैत्यबंधूंचें युद्ध व मरण ११२-११३.

२० **श्वेतकीराजा व अग्निजाड्य.** ... ... ... ११३-११४
श्वेतकीराजाची यज्ञप्रीति ११३; बारा वर्षांचा यज्ञ, अग्निजाड्य व सातदां खांडव-वनदहन ११४.

२१ **शार्ङ्गक-उपाख्यान.** ... ... ... ... ११५-१२१
मंदपालऋषि व त्याच्या दोन स्त्रिया ११५; खांडववनदहन व जरितेची चिंता ११६; जरिता व तिचे चार पुत्र यांचा संवाद ११७-११८; मंदपालाचा शोक व लपितेचा टोमणा ११९; मायलेकांची व पतिपत्नींची भेट १२०-१२१.

२२ **नीलराजा व अग्नि.** ... ... ... ... १२२
नीलराजकन्या व अग्नि आणि उभयतांचा विवाह. १२२.

२३ **शाल्ववध.** ... ... ... ... ... १२३-१२८
शाल्वाचा द्वारकेस वेढा १२३; शाल्व-यादवयुद्ध १२४-१२५; श्रीकृष्णाची सौभनगरावर स्वारी व युद्ध १२६-१२७; सौभनगर भेद व शाल्ववध १२८.

२४ **नलदमयंती चरित्र.** ... ... ... ... १२९-१८४
भीमराजाची संतति व नल-दमयंतींचा प्रेमांकुर १२९; हंसाचें नल-दमयंतींशीं भाषण १३०; दमयंतीची उत्कंठा व स्वयंवरोपक्रम १३१; नल लोकपालांचा दूत होतो

१३२; **नल-दमयंतीसंभाषण** १३३-१३५; स्वयंवर १३६-१३७; **कलिप्रवेश** व द्यूत १३८-१३९; **दमयंतीची** चिंता १३९-१४०; **नल-दमयंतीचा** वनवास १४१; **नलाचें** वस्त्रहरण १४२; **नल-दमयंतीसंभाषण** १४३-१४४; धर्मशाळेंतील भयंकर प्रसंग १४५-१४६; **दमयंतीचा** हृदयभेदक शोक १४७-१४८; अजगर व व्याध १४८-१४९; **दमयंतीचा** शोक १५०; वैश्यांचा तांडा व त्याची वाताहात १५१-१५३; **दमयंती चेदी** देशाचे राजधानीस येते १५४; व राजवाड्यांत राहते १५५; **नल** व **कर्कोटक** नाग १५६; **नलाचें** अयोध्येस आगमन १५७; **नलाचा** शोक १५८; **दमयंतीचा** शोध १५९; **दमयंतीची** ओळख पटते १६०-१६१; **दमयंती** माहेरीं येते १६२; **नलाचा** शोध १६३; **बाहुकाचा** जबाब. १६४ **दमयंतीची** उत्कंठा १६५; **दमयंती**स्वयंवरार्थ **ऋतुपर्ण** व **बाहुक** निघतात १६६-१६७; मार्गक्रमण व कलिमोक्ष १६८-१७०; रथ राजवाड्यांत येतो १७१; **बाहुकाची** परीक्षा १७२; **बाहुक-केशिनी**संवाद १७३-१७४; मुलांची भेट १७५; **नल-दमयंतीचें** संभाषण व भेट १७६-१७८; **कुंडिनपुरांतील** आनंद १८०; **नलाचें निषधदेशीं** गमन १८१; पुनः द्यूत १८२; राज्यहरण १८३; कथेचें रहस्य १८४.

२५ **अगस्त्य-चरित्र.** ... ... ... ... १८५-१८८

**अगस्त्य-लोपामुद्रा** विवाह १८५; **लोपामुद्रेची** हौस १८६; अगस्त्य दैत्यराज इल्वलाकडे जातात १८७; **वातापीचा** नाश व अगस्त्यास पुत्रप्राप्ति १८८.

२६ **वृत्रासुर-वध.** ... ... ... ... ... १८९-१९३

**देव-दैत्य** युद्ध व **दधीचऋषींस** प्रार्थना १८९; वज्रनिर्मिति व **वृत्रवध १९०; कालकेयांचा** धुमाकूळ १९१;

अगस्त्यांचें समुद्रशोषण १९२; कालकेयांचा संहार १९३.
२७ भगीरथ-चरित्र. ... ... ... ... ... १९३-१९८
सगर-राजाचें तप १९३; सगरास पुत्रप्राप्ति व अश्वमेध १९४; सगरपुत्रांचा नाश १९५; असमंज व अंशुमान १९६; दिलीपपुत्र भगीरथाची तपश्चर्या १९७; गंगावतरण १९८.
२८ ऋष्यशृंग व लोमपाद. ... ... ... ... १९९-२०५
विभांडक व त्यांचा पुत्र ऋष्यशृंग १९९; अंगदेशांतील दुष्काळ व लोमपादराजानें योजलेला उपाय २००; तरुण वेश्या व ऋष्यशृंग २०१-२०२; ऋष्यशृंगानें केलेलें वेश्येचें वर्णन २०३; विभांडकानें केलेली समजूत व ऋष्यशृंगविलोभन २०४; ऋष्यशृंगाचा शांतेशीं विवाह २०५.
२९ जामदग्न्य चरित्र. ... ... ... ... २०६-२१०
कार्तवीर्याचा उद्दामपणा २०६; चरूची अदलाबदल २०७; परशुरामाचा जन्म व परीक्षा २०८; परशुरामास वरप्राप्ति व कार्तवीर्यकृत जमदग्निवध २०९; परशुरामाची प्रतिज्ञा व क्षत्रिय-संहार २१०.
३० च्यवन-चरित्र. ... ... ... ... ... २११-१५
च्यवन आणि सुकन्या २११; च्यवन-शाप व सुकन्याविवाह २१२; अश्विनीकुमारांची पापवासना व फजिती २१३; अश्विनीकुमारांचें सोमप्राशन २१४-२१५.
३१ सोमक-चरित्र. ... ... ... ... ... २१६-२१८
सोमकपुत्र जंतु २१६; पुत्रप्राप्त्यर्थ यज्ञ व नरकप्राप्ति २१७।२१८.
३२ शिबिराजाची कथा. ... ... ... ... २१८-२२०
शिबि-श्येनसंवाद २१८-२१९; शिबीची सत्वपरीक्षा २२०.
३३ अष्टावक्रचरित्र. ... ... ... ... ... २२१-२२६

कहोडपुत्र अष्टावक्र २२१; अष्टावक्र व श्वेतकेतु यांचें भांडण २२२; अष्टावक्र व श्वेतकेतु जनकाकडे जातात २२३; बंद्याशीं वाद २२४; बंद्याचा पराजय व शिक्षा २२५।२२६.

३४ यवक्रीतचरित्र. ... ... ... ... ... २२६–२३३
भारद्वाज व रैभ्य आणि त्यांचे पुत्र २२६; यवक्रीतास वेदप्राप्ति २२७; यवक्रीतगर्व व कामवासना २२८; यवक्रीताचा वध २२९; भारद्वाजांचा शोक व शापवाक्य २३०; रैभ्यवध व अर्वावसूचे तप २३१; यवक्रीत, भारद्वाज व रैभ्य यांचे पुनरुज्जीवन २३२.

३५ निवातकवचवध. ... ... ... ... २३३–२३६
अर्जुनाची निवातकवचांवर स्वारी २३३; युद्ध व निवातकवचांचा संहार २३४; पौलोम व कालकेय दैत्यांशीं युद्ध व त्यांचा नाश २३५-२३६.

३६ वैवस्वतमनुचरित्र. ... ... ... ... २३६–२३८
मनु व मत्स्य २३६; मत्स्याची वाढ व जलप्रलय २३७; नौबंधन २३८.

३७ परिक्षित व वामदेव. ... ... ... ... २३८–२४३
परिक्षिताचा विवाह २३८; त्याची पत्नी विहिरींत अदृश्य होते २३९; मंडूककन्या सुशोभना हिची हकीकत २४०; शलराजा व वामदेवांच्या घोड्या २४१; शलाचा वध व दलाची फजिती. २४२; त्याचा पश्चात्ताप व वामदेवांचा आशीर्वाद २४३.

३८ धुंधुमार व कुवलाश्व. ... ... ... ... २४३–२४६
कुवलाश्व व त्याचे पुत्र २४३; उत्तंकऋषींनी सांगितलेली धुंधुमाराची हकीकत २४४; धुंधुमार व कुवलाश्व यांचें युद्ध २४५; धुंधुमारनाश २४६.

३९ **कार्तिकेयचरित्र.** ... ... ... ... २४७–२५६

इंद्र व केशिदैत्य २४७; देवसेना व दैत्यसेना २४८; अग्नि व ऋषिपत्न्या २४९; अग्नि व स्वाहा यांचा समागम, स्कंदजन्म २५०; ऋषिपत्नींचा त्याग २५१; स्कंद व विशाख २५२; स्कंदाभिषेक व देवसेनापाणिग्रहण २५३; स्कंद-माता २५४; स्कंद व दैत्य यांचें युद्ध आणि महिषासुरवध २५५-२५६.

४० **मुद्गलचरित्र.** ... ... ... ... ... २५७–२६०

मुद्गलाची उंच्छवृत्ति व दुर्वास २५७; मुद्गलास वरप्राप्ति २५८; दानमहात्म्य-स्वर्गसुखाचें वर्णन २५८; मुद्गलाची दूरदृष्टि २५९.

४१ **श्रीसीता-रामचरित्र.** ... ... ... ... २६१–२९६

पुलस्त्यसंतति २६१; रावण, कुंभकर्ण व बिभीषण यांचें तप व वरप्राप्ति २६२-२६३; रावणवधाची तयारी व रामादिकांचे जन्म २६४; कैकेयीचा हट्ट २६५; रामांचा वनवास व भरतकृत कैकेयी-निर्भर्त्सना २६६; शूर्पणखेचें पारिपत्य व रावणक्रोध २६७; रावण-मारीच-संवाद २६८; मारीचाची माया २६९; सीतेचें कठोर भाषण २७०; सीताहरण २७१; जटायूचा मृत्यु २७२; विश्वावसुगंधर्व व रामशोक २७३; सुग्रीवसख्य २७४; वालिवध २७५; सीतेचा छल २७६; त्रिजटेनें केलेलें सांत्वन २७७; सीतारावणसंवाद २७७-२७८; लक्ष्मण व सुग्रीव यांचें भाषण २७९; हनुमानादिकांची सीताशोधार्थ रवानगी २८०; हनुमानाचें आगमन २८१; व त्यानें सांगितलेली हकीकत २८२; लंकेवर स्वारी २८३; सेतुबंध २८४; अंगदशिष्टाई २८५; राम-रावणयुद्ध २८६; २८७; कुंभकर्णवध २८८; इंद्राजितवध २८९-२९१;

अविंध्याची युक्ति २९१-२९२; रावणयुद्ध व त्याचा वध २९३; सीतेची परीक्षा २९४; सीतेचा स्वीकार २९५; रामांचें पुनरागमन २९६.

४२ **सावित्री-चरित्र.** ... ... ... ... ... २९७-३०८

सावित्रीचें वरशोधन; २९७; सावित्री-नारदसंवाद २९८; सावित्री-सत्यवानविवाह २९९; सावित्रीचें त्रिरात्रव्रत ३००; सावित्री-सत्यवान वनांत जातात ३०१; सत्यवानाचा मृत्यु ३०२; सावित्री-यमसंवाद ३०३-३०४; सत्यवान-संजीवन ३०५; सत्यवानाच्या मात्यापित्याचा शोक ३०६; सावित्रीसत्यवानाचें आगमन व आनंद ३०७; पुन: राज्याची व संततीची प्राप्ति ३०८.

४३ **इंद्र व नहुष.** ... ... ... ... ... ३०९-३१९

त्रिशिराऋषीचा वध ३०९; वृत्रासुरजन्म ३१०; वृत्र-ऋषिसंवाद ३११; वृत्राची अट व वृत्रवध ३१२; नहुषाची इंद्रपदप्राप्ति व इंद्राणीविषयीं अभिलाष ३१३; नहुषानें केलेला देवांचा धिक्कार ३१४; देवांची युक्ति ३१५; इंद्राणी व इंद्र यांची भेट ३१६; इंद्राणीचें नहुषाशीं मायावी भाषण ३१७; नहुषाचा उन्मत्तपणा व इंद्र-प्रकटन ३१८; नहुषाचें अध:पतन ३१९.

४४ **दंभोद्भवचरित्र.** ... ... ... ... ... ३२०-३२२

दंभोद्भवाचा गर्व व नर-नारायणऋषींस आव्हान ३२०; उभयतांचें युद्ध व दंभोद्भवाचा गर्वपरिहार ३२१-३२२.

४५ **मातलि व गुणकेशी.** ... ... ... ... ३२२-३२७

गुणकेशीकरतां वरशोधन ३२२: सुमुख नागाची पसंती ३२३; सुमुखासह मातली व नारद इंद्रलोकीं येतात ३२४; गरुडाच्या गर्वोक्ति ३२५; त्याचें गर्वहरण. ३२६-३२७;

४६ **गालव, ययाति व माधवी.** ... ... ... ३२७–३३६

**विश्वामित्र**-शिष्य **गालव** ३२७; **विश्वामित्रानीं** मागितलेली गुरुदक्षिणा ३२८; **गालव** व **गरुड** ३२९; **शांडिली**-ब्राह्मणीचें तेज ३३०-३३१; **ययातीनें माधवी** गालवाचे हवालीं केली ३३२; **गालव**, तीन राजांस **माधवी** अर्पण करतो ३३३-३३४; अश्वांची गोष्ट आणि **माधवी** व **विश्वामित्र** ३३५; **माधवीची** तपश्चर्या ३३६.

४७ **अंबा व शिखंडी.** ... ... ... ... ३३६–३५४

**शाल्वकृत अंबेचा** त्याग ३३६-३३७; **अंबेचा** शोक ३३८; ऋषींचा विचार ३३९; **परशुरामांचा** निश्चय ३४०; **भीष्म-परशुरामसंवाद** ३४१-३४४; उभयतांचें युद्ध ३४५-३४७; **अंबेची** तपश्चर्या व देहत्याग ३४८-३४९; **द्रुपदाची** कन्या **शिखंडिनी** ३५०; तिचा विवाह व गौप्यस्फोट ३५०, **हिरण्यवर्म्याची** स्वारी ३५१; **शिखंडिनी** व यक्ष ३५२; **शिखंडिनीस** पुरुषत्वप्राप्ति ३५३; **कुबेराचा** यक्षास शाप ३५४.

४८ **षोडश राजकीय कथा.** ... ... ... ३५४–३६७

**सृंजयकन्या** आणि **नारद-पर्वतऋषि** ३५४-३५५; **सुवर्णष्ठीवी** पुत्राचा जन्म व त्याचा वध ३५६; **सृंजयशोक** आणि **आविक्षित** व **सुहोत्र** कथा ३५७; **पौरव, शिबि** व **रामचंद्र** ३५८; **भगीरथ** ३५९; **दिलीप** व **मांधाता** ३६०; **ययाति** ३६१; **अंबरीष** ३६२; **शशबिंदु** व **गय** ३६३; **रंतिदेव, भरत** व **पृथु** ३६४-३६५; **परशुराम** ३६६; **सृंजयपुत्र-संजीवन** ३६७.

४९ **चंद्राची क्षयवृद्धि.** ... ... ... ... ३६८–३६९
चंद्र-रोहिणीप्रेम व दक्षशाप ३६८; उःशाप व चंद्राची शापमुक्तता ३६९.

५० **त्रित व त्याचे दोघे भाऊ.** ... ... ... ३६९–३७२
गौतमांचे तीन पुत्र ३६९; त्रिताच्या भावांचा लोभ, ३७०; त्रिताचा यज्ञ ३७१; त्रितबंधूंचा अधःपात ३७२.

५१ **वसिष्ठ-विश्वामित्रांची स्पर्धा.** ... ... ३७२-३७४
वसिष्ठ-विश्वामित्रांची स्पर्धा ३७२; सरस्वतीची चिंता व युक्ति ३७३; सरस्वतीची शापमुक्तता व राक्षसांचा उद्धार ३७४.

५२ **असित देवल व जैगीषव्य.** ... ... ... ३७४–३७६
जैगीषव्य असिताचे आश्रमांत येतात ३७४; देवलाचें परिभ्रमण व गर्वपरिहार ३७५-३७६.

५३ **सारस्वतचरित्र.** ... ... ... ... ३७६–३७७
दधीचपुत्र सारस्वत ३७६; सारस्वताचें वेदसंरक्षण व वेदाध्ययन ३७७.

५४ **वृद्धकन्येची कथा.** ... ... ... ... ३७८–३७९
वृद्धकन्येचे तप व विवाह ३७८; तिचा व तिच्या पतीचा मृत्यु. ३७९.

५५ **अरुंधती व श्रुतावती.** ... ... ... ... ३७९–३८०
अरुंधतीची महादेवकृत सत्वपरीक्षा ३७९; श्रुतावतीची इंद्रप्राप्त्यर्थ तपश्चर्या ३८०.

५६ **सात्यकि व भूरिश्रवा.** ... ... ... ... ३८०–३८१

५७ **दक्षयज्ञ-विध्वंस.** ... ... ... ... ३८२–३८४

शंकरांचें पाण्यांत बुडून राहणें व प्रजाभिवृद्धि ३८२; देवांचे यज्ञावर शंकरांची स्वारी ३८३; शंकरांस हविर्भागप्राप्ति ३८४.

५८ **त्रिपुराख्यान.** ... ... ... ... ... ३८४–३८८

तारकपुत्राची तपश्चर्या व त्रिपुरप्राप्ति ३८४; दैत्यांचा उन्मत्तपणा ३८५; त्रिपुरनाशाची तयारी ३८६; महादेवांचा रथ व युद्धास प्रारंभ ३८७; त्रिपुरनाश ३८८.

५९ **संवर्त व मरुत्त.** ... ... ... ... ... ३८९–३९६

मरुत्ताची पूर्वपीठिका, ३८९; संवर्त व बृहस्पति यांची भाऊबंदकी ३९०; मरुत्त-नारदसंवाद ३९१; मरुत्त-संवर्त-संवाद ३९२; मरुत्ताची समृद्धि व बृहस्पतीचा मत्सर ३९३; मरुत्तास इंद्राचा निरोप ३९४; मरुत्ताचें उत्तर ३९५; संवर्तांचें वरप्रदान ३९६.

६० **उत्तंक व श्रीकृष्ण.** ... ... ... ... ३९६–३९८

श्रीकृष्ण व उत्तंक यांची भेट ३९६; श्रीकृष्णाचा वर ३९७; उत्तंक-परीक्षा व त्यास पुनः वरप्राप्ति ३९८.



# भारतीय उपकथा.



## पूर्वार्ध.

### धौम्यगुरु व त्यांचे तीन शिष्य.





आयोदकुलांत धौम्यनामक एक मोठे तपोनिष्ठ ऋषि असून त्यांचे आरुणी, उपमन्यु व वेद या नांवांचे तीन शिष्य होते. एके प्रसंगीं धौम्यऋषीनीं आपल्या आरुणी पांचाल्य शिष्यास, 'भातखाचरांत जाऊन बांध घालून पाणी अडवून ठेव' अशी आज्ञा केली. या आज्ञेप्रमाणें शेतांत जाऊन आरुणी बांध बांधूं लागला; पण त्यास तेथील पाणी आटपेना. तरी शेवटीं, **गुरूची आज्ञा पूर्ण न करतां त्यांस तोंड दाखविणें खऱ्या शिष्यास योग्य नव्हे** हें जाणून पाणी वाहत होतें तेथें स्वतःच पडून आरुणीनें आपल्या शरीरानेंच पाणी अडवून धरलें! इकडे बराच वेळ झाला तरी आरुणी परत येत नाहीं, असें पाहून धौम्यगुरु शिष्यांसह तेथें आले; व त्यास 'वत्सा, कोठें आहेस? इकडे ये' अशा हाका मारूं लागले. गुरूची 'इकडे ये' अशी आज्ञा ऐकतांच शेताचा बांध फोडून आरुणी बाहेर आला, व त्यानें गुरुसन्निध जाऊन त्यांस नमस्कार केला. तेव्हां धौम्य त्यास म्हणाले:—'ज्या अर्थी

तूं बांध फोडून बाहेर आलास त्या अर्थीं तुला यापुढें ‘ उद्दालक ’ हें नांव प्राप्त होईल. तसेंच माझी आज्ञा तूं मोठ्या निर्धारानें पाळलीस म्हणून तुझें सदैव कल्याण होईल; शिवाय तुला सर्व वेद व धर्मशास्त्रें सहज स्फुरतील. ’ धौम्यगुरूनीं याप्रमाणें अनुग्रह केल्यानंतर कृतकृत्य होत्साता आरुणी आपल्या पांचाल देशास गेला.

पुढें एके दिवशीं धौम्यांनीं आपल्या उपमन्यु शिष्यास गाई राखण्यास वनांत पाठविलें. गुरूंच्या आज्ञेप्रमाणें संध्याकाळपर्यंत गाई राखून तो गुरुगृहीं परत आला; व धौम्यांस नमस्कार करून उभा राहिला. तों तो सकाळसारखाच ताजातवाना आहे, असें पाहून धौम्यांनीं त्यास विचारलें:—‘ वत्सा उपमन्यु, तूं पहिल्यासारखाच पुष्ट व बळकट दिसत आहेस; आज आपलें पोट कसें भरलेंस ? ’ यावर ‘ भिक्षा मागून पोट भरलें ’ असें उपमन्यूनें उत्तर दिलें. तेव्हां धौम्य म्हणाले:—‘ भिक्षान्न मला अर्पण केल्यावांचून खाऊं नकोस. ’ त्यावर ‘ होय ’ म्हणून उपमन्यूनें दुसरे दिवशीं भिक्षा मागून आणून गुरूपुढें ठेविली; गुरूनीं तें सर्वच भिक्षान्न घेऊन शिष्यास त्यापैकीं कांहींही दिलें नाहीं ! तरी त्यानें वनांत जाऊन दिवसभर गाई राखल्या व तो सायंकाळीं गुरूच्या आश्रमांत परत आला. उपमन्यु पुनः पूर्ववत् ताजातवाना असल्याचें पाहून धौम्य म्हणाले:- ‘ तुझें सर्व भिक्षान्न मीं घेतलें असूनही तूं धडधाकट दिसत आहेस. तूं आज काय खाल्लेंस ? ’ उपमन्युः—‘ पहिली भिक्षा आपणांस देऊन पुनः दुसरी मीं मागतों व तीवर पोट भरतों. ’ धौम्यः— ‘ हें तुझें वर्तन योग्य नाहीं. या योगानें भिक्षेवर उदरनिर्वाह करणाऱ्या इतर लोकांच्या उपजीविकेस तूं व्यत्यय आणीत आहेस. अर्थात् तुझें हें कृत्य लोभीपणाचें आहे, असें पुनः करूं

नको.' गुरूंची हीही आज्ञा शिरसा मान्य करून उपमन्यु पुनः पूर्ववत् गाई राखून आश्रमांत परत आला; व धौम्यांनीं पुनः त्यास तोच प्रश्न विचारला. तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं, 'मीं या गाईंचें दूध पिऊन उदर-निर्वाह करितों.' धौम्य म्हणाले:- 'दूध पिण्याची मी तुला अनुज्ञा दिली नसतांना तूं दूध पितोस हें योग्य नव्हे.' तेव्हां, दूध पिणार नाहीं, असें कबूल करून उपमन्यु पुनः गाई राखावयास गेला व सायंकाळीं आश्रमास परत आला. हा पहिली सर्व भिक्षा देतो, दुसरी भिक्षा मागत नाहीं व गाईंचें दूधही पीत नाहीं; तरी हा आपला आहे तसाच आहे! असें पाहून धौम्यानीं पुनः त्यास त्याबद्दल विचारलें. तेव्हां उपमन्यु म्हणाला:- 'हीं वासरें गाईंना पीत असतांना जो फेंस खालीं पडतो, तो पिऊन मीं उपजीविका करतों.' यावर धौम्य म्हणाले:- 'हीं वासरें तुजवर दया करण्यासाठीं जास्त फेंस खालीं टाकतात; अर्थात् तुझ्या ह्या वर्तनानें वासरांच्या उदरपोषणांतही व्यत्यय येत आहे; करतां असें पुनः करूं नकोस.' गुरूची ही आज्ञा ऐकून उपमन्यु पुनः गाई बरोबर घेऊन वनांत गेला. पहिली भिक्षा गुरूला अर्पण करावयाची, दुसरी मागावयाची नाहीं, दूधही प्यावयाचें नाहीं व फेंसही चाटावयाचा नाहीं; या आज्ञांमुळें भुकेनें व्याकुळ होऊन उपमन्यूनें वनांत अर्क ( रुई ) वृक्षाचीं पानें खाल्लीं; त्यामुळें त्यांचा तिखट, खारट व कडु रस पोटांत जाऊन पुढें त्याचे डोळेही गेले! याप्रमाणें दृष्टि नाहींशी होऊन वनांत भटकत असतां बिचारा उपमन्यु एका विहिरींत पडला. इकडे सूर्य अस्तास जाऊन रात्र पडली, तरी उपमन्यु परत आला नाहीं. तेव्हां, आपण प्रत्येक गोष्टीचा त्यास प्रतिबंध केल्यामुळें तो रागावून परत येत नसावा, असें वाटून धौम्य-

ऋषि शिष्यांसह वनांत जाऊन त्याचा शोध करूं लागले. त्यांनीं उपमन्यूस मोठ्यानें हांक मारली असतां, 'मीं इकडे विहिरींत पडलों आहें' असें त्यानें मोठ्यानें प्रत्युत्तर दिलें. धौम्यगुरु तेथें आल्यावर उपमन्यूनें त्यांस सर्व हकीकत सांगितली. तेव्हां धौम्य म्हणाले:— 'देवांचे वैद्य जे अश्विनीकुमार त्यांची स्तुति कर; म्हणजे त्यांचे कृपेनें तुला पुनः दृष्टि येईल.' गुरूचे आज्ञेप्रमाणें त्यानें अश्विनीकुमारांची भक्तिपूर्वक स्तुति केली. त्या स्तुतीनें प्रसन्न होऊन अश्विनीकुमार स्वतः तेथें प्रगट झाले, व एक अपूप ( अनरसा ) देऊन तो भक्षण करण्याचा त्यास आग्रह करूं लागले. परंतु **आधीं गुरूला अर्पण केल्यावांचून कांहींही खावयाचें नाहीं**, हा आपला निश्चय त्यानें कांहीं केल्या सोडला नाहीं! तेव्हां **उपमन्यूचा हा निर्धार व गुरुभक्ति** पाहून अश्विनीकुमारांनीं त्यास आशिर्वाद दिला कीं 'तुझे व तुझ्या गुरूचे दांत लोखंडासारखे आहेत ते सोन्यासारखे होतील, तुला पूर्वींप्रमाणें दृष्टि येईल व तुझें कल्याण होईल.' उपमन्यूनें विहिरींतून वर गुरूजवळ येऊन सर्व हकीकत निवेदन केली, तेव्हां त्यांसही आनंद झाला. 'सर्व वेद व धर्मशास्त्रें तुला येतील व तुझें कल्याण होईल' असा धौम्यानींही त्यास आशिर्वाद दिला.

धौम्यांचा तिसरा शिष्य वेद याचीही त्यानीं अशीच कसून परीक्षा घेतली. त्यास ते बैलाप्रमाणें गाडीसही जुंपीत! पण अशा स्थितींतही थंडी, ऊन, तहान व भूक यांचीं दुःखें मुकाट्यानें सहन करून वेद गुरूची सेवा एकनिष्ठेनें व भक्तीनें करीत होता. वेदाच्या या गुरु-भक्तीनें धौम्यऋषि संतुष्ट झाले; व त्यांच्या आशिर्वादानें त्याचें कल्याण होऊन त्यास सर्वज्ञता प्राप्त झाली! गुरूनीं अनुज्ञा दिल्यानंतर वेदही स्वदेशीं जाऊन गृहस्थाश्रमी झाला. (आदि० अ० ३)

## वेद व त्यांचे तीन शिष्य.



वेदांजवळही विद्याभ्यासार्थ तीन शिष्य येऊन राहिले होते. गुरुसेवेचें व्रत किती खडतर व दुःखदायक आहे, याचा त्यांस प्रत्यक्ष अनुभव असल्यामुळें ते आपल्या शिष्यांस आपली सेवा किंवा इतर कोणतेंही काम करण्यास सांगत नसत. पुढें एके दिवशीं जनमेजय व पौष्य या दोघां राजांनीं त्यांजकडे येऊन त्यांस आपला उपाध्याय होण्याविषयीं विनंति केली व ती वेदानींही मान्य केली. कांहीं दिवसांनी वेद यज्ञकार्यासाठीं प्रवासास जाण्यास निघाले. तेव्हां त्यांनीं आपल्या उत्तंक शिष्यास बोलावून आणलें; व त्यास सांगितलें कीं, ' मीं परत येईपर्यंत आमच्या गृह-कृत्यांत जर कोठें उणीव आली तर ती दूर करण्याची तजवीज कर. ' गुरूच्या या आज्ञेप्रमाणें उत्तंक वर्तन करीत असतां गुरुपत्नी ऋतु-स्नात झाली; तेव्हां आश्रमांतील कांहीं स्त्रिया उत्तंकाकडे आल्या. व ' गुरु सान्निध नसल्यामुळें गुरुपत्नीचा ऋतु निष्फळ होत आहे, तर तो तसा न होईल अशी तजवीज कर ' असें त्यास म्हणूं लागल्या ! तेव्हां उत्तंकानें उत्तर केलें:—' मीं **मूर्ख बायकांचें ऐकून हें महापापकर्म कदापि करणार नाहीं**. अकार्य अगर पापही तूं कर, अशी मला गुरूनीं मुळींच आज्ञा केलेली नाहीं. ' पुढें कालांतरानें वेदगुरु प्रवासाहून परत आले, व त्यांस सर्व वर्तमान कळलें. तें ऐकून **शिष्याची एकनिष्ठा, धर्मपूर्वक गुरुसेवा, मनोनिग्रह व पापभीरुता** हीं पाहून त्यांस परम संतोष झाला. ' तुझे सर्व

मनोरथ पूर्ण होतील ' असा त्यास आनंदानें आशिर्वाद देऊन स्वगृहीं जाण्याची वेदानीं त्यास अनुज्ञा दिली. पण **गुरुप्रीत्यर्थ एकादी वस्तु आणून व ती गुरुदक्षिणा म्हणून त्यांस देऊन त्यांजपासून मिळविलेल्या विद्येचा अल्प मोबदला दिल्यावांचून घरीं परत जाणें कृतघ्नपणाचें आहे**, असें वाटून तो तसाच गुरुगृहीं राहिला; व तुम्हांसाठीं कोणती वस्तु आणूं, असें म्हणें रोज गुरूपाशीं लावूं लागला. अखेर वेदानीं त्यास सांगितलें कीं, ' घरांत जाऊन, कोणती वस्तु आणूं असें आपल्या गुरुपत्नीसच विचार; व ती सांगेल ती वस्तु आणून दे. ' गुरूच्या आज्ञेप्रमाणें उत्तंकानें घरांत जाऊन गुरुभार्येस विचारलें; तेव्हां ती म्हणाली:– ' उत्तंका, पौष्यराजाकडे जा; व त्याच्या क्षत्रियेनें ( राणीनें ) आंगावर घातलेलीं दिव्य कुंडलें घेऊन ये. आजपासून चौथ्या दिवशीं ' पुण्यक ' नामक धर्मविधि आहे, त्या वेळीं हीं सुंदर कुंडलें धारण करून ब्राह्मणांस प्रदाक्षिणा कराव्या, अशी माझी फार इच्छा आहे. ती पूर्ण केल्यावांचून तुझें कल्याण होणार नाहीं.'

गुरुपत्नीचा निरोप घेऊन उत्तंक कुंडलें आणण्यास निघाला. वाटेंत त्यास एक प्रचंड बैल दिसला; त्या बैलावर त्यासारखाच एक प्रचंड पुरुष बसला होता. त्यानें उत्तंकास त्या वृषभाचें शेण खाण्यास सांगितलें ! उत्तंक कांकूं करूं लागला, तेव्हां तो पुरुष म्हणाला:– ' विचार न करतां मुकाट्यानें याचें शेण तूं खा. तुझ्या गुरूनेंही पूर्वीं हें खाल्लेलें आहे. ' हें ऐकून उत्तंकानें त्या वृषभाचें मूत व शेण खाल्लें ! आणि घाईघाईनें उभ्यानेंच पाण्याचा चुळा भरून तोंड धुवून तो पुढें चालूं लागला. प्रवास संपल्यावर पौष्यक्षत्रियाकडे जाऊन त्यानें त्यास आपली इच्छा कळविली. तेव्हां, 'अंतः-

पुरांत जाऊन माझ्या पत्नीपाशीं कुंडलें माग ' असें पौष्यानें उत्तंकास सांगितलें. त्याप्रमाणें अंतःपुरांत जाऊन पहातो तों त्यास तेथें क्षत्रिय-स्त्री दिसली नाहीं. तेव्हां पौष्याकडे परत येऊन ' पत्नी अंतःपुरांत आहे, असें मला खोटें कां सांगितलेंस ? ' असें उत्तंक रागानें त्यास विचारूं लागला. क्षणमात्र विचार करून पौष्य म्हणालाः— ' माझी पत्नी पतिव्रता आहे; ती उष्टावलेल्या व घाणेरड्या माणसाच्या केव्हांही दृष्टीस पडावयाची नाहीं. तूं असा उष्टा किंवा घाणेरडा राहिला आहेस कीं काय, याची आठवण कर. ' पौष्याचें हें भाषण ऐकून उत्तंकास स्मरण झालें. ' घाईघाईनें जातां जातां उभ्यानेंच दोन चुळा भरून मीं निघालों ही माझी चूक झाली ' असें त्यानें कबूल केलें. नंतर त्यानें पूर्वेकडे तोंड करून, खालीं बसून, ज्यांत फेंस नाहीं, जें उष्ण नाहीं व जें निःशब्द आहे अशा पाण्यानें तीनदां आचमन करून व दोनदां पुसून हात पाय व तोंड यथाशास्त्र धुतलें; व नंतर अंतःपुरांत जाऊन त्यानें आपली मनीषा क्षत्रियेस निवेदन केली. उत्तंकासारखा सत्पात्र अतिथि व याचक पुनः भेटणार नाहीं, असें जाणून क्षत्रियेनें तीं कुंडलें काढून उत्तंकाचे हवालीं केलीं; आणि ' हीं कुंडलें हरण करण्यास नागांचा राजा वासुकी फार दिवस टपला आहे; तर तीं फार जपून ने ' असेंही तिनें उत्तंकास बजाविलें. तेव्हां उत्तंक म्हणालाः—' माझ्याशीं दांडगाई करून कुंडलें नेण्याची वासुकीची छाती नाहीं; तुम्ही निर्धास्त असा. ' याप्रमाणें बोलून व क्षत्रियेचा निरोप घेऊन उत्तंक पौष्याकडे आला असतां त्यानें त्यास श्राद्धाचें आमंत्रण दिलें. तें स्वीकारून उत्तंक भोजनास बसला असतां, वाढलेलें अन्न गार झालें आहे व त्यांत केंस पडलेले असून

तें केंस मोकळे सोडलेल्या स्त्रीनें आणून वाढलें आहे, असें उत्तंकाचे लक्षांत आलें. अशा प्रकारचें अपवित्र अन्न आपणांस वाढल्याबद्दल उत्तंकानें, ' तूं अंध होशील ' असा रागानें पौष्यास शाप दिला. चांगल्या अन्नास नांवें ठेविल्याबद्दल उलट पौष्यानेंही ' तुला मुलें होणार नाहींत ' असा उत्तंकास शाप दिला. तेव्हां, अन्न कसें दूषित झालेलें आहे हें उत्तंकानें त्याचे प्रत्यक्ष नजरेस आणलें; आणि ' केवळ शापामुळें आलेलें अंधत्व लवकरच नाहींसें होईल ' असा त्यानें पौष्याचे विनंतीवरून त्यास उःशापही दिला. पण उत्तंकास विनाकारण दिलेला शाप नाहींसा करण्याचें सामर्थ्य पौष्यास नव्हतें.

**नवनीतं हृदयं ब्राह्मणस्य । वाचि क्षुरो निशितस्तीक्ष्णधारः ॥**
**तदुभयमेतद्विपरीतं क्षत्रियस्य । वाङ्नवनीतं हृदयं तीक्ष्णधारम् ॥**

कारण, पौष्य म्हणालाः—' ब्राह्मणाचें हृदय लोण्यासारखें मृदु पण वाणी शस्त्रासारखी तीक्ष्ण असते; परंतु क्षत्रियाचें याच्या उलट म्हणजे वाणी नवनीतासारखी मऊ पण हृदय वज्रासा-सारखें कठिण व तीक्ष्ण असतें. ' यावर उत्तंक म्हणालाः— ' चांगल्या अन्नास नांवें ठेवणें, हें जें तुझ्या शापाचें कारण तेंच खोटें असल्यामुळें तुझा शाप केव्हांही खरा होणार नाहीं. ' असें म्हणून उत्तंक तेथून निघाला. थोड्या वेळानें त्यास वाटेंत एक नग्न क्षपणक ( बौद्धभिक्षु ) दिसला; तो वरचेवर दिसे व पुनः पुनः अदृश्य होई ! जवळचीं कुंडलें भूमीवर ठेवून उत्तंक पाण्याचे शोधार्थ हिंडूं लागला; ही संधी साधून तीं कुंडलें घेऊन नग्न क्षपणक पळून जाऊं लागला. उत्तंकानें पाण्याचें काम होतें तें करून आणि गुरूला व देवाला नमस्कार करून क्षपणकाचा पाठलाग

केला. वाटेंत असलेल्या वासुकीनें क्षपणकास धरलें. धरतांच त्याचें तें रूप जाऊन त्यास तक्षकाचेंच रूप प्राप्त झालें; व त्या रूपानें तो एका मोठ्या बिळांत प्रवेश करून नागलोकीं गेला! उत्तंकही त्याच्या पाठोपाठ त्याच बिळांत शिरला. आपल्या काठीनें बीळ उकरीत असल्यामुळें उत्तंक पुष्कळच दमून गेला, असें पाहून इंद्रानें आपलें वज्र त्याचे साह्यास पाठविलें; व **संकटांस न जुमानतां जो धैर्यानें सत्कार्यार्थ स्वतः प्रयत्न करतो त्यास देवाचें सहाय्य अवश्य मिळतें,** ह्या सिद्धांताचा प्रत्यय त्यास आणून दिला. त्या वज्रानें केलेल्या विवरांतून उत्तंक नागलोकीं गेला. तेथें त्यानें नागांची परोपरीनें स्तुति केली तरी त्यास कुंडलें परत मिळालीं नाहींत. इतक्यांत, मागावर कापड विणीत बसलेल्या दोन स्त्रिया त्यास दिसल्या. मागावर काळें व पांढरें सूत लावलें असून सहा कुमार बारा अरांचें एक चक्र फिरवीत होते. त्याशिवाय एक पुरुष व एक अश्वही त्याचे नजरेस पडला. उत्तंकानें या सर्वांची वेदमंत्रांनीं स्तुति केली; ती ऐकून पुरुषानें प्रसन्न होऊन त्यास वर देऊं केला. ' हे सर्व नाग मला वश असावेत ' असा उत्तंकानें वर मागितला. तेव्हां, ' अश्वाचे अपानद्वारांत जोरानें फुंकर घाल ' असें त्या पुरुषानें उत्तंकास सांगितलें. त्याप्रमाणें उत्तंकानें केलें असतां त्या अश्वाच्या सर्व इंद्रियांतून अग्नीच्या ज्वाळा व धुराचे लोट निघूं लागले! ह्या अग्नीच्या तेजानें भयभीत व धुराचे लोटांनीं घाबरा होऊन वासुकी आपल्या वाड्यांतून बाहेर आला; व त्यानें कुंडलें उत्तंकास दिलीं. " पुण्यक ' विधि आजच असून गुरुपत्नी आपली वाट पहात बसली असेल. आतां आपणास कुंडलें मिळालीं खरीं; पण तीं घेऊन आतांचें आतां येथून गुरूच्या

आश्रमांत कसें जातां येणार?' अशी चिंता उत्तंक करूं लागला. इतक्यांत त्या पुरुषानें त्यास एक युक्ति सुचविली. तीप्रमाणें उत्तंक त्या अश्वावर आरूढ होऊन एका क्षणांत गुरूचे आश्रमास आला! इकडे गुरुपत्नी न्हाऊन आपले केंस विखरीत बसली होती. ठरलेल्या मुदतींत उत्तंक कुंडलें घेऊन आला नाहीं, असें पाहून त्यास शाप देण्याचे विचारांत ती आहे, तोंच उत्तंकानें तेथें येऊन तिला नमस्कार केला! गुरुपत्नीनें आनंदित होऊन त्याजजवळून कुंडलें घेऊन लागलींच धारण केलीं; आणि 'तुला सर्व सिद्धि व कल्याण प्राप्त होवो' असा त्यास आशिर्वाद दिला. उत्तंकानें बाहेर येऊन गुरूसही नमस्कार केला. गुरूनीं विचारल्यावरून प्रवासांत पाहिलेले सर्व चमत्कार उत्तंकानें त्यांस निवेदन केले. तेव्हां वेदगुरु म्हणाले:—'तूं ज्या दोन स्त्रिया पाहिल्यास त्या धाता व विधाता होत; काळे-पांढरे दोरे त्या दिवस-रात्रि; बारा अऱ्यांचें तें संवत्सरचक्र व सहा कुमार ते षड्ऋतु होत. तूं जो पुरुष पाहिलास तो पर्जन्य आणि अश्व तो अग्नि होय.* तसेंच वाटेंत तूं जो वृषभ पाहिलास तो ऐरावत आणि त्यावर बसलेला जो महापुरुष तो इंद्र असून तूं जें वृषभाचें मूत्रपुरीष खाल्लेंस तें अमृत होय! त्या अमृतामुळेंच नागलोकीं तुला मृत्यु आला नाहीं. माझा मित्र इंद्र यानें तुजवर ही कृपा केली म्हणूनच कुंडलें घेऊन इतक्या त्वरेनें तुला परत येतां आलें.' असें म्हणून, गुरूनीं 'कल्याण होवो' असा त्यास आशिर्वाद दिला. त्याचा भक्तिपूर्वक स्वीकार करून उत्तंक गुरूंची आज्ञा घेऊन हस्तिनापुराकडे गेला. (आदि० अ० ३).

---

* हा अश्व म्हणजे अर्वाचीन (fire-baloon) आगविमानाचा प्राचीन नमुना होय, असें पंजाबाकडील एका आर्यसमाजिस्ट शोधकाचें म्हणणें आहे!

# च्यवन भार्गव व रुरु.






रुणाचे यज्ञांत स्वयंभू ब्रह्मदेवाकडून अग्नीपासून भृगुऋषींचा जन्म झाला; त्यांस पुलोमा नांवाची पतिव्रता भार्या होती. ही आरंभीं पुलोम नांवाच्या राक्षसास देऊं केली असूनही ती तिच्या पित्यानें भृगुऋषीस दिली होती. तेव्हांपासून पुलोमाराक्षस क्रोधानें, मत्सरानें व कामवासनेनें सारखा जळत होता. पुढें कांहीं काळानें पुलोमा गर्भवती झाल्यानंतर एके दिवशीं भृगुऋषि स्नानास गेले आहेत, असें पाहून पुलोमाराक्षसानें ती संधि साधली. तो आश्रमांत आलेला पाहून पुलोमेनें, वन्य फळें व मुळें देऊन त्याचा अतिथि या नात्यानें योग्य सत्कार केला. परंतु **कामाच्या तडाक्यांत सांपडलेल्या दुष्ट व नीच मनुष्यास असल्या आतिथ्याचें पावित्र्य कसें समजणार?** त्यानें पाहुणचार स्वीकारीत असतांनाच पुलोमेला जबरदस्तीनें हरण करून नेण्याचा निश्चय केला. पुलोमराक्षसानें अग्निशाळेंत जाऊन अग्नीस वारंवार विचारलें कीं, ‘ पुलोमा ही वास्तविक माझी भार्या आहे कीं भृगुऋषींची आहे? तसेंच पुलोमा म्हणतात ती हीच काय? हें मला खरें खरें सांग. ’ अखेर अग्नीनें मोठ्या कष्टानें व निरुपायानें उत्तर दिलें कीं, ‘ पुलोमेला जरी पहिली मागणी तुझी होती तरी तिच्या पित्यानें तिचा शास्त्रोक्त व अग्निसाक्षिक विवाह भृगुऋषींशींच केलेला असल्यामुळें तीही त्यांचीच खरी धर्मपत्नी आहे. ’ अग्नीचें हें

भाषण ऐकून पुलोमराक्षसानें वराहरूप धारण करून पुलोमेला बलात्कारानें नेलें. परंतु आपल्या मातेचा हा छळ पुलोमेच्या गर्भस्थ पुत्रास सहन न होऊन तो रागानें तिच्या कुशींतूनच बाहेर पडला! आईच्या कुशींतून च्युत झाला म्हणून त्याचें पुढें 'च्यवन भार्गव' असें नांव पडलें. पुलोमेच्या ह्या पुत्राच्या नुसत्या तेजानेंच पुलोमराक्षस जळून भस्म होऊन पडला! वनांत भलत्या स्थळीं, अकालीं व विपरीत प्रकारानें प्रसूत झाल्यामुळं पुलोमा अत्यंत शोक करूं लागली. पण अखेर पुत्रास घेऊन ती रडत रडत मोठ्या कष्टानें आश्रमांत परत आली. वाटेनें तिचे जे अश्रु गळले त्यांची नदी होऊन ती तिचे पाठोपाठ भृगूंच्या आश्रमापर्यंत आली; म्हणून ब्रह्मदेवानीं या नदीचें नांव 'वधूसरा' असें ठेवलें. 'तूं माझीच भार्या आहेस असें त्या राक्षसास कोणीं सांगितलें?' असें भृगुऋषींनीं तिला रागानें विचारलें. तेव्हां हें अग्नीनें राक्षसास सांगितल्याचें आणि पुत्राचे तेजानेंच राक्षस भस्म झाल्यामुळें आपण त्याचे हातून सुटल्याचें तिनें नम्रपणें पतीस कळविलें. तेव्हां भृगुऋषींनीं 'तूं सर्वभक्षक होशील' असा अग्नीस शाप दिला! हा शाप ऐकून अग्नीस फार विषाद वाटला व रागही आला. तो म्हणालाः—

पृष्टो हि साक्षी यः साक्ष्यं जानानोऽप्यन्यथा वदेत् ।
स पूर्वानामात्मनः सप्त कुले हन्यात्तथाऽपरान् ॥
यश्च कार्यार्थतत्त्वज्ञो जानतोऽपि न भाषते ।
सोऽपि तेनैव पापेन लिप्यते नात्र संशयः ॥

'एकादी गोष्ट किंवा कार्याचें तत्त्व माहीत असून त्याबद्दल एखाद्यानें प्रश्न विचारला असतां त्यास भलतें

किंवा खोटें सांगितलें, तर त्यास खोटी साक्ष दिल्याचें पातक लागतें; व त्याच्या पूर्वजांच्या व वंशजांच्या सात सात पिढ्या नरकीं पडतात, हें जाणून राक्षसानें प्रश्न विचारला असतां मीं त्यास खरें सांगितलें, यांत माझा काय दोष ? सर्व प्राणिमात्रांचे शरिरांत व सर्व प्रकारचे यज्ञांत माझें वास्तव्य असून सर्व देव व पितर यांना माझ्याद्वारेंच हविर्भाग व पिंड पोंचत असतात. अर्थात् मी सर्व देवांचें व पितरांचें मुखच आहें; तर मी सर्वभक्षक कसें व्हावें ? " याप्रमाणें भृगुऋषींस बोलून अग्नीनें स्वतःस विझवून आत्महत्या केली ! तेव्हां सर्व लोकांचा व्यवहार थांबून अग्निहोत्रें, यज्ञयाग, वेदाध्ययन वगैरे धर्मकृत्यें बंद पडलीं ! याबद्दलचें गाऱ्हाणें सर्व प्रजेनें व देवांनीं ब्रह्मदेवाकडे नेलें; तेव्हां त्यांनीं अग्नीस बोलावून आणून त्यास आपल्या शापाचा परिहार करण्याची युक्ति सांगितली. ब्रह्मदेव म्हणाले:—" तूं सर्व प्राण्यांची उत्पत्ति व नाश करणारा आहेस, व तुझ्यामुळेंच सर्व जग चाललें आहे. तूं आपल्या तेजानेंच भृगूंचा शाप खरा करून दाखीव. आपल्या मुखानें तूं पूर्ववत् देवांचा व पितरांचा हविर्भाग घेत जावें. आणि अपानाशीं संलग्न असलेल्या तुझ्या ज्वाळा व तुझें ' क्रव्याद ' रूप या दोहोंनीं तूं ' सर्वभक्षक ' हो म्हणजे झालें. सूर्याचे किरण कशावरही पडले तरी त्यामुळें सूर्य अपवित्र न होतां ती वस्तुच शुद्ध होते; त्याप्रमाणें तूं दग्ध केलेली वस्तु शुचिर्भूतच आहे. " ब्रह्मदेवांची ही युक्ति अग्नीस पसंत पडून त्याप्रमाणें तो वर्तन करूं लागला; आणि अग्नीवर अवलंबून असलेले सर्व व्यवहार व धर्मकृत्यें पूर्ववत् सुरू झालीं. ( आदि० अध्याय ४–७ ).

च्यवन भार्गवास सुकन्येचे पोटीं प्रमतिनामक तेजस्वी पुत्र झाला; व प्रमतीला घृताचीपासून रुरु पुत्र झाला; व रूरूलाही पुढें प्रमद्वरेपासून शुनक नांवाचा धार्मिक, सत्यवादी, तपस्वी व आत्मसंयमी पुत्र झाला. प्रमद्वरेची पूर्वकथा अशी होती:— मेनकेचे पोटीं गंधर्वराजा विश्वावसु यास एक कन्या झाली. परंतु ती त्या निर्दय व निर्लज्ज अप्सरेनें स्थूलकेशऋषींच्या आश्रमाजवळ नदीतीरीं टाकून दिली! स्थूलकेशऋषींना दया येऊन त्यांनीं तिला आश्रमांत नेलें व पुढें तिचें आपल्या पोटच्या मुलीप्रमाणें संगोपन केलें. ही मुलगी सर्व 'प्रमदां-' (तरुण स्त्रियां) मध्यें सात्विक रूपगुणांनीं 'वरा' (श्रेष्ठ)असल्यामुळें तिचें नांव 'प्रमद्वरा' ठेविलें होतें. स्थूलकेशऋषींचे आश्रमांत प्रमद्वरेला पाहून तिजवर रुरूचें मन बसलें. त्यानें तिजबद्दल मागणी घातली व स्थूलकेशऋषींनींही ती त्याला देण्याचें कबूल केलें. परंतु शास्त्रोक्त विवाह होण्यापूर्वींच एकेदिवशीं प्रमद्वरा वनांत मैत्रिणींसह खेळत असतां तिचा पाय एका वांकड्यातिकड्या पसरलेल्या सर्पास लागला. सापानें रागानें तिला दंश केल्यामुळें ती तात्काल मृतप्राय होऊन पडली. स्थूलकेश व त्यांचे आश्रमांतील इतर ऋषि, तसेंच रुरुही तेथें येऊन अत्यंत शोक करूं लागला. दुःख अत्यंत असह्य होऊन रुरु अरण्यांत भटकून विलाप करीत हिंडूं लागला. तेथं एका देवदूतानें येऊन रुरूला असें सांगितलें कीं, 'आपलें अर्धें आयुष्य प्रमद्वरेला देशील तर ती पुनः जीवंत होईल.' देवदूतानें सांगितल्याप्रमाणें रुरूनें आपलें अर्धें आयुष्य देतांच प्रमद्वरा झोंपेंतून जागी झाल्याप्रमाणें उठून बसली! **पति-पत्नीचें एकमेकांवर शुद्ध प्रेम असलें म्हणजे त्यासाठीं**

आयुष्य किंबहुना प्राण यांचा त्यागही त्यांस आनंददायकच होत असतो! पुढें चांगल्या मुहुर्तावर रुरु आणि प्रमद्वरा यांचा विवाह होऊन उभयतां आनंदानें संसार करूं लागलीं. परंतु आपल्या प्रिय पत्नीवर विवाहाचे वेळीं आलेलें प्राणसंकट रुरु विसरला नसल्यामुळें, सांपडेल तेथें साप मारावयाचा, असें व्रत त्यानें तेव्हां-पासून अव्याहत चालविलें होतें. त्याप्रमाणें वनांत हिंडत असतां एके दिवशीं रुरूला एक कात आलेला वृद्ध भुजंग दिसला. त्याजवर, आपल्या व्रताप्रमाणें, रुरूनें आपला सोटा उगारला. तेव्हां तो भुजंग त्यास म्हणाला:—' मी विषारी किंवा दंश करणारा भुजंग नसून डुंडुभ जातीचा निर्विष व निरुपद्रवी साप आहें. मला निरप-राध्याला कां मारतोस ? ' अशा रीतीनें भाषण करणारा हा कोणीं शाप झालेला ऋषि असावा, असें वाटून रुरूनें आपला हात आंवरला व ' तुला हें सर्परूप कां प्राप्त झालें ' असें त्यास विचारलें. तेव्हां डुंडुभ म्हणाला:—' मी पूर्वीं सहस्रपात् नांवाचा ऋषि असून माझा खगम नांवाचा एक जिवलग स्नेही होता. तो अग्निहोत्र कर्मांत गढून गेला असतां गवताच्या काड्या वळून मीं एक कृत्रिम साप केला; व एकदम त्याजकडे टाकला. बेसावध असल्यामुळें या कृत्रिम सापास भिऊन तो बेशुद्ध पडला! शुद्धी-वर आल्यावर त्यानें रागानें मला शाप दिला कीं ' तृणाचा जेवढा साप करून तूं मला भिवविलेंस तेवढा साप होऊन तूं अरण्यांत भटकशील. ' मी त्याची क्षमा मागून त्यास म्हटलें कीं, ' मीं ही केवळ थट्टा केली; यांत माझा कोणताही दुष्ट हेतु नव्हता. ' तेव्हां माझे मित्रास दया येऊन त्यानें मला उ:शाप दिला कीं, ' रुरु ब्राह्मणाचें दर्शन झालें म्हणजे तूं शापमुक्त होऊन तुला पूर्वरूप

प्राप्त होईल." असें बोलून व आपलें डुंडुभरूप टाकून सहस्रपातानें आपलें पूर्वरूप धारण केलें; आणि रुरूला उपदेश केला कीं, 'हिंसा किंवा दंडधारण हीं क्षत्रियांचीं कर्मे आहेत; तीं तूं ब्राह्मणानें करूं नये. पूर्वीं जनमेजयानें सर्पसत्र करून त्यांत सर्व नागांचा संहार केला; त्या वेळीं आस्तिक नांवाच्या ब्राह्मणानेंच कांहीं नागजातींस जीवदान दिलें आहे, व त्यांचीच संतति सांप्रत नांदत आहे. याकरतां तूं आपलें हें हिंसामय व्रत सोडून दे. **सत्यभाषण, क्षमा व वेदाध्ययन यांबरोबर अहिंसा हाही ब्राह्मणाचा परम धर्म सांगितला आहे.**

**अहिंसा परमो धर्मः सर्वप्राणभृतां वर।**

**तस्मात्प्राणभृतः सर्वान्न हिंस्याद्ब्राह्मणः क्वचित् ॥**

**सर्व प्राण्यांमध्यें श्रेष्ठ अशा ब्राह्मणा! अहिंसा हा सर्वांत श्रेष्ठ असा धर्म आहे. याकरतां ब्राह्मणानें केव्हांही कोणत्याही प्राण्याची हिंसा करूं नये.**" सहस्रपाताचें हें भाषण ऐकून रुरूनें त्यास जनमेजयाच्या सर्पसत्राचा वृत्तांत विचारला. पण 'तो तुला लवकरच कळेल' असें सांगून तो ऋषि गुप्त झाला. त्यास शोधण्यासाठीं रुरु बराच वेळ वनांत हिंडला, पण त्याचा त्यास थांग लागेना. अखेर आश्रमांत परत येऊन त्यानें आपल्या पित्यासच सर्पसत्रासंबंधानें प्रश्न केला. तेव्हां त्यानें हें आस्तिकऋषीचें चरित्र व सर्पसत्राचा वृत्तांत हीं त्यास सविस्तर निवेदन केलीं. ( आदि० अध्याय ८–१२ ).

# जरत्कारु ऋषींचा विवाह व आस्तिक-जन्म.






यावर कुलांत जरत्कारुनामक एक महातपस्वी व जन्मब्रह्मचारी ऋषि होता. तो तीर्थयात्रा करीत हिंडत असतां एके ठिकाणीं त्यास असा चमत्कार दिसला कीं, कांहीं ऋषि खालीं डोकें वर पाय अशा रीतीनें वीरण नांवाच्या गवताच्या तुऱ्यांवरून एका मोठ्या खळग्यावर लोंबत असून, त्यांत गुप्त-रूपानें राहिलेले उंदीर त्यांचीं मुळें कुरतुडत आहेत ! जरत्कारूस त्यांची दया येऊन अशी स्थिति होण्याचें कारण त्यानें त्यांस विचारलें व ' माझें सर्व तप अर्पण करून जर तुमची सुटका होत असेल तर तेंही देण्यास मीं तयार आहें ' असेंही त्यानें त्यांस सांगितलें. तेव्हां ते म्हणाले:-" आम्ही यायावर कुलांतले ऋषि आहों; आम्हांस जरत्कारूशिवाय संतति नाहीं. तो तपाचरणांत निमग्न असून विवाह करण्याच मनांतही आणीत नाहीं; त्यामुळें आमचा संतानविच्छेद ( निसंतान ) होण्याचा समय आला असून आम्हांस ही दुःस्थिति प्राप्त झाली आहे ! तींतून आमची सुटका तपानें होणारी नसून संतानप्राप्तीनेंच ती होईल. गवताची काडी हें आमचें कुल आहे; उंदीर हा काळ असून त्यांनें कुरतुडलेलीं मुळें ही संतति होय. एक अर्धें कुरतुडलेलें मूळ तो जरत्कारु ऋषि आहे;

तो एकदां काळानें नेला, म्हणजे आम्ही या खालच्या नरकांत पडणार आहों." जरत्कारूनें त्यांस आपण कोण हें सांगितल्यावर, विवाह करून पुत्रोत्पत्ति करण्याचा पितरांनीं त्यास फार आग्रह केला आणि **कामोपभोगासाठीं नव्हे, तर पितरांना सद्गति मिळावी म्हणून व त्यांच्या आज्ञेवरून आपलें ब्रह्मचर्यव्रत मोडून विवाह करण्याचें जरत्कारूनें त्यांस वचन दिलें.**' पण माझेंच नांव धारण करणारी कन्या तिच्या भावानें भिक्षा या नात्यानें मला दिली व तिच्या पोषणाचा भार मजवर पडला नाहीं, तरच मीं विवाह करीन; आणि पुढें तिनें माझें कोणतेंही अप्रिय केलें तर मी तिचा त्याग करीन' एवढ्या अटी मात्र जरत्कारूनें घातल्या. अशा प्रकारची कन्या मिळावी ह्या हेतूनें जरत्कारूनें पुष्कळ प्रवास केला; परंतु म्हातारा ऋषि म्हणून त्यास कोणींही कन्या न दिल्यामुळें त्याची इच्छा पूर्ण झाली नाहीं. अखेर वनांत जाऊन त्यानें, 'भार्या करण्यासाठीं मला कोणीं कन्येची भिक्षा घाला' अशी मोठ्यानें त्रिवार याचना केली. तेव्हां वासुकीनें पुढें येऊन आपली धाकटी बहीण जरत्कारु ही भिक्षारूपानें त्याचे हवालीं केली. पुढें विवाह होऊन हें एका नांवाचें जोडपें तेथेंच राहूं लागलें. योग्यकाळीं वासुकीचे राजवाड्यांत दोघें एकांतांत असतां जरत्कारूनें आपल्या सर्व अटी तिला सांगितल्या; व तिनेंही त्याप्रमाणें वर्तन करण्याचें कबूल केलें. अटीप्रमाणें जरत्कारु आपल्या पतीचें प्रिय करण्यांत किंचितही हयगय, दुर्लक्ष किंवा आळस करीत नसे. याप्रमाणें कांहीं काळ लोटल्यावर एके दिवशीं जरत्कारु आपल्या पत्नीचे मांडीवर डोकें ठेवून निजला होता; तो सूर्य

अस्तास जाण्याचे बेतांत आला तरी जागा झाला नाहीं. ‘ सूर्यास्त झाला तर संध्याकाळ टळून आपल्या पतीचे हातून धर्मलोप होईल; बरें जागें करावें, तर त्यास राग येईल; तर काय करावें ’ असा जरत्कारु विचार करूं लागली. तथापि **पतीचे रागापेक्षां धर्मलोपाचें भय अधिक** वाटून तिनें अखेर पतीस जागें केलें. तेव्हां जरत्कारु संतापानें तिला म्हणाला:—‘माझी झोंप कां मोडलीस ! मी जागा होण्यापूर्वीं सूर्याची अस्तास जाण्याची छाती नव्हती. तूं माझें हें अप्रिय केलें आहेस. मी आतां येथें राहणार नाहीं. ’ हें ऐकून जरत्कारु नम्रपणानें त्यास म्हणाली:—‘ मी तुमचा अपमान करण्यासाठीं किंवा अवज्ञा करण्यासाठीं नव्हे, तर धर्मलोप होऊं नये म्हणून, तुम्हांस जागें केलें; यांत माझा काय अपराध ? नागांस शाप झाला आहे, त्यांतून त्यांची मुक्तता करणारा पुत्र तुम्हांपासून व्हावा, म्हणून माझ्या भावानें मला तुम्हांस दिलें आहे. **ज्ञातीच्या कल्याणासाठीं हें कृत्य मीं केलें** असून तें सफल होण्यापूर्वींच तुम्हीं मला कसे सोडून जातां ? मी आतां वासुकीला काय सांगूं ? ” याप्रमाणें ती शोक करूं लागली. तेव्हां जरत्कारूनें तिचें समाधान केलें कीं, ‘ तुझ्या पोटीं मजपासून पूर्वींच गर्भ राहिला आहे ( अस्ति ); त्यापासून तुला तेजस्वी पुत्र उत्पन्न होऊन तो नागकुलाचें संरक्षण करील. ’ असें बोलून जरत्कारु तपश्चर्येस निघून गेला. योग्य वेळीं नागकन्या प्रसूत होऊन तिला पुत्र झाला. ‘ अस्ति ’ असें म्हणून त्याचा पिता त्याला गर्भांतच सोडून गेला, म्हणून त्याचें नांव ‘ आस्तिक ’ असें ठेवण्यांत आलें. आस्तिक ऋषीनें नागलोकांतच राहून च्यवन भार्गवापाशीं वेदवेदांगांचें अध्ययन केलें. ( आदि० अध्याय १३–१५ व ४५–४७ )

# समुद्रमथन.





काशास जाऊन भिडूं पाहणारा, अत्यंत दैदीप्यमान व सुवर्ण शृंगांनीं युक्त अशा मेरुपर्वतावर देव राहत असतां अमृतप्राप्तीची त्यांस इच्छा झाली; व त्यासाठीं ते सर्व देव तप करूं लागले. कांहीं काळानें नारायण देवानें त्यांस अमृतप्राप्तीचा उपाय सांगितला. तो असा कीं 'देव व असुर यांनीं मिळून समुद्राचें मंथन करावें म्हणजे अमृत प्राप्त होईल.' नारायणाच्या आज्ञेप्रमाणें समुद्राचें मंथन करण्याच्या उद्योगास सर्व देव लागले. वासुकीस पाठवून त्याजकडून मंदर पर्वत उपटून आणविला; व तो कूर्मराजाचे पाठीवर समुद्रांत ठेवून त्यांनीं मंथनास आरंभ केला. वासुकीचे शेंपटीकडे देव व तोंडाकडे असुर होऊन मंदरपर्वतरूपी रवि फिरवूं लागले. समुद्राचें मंथन चाललें असतां त्याचा अतिप्रचंड ध्वनि होऊन पर्वतावरील अनेक औषधींचा व सुवर्णादि धातूंचा रस समुद्रांत येऊन मिळाला. देव व दानव यांनीं याप्रमाणें पुष्कळ वेळ समुद्रमंथन केलें तरी अमृत निघालें नाहीं. पण सर्व देवांस विष्णूनें आपलें बल दिल्यानंतर मंथन होतांच समुद्रांतून सूर्य, चंद्र, श्वेतवस्त्र धारण करणारी लक्ष्मी, सुरा, पांढरा उच्चैःश्रवा अश्व, कौस्तुभ मणि, पारिजात वृक्ष, सुरभि कामधेनु, याप्रमाणें क्रमानें बाहेर पडून अमृत आंत असलेला पांढरा कमंडलु हातांत घेऊन धन्वंतरी बाहेर आला. त्यास पाहतांच 'हें अमृत

आमचें आमचें ' असा देव-दानवांत एकच गलबला सुरू झाला; व त्यांनीं हातीं लागलें तितकें अमृत लांबविलें. चार पांढऱ्या दांतांचा ऐरावत व कालकूट विष उत्पन्न झालें, त्याच्या नुसत्या वासानेंच देव-दानव मूर्च्छित होऊन त्याच्या आगीनें सर्व जग जळावयास लागलें. तेव्हां **श्रीशंभूनें लोकोपकारार्थ तें कालकूट विष प्राशन केलें;** पण तें पोटांत जाऊं न देतां आपल्या कंठांतच धारण केलें. तेव्हांपासून शंभूस ' **नीलकंठ** ' हें नांव पडलें. श्री-विष्णूनें मोहिनीरूप धारण करून दैत्य-दानवांकडून अमृत घेऊन तें सर्व देवांस आणून दिलें ! देव अमृताचें प्राशन करीत असतां राहूनें देवरूपानें त्यांचेमध्यें शिरून अमृत पिण्याचा प्रयत्न केला. हें त्याचें कपट सूर्य-चंद्रांनीं देवांस कळविलें; तेव्हां राहूचे तोंडांत गेलेलें अमृत पोटांत जाण्यापूर्वींच श्रीविष्णूनीं त्याचें शिर उड-विलें ! तेव्हांपासून ह्या चुगलीबद्दलचा सूड उगविण्यासाठीं राहू-केतु सूर्य-चंद्रांस ग्रहणसमयीं ग्रासीत असतात; व तेही **देवांचे हितासाठीं केलेल्या सत्कृत्याबद्दल भोगावें लागणारें हें दुःख समचित्तानें सोशीत असतात.** देवांनीं आपणांस फसविलें, असें पाहून दैत्य-दानवांनीं देवाशीं समुद्रतीरीं युद्ध मांडिलें. देवदानवांचें हें घनघोर युद्ध बराच काळ चाललें तरी कोणाचाच विजय होईना. अखेर नरनारायण जेव्हां युद्धास आले, तेव्हां नराचें दिव्य धनुष्य व नारायणाचें सुदर्शन चक्र यांनीं दानवांचा अत्यंत वेगानें संहार चालविला; तेव्हां भयभीत व पराभूत होऊन दैत्य, दानव व असुर पाताळांत आणि समुद्रांत शिरले. पिऊन शेष राहिलेलें अमृत देवांनीं इंद्राचे स्वाधीन करून मोठ्या बंदोबस्तानें ठेविलें. ( आदि० अध्याय १७–१९ )

# कद्रु व विनता.





देवयुगामध्यें प्रजापतीला दोन मुली झाल्या; दोघीही रूपानें एकसारख्या असून त्या त्यानें कश्यपऋषींस दिल्या. थोरलीचें 'कद्रु' व धाकटीचें 'विनता' असें नांव होतें. कश्यपऋषींनीं संतुष्ट होऊन आपल्या दोघी पत्नींस वर देऊं केला. तेव्हां, मला एकसारखे बलवान् असे एक हजार नाग पुत्र होवोत, असा कद्रूनें वर मागितला. विनतेनेंही, कद्रूच्या हजार पुत्रांपेक्षां बळानें, तेजानें, शरिरानें आणि पराक्रमानें अधिक असे दोन पुत्र मला व्हावे, असा वर मागितला. हे दोनही वर आपल्या बायकांस देऊन कश्यपऋषि तपोवनांत निघून गेले. पुढें काहीं काळ लोटल्यानंतर कद्रूला एक हजार अंडीं व विनतेला दोन अंडीं झालीं. तीं त्यांच्या दासींनीं ऊब व ओलसरपणा यांनीं युक्त असलेल्या भांड्यांत ठेविलीं. याप्रमाणें पांचशें वर्षें लोटल्यानंतर कद्रूच्या अंड्यांतून एक हजार नाग निघाले; पण विनतेचीं अंडीं मात्र पूर्ववत् न फुटलेलींच राहिलीं. **वर मागतांना जो सवतीमत्सर विनतेच्या मनांत होता, त्याचाच संचार या वेळींही तिचे अंतःकरणांत झाला.** कद्रूच्या मुलांपेक्षां आपले पुत्र अधिक बलवान्, तेजस्वी व पराक्रमी व्हावे, असा वर आपण मागितला; पण आपले आधीं कद्रूचेच पुत्र जन्मास आले, असा विषाद वाटून विनतेनें दोहोंपैकीं एक अंडें अविचारानें फोडलें. तों आंतून पुत्र निघाला खरा, पण डोक्याशिवाय त्यास इतर अवयव मुळींच फुटले नव्हते! आपल्या

आईच्या दुष्टपणामुळें पूर्ण वाढ होण्यापूर्वीच आपला जन्म झाल्याचें पाहून त्यानें विनतेस शाप दिला. तो म्हणालाः— " सवतीमत्सरामुळें ज्या अर्थी तूं मला असल्या व्यंग शरीरासह जन्म दिलास, त्या अर्थी तूं त्या सवतीची ५०० वर्षें दासी होशील. दुसरें जें अंडें राहिलें आहे, त्याची पूर्ण वाढ होण्याची, उतावळेपणा न करतां धीरानें, ५०० हून अधिक वर्षें वाट पाहत बसशील तर तुला जास्तच पराक्रमी असा पुत्र होऊन तो तुझी या दासीपणांतून मुक्तता करील. " याप्रमाणें आपल्या आईस शाप देऊन हा पुत्र म्हणजे अरुण आकाशांत गेला; व सूर्यरथावर बसून त्याचें सारथ्य करूं लागला. पहिल्या खेपेस चांगलीच अद्दल घडून वरानें मिळविलेल्या दोन पराक्रमी पुत्रांपैकीं एक आपल्या अविचारानें व्यंग निपजल्याचा प्रत्यक्ष अनुभव आल्यामुळें विनतेनें दुसऱ्या खेपेस पुष्कळच धीर धरला. बऱ्याच वर्षांनीं योग्य कालीं तें अंडें फुटून गरुड बाहेर पडला व लागलीच आपल्या आईला सोडून भक्ष्य शोधार्थ आकाशांत उडून गेला! ( आदि० अध्याय १६ )

गरुडाचा जन्म होण्यापूर्वीं एके समयीं समुद्रमंथन करून बाहर काढलेला उच्चैःश्रवा अश्व कद्रु व विनता या दोघींनीं पाहिला. हा दिव्य अश्व अत्यंत बलवान्, चपल, तेजस्वी व सदा तरुण असा होता. हा घोडा कोणत्या रंगाचा आहे, याबद्दल दोघी सवतबहिणींत मोठा वाद चालला. विनता म्हणे कीं घोडा पांढरा आहे, व कद्रु म्हणे कीं त्याचे केंस काळे आहेत. अखेर दुसरे दिवशीं हा घोडा पुनः जवळ जाऊन पाहावयाचा, व जी हरेल तिनें दुसरीची दासी व्हावयाचें, अशी पैज पडली. विनतेचें दासीपण करण्याची पाळी आपणावर न यावी, म्हणून कद्रूनें आपल्या पुत्रांना

आज्ञा केली कीं, ' तुम्ही उच्चैःश्रव्याकडे जाऊन त्याचे शरीरांत शिरा, व तें सर्व शरीर आणि शेंपूट काळें करून टाका. ' कद्रूची ही आज्ञा बऱ्याच नागांनीं ऐकिली नाहीं; तेव्हां जन्मेजयाचे सर्पसत्रांत तुम्हां सर्वांचा विध्वंस होईल, असा तिनें त्यांस शाप दिला. दुष्ट व विषारी आणि इतकी वाढलेली नागांची जात त्यांच्याच मातेच्या शापानें नष्ट होऊन इतर निरुद्रवी प्रजांस सुख मिळणार, हें पाहून ब्रह्मदेवांस आनंद झाला. त्यानीं कश्यपाकडे येऊन या शापाचें लोकहिताच्या दृष्टीचें चांगुलपण त्यांस निवेदन केलें; आणि त्याबद्दल कद्रूला शाप देऊं नका, असें बजावून कश्यपांस ' विष-हरी-विद्या ' शिकविली. ( आदि० अध्याय २० )

दुसरे दिवशीं उजाडतांच दोघी बहिणी ठरल्याप्रमाणें आकाश-मार्गानें समुद्र ओलांडून त्याच्या परतीरीं गेल्या. तेथें कद्रूचे नाग-पुत्र उच्चैःश्रव्याच्या शेंपटीस लोंबकळत राहिले होते; त्यामुळें त्या श्वेतअश्वाचें पुच्छ दोघींस काळें दिसलें. पैजेप्रमाणें, विनतेचें बोलणें खोटें ठरून ती कद्रूची दासी झाली व कद्रूही आपल्या बहिणीस तेव्हांपासून दासीप्रमाणें वागवूं लागली ! इकडे विनता कद्रूची दासी होऊन झुरणीस लागली असतां तिच्या अपरोक्ष अंडें फोडून गरुड बाहेर आला. त्याचें अद्वितीय तेज, विजे-सारखे नेत्र आणि प्रचंड शरीर पाहून भयभीत होऊन देव त्याची स्तुति करूं लागले; त्यायोगें संतुष्ट होऊन गरुडानें आपलें शरीर लहान करून तेजही कमी केलें. नंतर गरुडानें आपल्या पाठीवर अरुणास घेऊन आकाशांत उड्डाण केलें; आणि समुद्राचे पूर्वतीरीं जेथें विनता दासी होऊन पडली होती, तेथें त्यास आणून सोडलें. समुद्रमंथनानंतर राहू अमृत पीत असतां ती गोष्ट चंद्र-सूर्यांनीं

देवांस सांगितली. याचा सूड उगविण्याकरितां राहू सूर्याचा पर्वकालीं ग्रास करूं लागला. सूर्यानें योग्य वेळीं इशारत देऊन देवांचें अमृत वांचविलें व सांप्रत देवांकरतांच त्याचेवर हें संकट आलें, तरी जगाचे रीतीप्रमाणें,

सहाय एव कार्येषु न च कृच्छ्रेषु दृश्यते ।

उपकार केलेलीं माणसें आपल्या कामापुरतें पाहणारीं असतात; उपकारकर्त्यावर संकट आलें तर तीं त्यास साहाय्य करण्यास येत नाहींत, हाच सिद्धांत खरा ठरून सूर्याची सुटका कोणीं केली नाहीं. तेव्हां रागानें सर्व लोकांचें व जगाचें भस्म करण्याचा सूर्यानें संकल्प केला. परंतु ब्रह्मदेव व इतर सर्व देव यांच्या आज्ञेवरून अरुणानें सूर्याचें सारथ्य पतकरलें आणि तो त्याचे रथांत अग्रभागीं बसूं लागला. अरुणानें याप्रमाणें सूर्यास आच्छादून त्याचें तेज हरण केल्यामुळें सर्व जग भस्म होऊन जाण्याचा दुर्धर प्रसंग टळला. (आदि. अ० २१–२३).

इकडे कद्रूनें विनतेस अशी इच्छा प्रदर्शित केली कीं, समुद्राचे कुशींत नागांचा प्रदेश असून तो अतिरम्य व एकांताचा आहे, तेथें मला व माझ्या पुत्रांस ने. कद्रूची ही आज्ञा ऐकून विनतेनें कद्रूस व गरुडानें नागांस आपल्या पाठीवर घेतलें, व तीं दोघें आकाशमार्गानें जाऊं लागलीं. पण सूर्याचें तेज सहन न होऊन नाग व्याकुळ होऊन पटापट प्राण सोडूं लागले, तेव्हां कद्रू व तिचे नागपुत्र यांनीं इंद्राची स्तुति केली. तीमुळें प्रसन्न होऊन इंद्रानें जिकडे तिकडे मेघ पसरून मोठा पाऊस पाडला. तेव्हां नाग संतुष्ट होऊन लवकरच समुद्रानजीकच्या रसातळनामक

आपल्या रम्य प्रदेशास पोंचले. पण येथून पुनः आपणांस दुसऱ्या द्वीपास नेण्याबद्दल ते गरुडास सांगूं लागले! आपल्याहून पराक्रमानें कमी असलेले आपले सावत्र भाऊ आपणास असा वरचेवर हुकूम कां करतात, हें कोडें गरुडास उकलेना, तेव्हां त्यानें विचारल्यावरून विनतेनें त्यास सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून गरुडास फार वाईट वाटलें. प्रत्यक्ष आपली माता दास्त्यवांत असूनही जर आपण तिची मुक्तता करण्याचें कार्य आधीं हातीं घेतलें नाहीं, तर आपला पराक्रम तो काय व आपण तिचे पुत्र तरी कसले? असे विचार त्याचे मनांत आले. ' मीं कोणता पराक्रम अथवा महत्कार्य केलें असतां माझ्या मातेस तुम्हीं दास्यत्वांतून मुक्त कराल?' असें गरुडानें नागांस विचारलें. ' आम्हांस अमृत ( सोम ) आणून देशील, तर आम्ही तुझ्या मातेची दासीपणांतून मुक्तता करूं ' असें नागांनीं वचन दिल्यानंतर गरुड अमृत आणण्यास निघाला. आईचा निरोप घेऊन तो जाऊं लागला असतां ती त्यास म्हणाली:—'भक्ष्यार्थ तूं समुद्राच्या बेटांत राहणाऱ्या निषादांचा मात्र संहार कर; ब्राह्मणांचे वाटेस जाऊं नको. कारण—

अग्निरर्को विषं शस्त्रं विप्रो भवति कोपितः।

विनाकारण छळ करून संतापविलेला ब्राह्मण अग्नि, सूर्य, विष किंवा शस्त्र यांप्रमाणें तापदायक, तीक्ष्ण व प्राणघातक होत असतो. यासाठीं तुझे कंठांत आल्यावर जो निखाऱ्याप्रमाणें भाजूं लागेल, तो ब्राह्मण आहे असें समजून तूं त्यास सोडून दे. न सोडतां तूं त्यास तसाच खाशील तर, तो तुला पचणार नाहीं." आईचें हें भाषण ऐकून व तिचा आशि-

आर्शीर्वाद घेऊन गरुड निघाला. तिचे आज्ञेप्रमाणें मार्गांत त्यानें हजारों निषाद भक्षण केले; त्यांत चुकून एक ब्राह्मण आपल्या पत्नीसह त्याचे कंठांत गेला. विनतेनें सांगितल्याप्रमाणें गरुडाचे कंठास ब्राह्मण पोळूं लागतांच त्यानें त्यासच नव्हे, तर त्याच्या निषाद-पत्नीसही सोडून दिलें ! इतक्यांत गरुडाचा पिता कश्यपऋषि हे तेथें आले. 'आईनें सांगितल्याप्रमाणें मीं कितीही निषाद भक्षण केले तरी माझी क्षुधा शांत झाली नाहीं; मला दुसरें एखादें योग्य भक्ष्य सांगा' अशी गरुडानें कश्यपांस विनंति केली. तेव्हां कश्यपऋषि त्यास म्हणाले:–' जवळच्याच एका सरोवरांत एक प्रचंड हत्ती व कूर्म ( कांसव ) यांचें युद्ध चालू आहे; तर त्या दोघांच्या भांडणाची संधि साधून तूं दोघांसही भक्षण कर. हा हत्ती व कूर्म हे पूर्वजन्मीं विभावसु व सुप्रतीक नांवाचे भाऊ भाऊ होते. सुप्रतीकास वांटणी करून भावापासून वेगळें होण्याची इच्छा होऊन तो त्याबद्दल भावास वरचेवर टुमणें लावूं लागला.

विभागं बहवो मोहात्कर्तुमिच्छन्ति नित्यश
ततो विभक्तास्त्वन्योन्यं विरुध्यन्तेऽर्थमोहिताः ॥
ततः स्वार्थपरान्मूढान् पृथग्भूतान् स्वकैर्धनैः ।
विदित्वा भेदयंन्त्येतानमित्रा मित्ररूपिणः ॥

' पण मोहानें किंवा लोभानें वांटणी होऊन भाऊ भाऊ वगळे झाले म्हणजे त्यांच्या हितशत्रूंस चांगली संधि सांपडते: आणि ते या भेदाचा व वैराचा फायदा घेऊन त्यांचा नाश करतात व आपला स्वार्थ साधतात' असा विभावसूनें आपल्या धाकट्या भावास पुष्कळ बोध केला; पण त्यानें आपला हट्ट सोडला नाहीं. तेव्हां 'तूं हत्ती होशील' असा शाप विभावसूनें त्यास

दिला. सुप्रतीकानेंही उलट ‘ तूं कूर्म होशील ’ असा बिभावसूस शाप दिला ! तेच सांप्रत सरोवरामध्यें एकमेकांशीं झगडत बसले आहेत.” क्रोध व परस्पर द्वेष यांच्या जाळ्यांत सांपडल्या-मुळें हे दोघेही बंधु पशुयोनींत जन्मास आले व या पशुयो-नींतही तिसऱ्याच एका जबरदस्तानें भांडणाची संधि साधून भक्षण केलें. कारण, कश्यपांनीं सांगितल्याप्रमाणें गरुडानें त्यांस त्या सरोवराकडे भरारी मारून एका पंजानें हत्ती व दुसऱ्या पंजानें कूर्म उचलून आकाशांत त्वरेनें व वेगानें उड्डाण केलें ! बरेंच पुढें गेल्यावर गरुडास एक प्रचंड रोहिणवृक्ष ( चंदन ) दिसला. त्याच्या एका मोठ्या शाखेवर हत्ती व कूर्म यांस भक्षण करण्याचे इराद्यानें गरुड येऊन बसला, तों त्यांच्या भारानें ती फांदी मोडली. परंतु ती जमिनीवर पडण्यापूर्वींच गरुडानें आपल्या पायांत तशीच अधांतरीं धरून ठेवून हलकेच तोंडांत धरून पुनः गगनांत उड्डाण केलें ! कारण, या फांदीस हजारों वालखिल्य ऋषि उलटे टांगून घेऊन घोर तपश्चर्या करीत होते; त्यांची हत्या होऊं नये, म्हणून गरुडानें असें केलें. हत्ती, कूर्म आणि ती प्रचंड वृक्षशाखा इत-क्यांचा ‘ गुरु ’ भार उचलून ‘ उड्डाण ’ केलें म्हणून ऋषि त्यास ‘ गरुड ’ असें म्हणूं लागले. कांहीं कालानें या सर्व लटांबरांसह गरुड गंधमादन पर्वतावर आला. तेथें कश्यप ऋषि तपश्चर्या करीत होते, त्यांनीं आपल्या पुत्राची व त्याच्या तोंडांतील फांदीस लोंबकळणाऱ्या वालखिल्य ऋषींची ती स्थिति पाहून वालखि-ल्यांची प्रार्थना केली कीं, ‘ माझा पुत्र केवळ लोकहितार्थ हें महत्कर्म करण्यास उद्युक्त झाला आहे. तर त्यावर आपली कृपादृष्टि असावी. ’ ही प्रार्थना ऐकून गरुडाचे तोंडांतली शाखा

सोडून वालखिल्य ऋषि हिमालयावर येऊन तपश्चर्या करूं लागले. गरुडानेंही कश्यपऋषींनीं सांगितलेल्या निर्जन अशा हिमालयाच्या एका खोल व बर्फानें वेढलेल्या दरींत ती शाखा टाकून दिली; आणि जवळच्याच पर्वतशिखरावर बसून त्यानें पायांत धरलेला हत्ती व कूर्म यांस सावकाशपणें भक्षण केलें. याप्रमाणें क्षुधेचें शमन होऊन ताजातवाना झाल्यावर गरुडानें इंद्रलोकाकडे वेगानें उड्डाण केलें. आपलें 'सोमामृत' बलात्कारानें हरण करण्यास गरुड आलेला आहे, हें देवांस कळतांच देव आपआपलीं शस्त्रास्त्रें घेऊन अमृतास वेढून त्याशीं युद्ध करण्यास सज्ज झाले. ( आदि. अध्याय २३–३० )

इंद्राच्या अपराधामुळें व वालखिल्य ऋषींच्या तपःसामर्थ्यामुळें कश्यप व विनता यांचे पोटीं इंद्राचा गर्व हरण करणारा हा गरुड पुत्र उत्पन्न झालेला होता. तो प्रकार असाः—कश्यपऋषि पुत्रकामेष्टि यज्ञ करीत असतां सर्व देव व ऋषि त्यांस साहाय्य करीत होते. इंद्र व वालखिल्य ऋषि यांस यज्ञासाठीं लागणारें इंधन ( सर्पण ) आणण्याचें काम सांगितलें होतें. त्याप्रमाणें इंद्र आपल्या सामर्थ्याप्रमाणें इंधनाचा प्रचंड भारा घेऊन त्वरेनें चालला होता. वाटेंत त्यास असें आढळलें कीं, आंगठ्याएवढे हजारों वालखिल्य ऋषि मिळून मोठ्या कष्टानें पळसाची एक लहान काटकी आणीत होते; व मध्यंतरीं गाईच्या पावलांत सांठलेल्या पाण्यांत व चिखलांत रुतून बेजार झाले होते! हें पाहून इंद्र मोठ्यानें हंसला; व त्यांस ओलांडून तेथून पुढें चालता झाला! ह्या उपमर्दाची निष्कृति करण्यासाठीं वालखिल्यऋषींनीं घोर तपश्चर्या केली. इंद्राहून शौर्यानें व तेजानें शंभर पट श्रेष्ठ असा दुसरा

इंद्रच उत्पन्न होवो ह्या संकल्पानें त्यांनीं हें तप केलें. परंतु खुद्द कश्यपऋषींच्याच मध्यस्थीनें इंद्राचें इंद्रपद कायम राहिलें. कश्यप-पुत्र गरुड हा वालखिल्यांस हवा होता तेवढा प्रबल व पराक्रमी होऊन तो देवांचे ऐवजीं पक्ष्यांचा इंद्र झाला. ( आदि० अ० ३१ ).

सोमामृताचें संरक्षण करण्यासाठीं जमलेले देव व गरुड यांचें घनघोर युद्ध झालें. विश्वकर्मा अमृताचे संन्निध होता; त्याचें व गरुडाचें दोन घटका तुमुल युद्ध होऊन विश्वकर्मा मरण पावला. गरुडाच्या भरारीनें उठलेल्या धुळीनें देव एकमेकांस दिसेनासे झाले, पण इंद्रानें वायूकडून धुळीचे लोट नाहींसे केले. पुनः तुंबळ युद्ध होऊन गरुडाचे पराक्रमानें जर्जर झालेले गंधर्व व सिद्ध पश्चिम दिशेस, रुद्र व वसु दक्षिण दिशेस, आदित्य पूर्व दिशेस व नासत्य उत्तर दिशेस पळून गेले. राहिलेल्या देवांनीं गरुडाचे-भोंवतीं सर्वत्र प्रचंड अग्नि उत्पन्न केला; परंतु आपणास हजारों मुखें उपत्न्न करून त्यांतून नद्यांचें पाणी भरून आणून त्या योगें गरुडानें तो अग्नि विझविला. नंतर पुनः भरारी मारून तो ‘ सोमा-मृता ’ जवळ आला, तों, त्या अमृताचेभोंवतीं, पोलादी तीक्ष्ण पात्यांचें एक प्रचंड तेजस्वी चक्र अत्यंत वेगानें फिरत असलेलें त्याचे दृष्टीस पडलें. देवांनीं निर्माण केलेल्या ह्या दिव्य यंत्राचा मारा चुकविण्यासाठीं गरुडानें सूक्ष्मरूप धारण करून त्या चक्राचे आरांतून आंत प्रवेश केला. तेथें पुनः अमृताचे अगदीं जवळ दोन प्रचंड भुजंग त्याचें रक्षण करीत होते. त्यांचे डोळ्यांत धूळ टाकून गरुडानें त्यांचीं अंगें छिन्नविच्छिन्न केलीं. आणि अमृत घेऊन पुनः पूर्ववत् तो त्या चक्रांतून निसटून बाहेर येऊन आकाश मार्गानें त्वरेनें जाऊं लागला. अशा पराक्रमानें मिळविलेलें हें अमृत

मातेच्या मुक्ततेकरतां असल्यामुळें तें कार्य होण्यापूर्वी तें पिऊन मिळणाऱ्या अमरत्वाचीही गरुडानें इच्छा केली नाहीं. मातृभक्ति व स्वाभिमान यांनीं प्रेरित होऊन तें त्यानें उष्टें न करतां चोंचींत घेऊन चालविलें होतें. गरुडाचा हा पराक्रम पाहून श्रीविष्णूस फारच संतोष झाला; व एकमेकांनीं एकमेकांस वर दिले. अमृतभक्षणाशिवायच तूं अजरामर होशील, असा गरुडास वर मिळाला; व उलट गरुडानेंही श्रीविष्णूचें वाहन व ध्वजचिन्ह होण्याचें कबूल केलें. अशा प्रकारें गरुड अमृत हरण करून नेत असतां इंद्रानें त्याजवर आपलें वज्र टाकलें. हें वज्र ज्या ऋषींच्या अस्थींपासून उत्पन्न झालें, त्या ऋषींचा, वज्राचा व इंद्राचा मान राखण्यासाठीं गरुडानें त्या वज्राचे तडाक्यासरसीं फक्त एकच उत्तम ( सुपर्ण ) पंख खालीं टाकलें. तेव्हांपासून त्यास ' सुपर्ण ' हें नांव प्राप्त झालें. गरुडाची ही उदारबुद्धि व पराक्रम पाहून इंद्रानें त्याशीं सख्य केलें; व ' सोमामृत ' परत मागितलें. पण ' अमृत आपणास एका महत्कार्यार्थ हवें आहे, तें कार्य झालें कीं तूं तें परत घेऊन जा ' असें गरुडानें इंद्रास सांगितलें. त्याप्रमाणें इंद्र त्याचे मागोमाग जाऊं लागला. गरुडाची ही युक्ति ऐकून इंद्रास समाधान झालें. त्यानें प्रसन्न होऊन गरुडाचे विनंतीवरून ' नाग हे तुझें भक्ष्य होतील ' असा त्यास वर दिला. गरुडानें त्वरेनें व वेगानें आपली माता विनता, कद्रु व नाग हीं जेथें होतीं तिकडे जाऊन अमृत दर्भावर ठेवलें; आणि ' आतां माझी माता दास्यत्वांतून मुक्त करा ' असें नागापाशीं हक्कानें मागणें मागितलें. नागांनींही विनतेची मुक्तता केली आणि गरुडाचे सांगण्यावरून, स्नान, जप वगैरे करून शुचिर्भूत होऊन अमृत

प्राशन करण्यास नाग आले. पण ते येण्यापूर्वींच इंद्रानें अमृत परत नेलें होतें ! दर्भांवर पडलेलें अमृत तरी चाटण्यास मिळावें, म्हणून नाग दर्भ चाटूं लागले; पण त्यामुळें **आपल्या सावत्र आईस कपटानें दास्यत्वांत टाकणाऱ्या नागांस तिच्या मुक्ततेप्रीत्यर्थ गरुडानें केलेल्या पराक्रमानें परस्पर मिळालेल्या अमृताचा लाभ न होतां त्यांच्या जिव्हा मात्र मधोमध चिरल्या !**
( आदि० अध्याय–३१–३४ )

आपली माता कद्रु व नागबंधु यांचें हें एकंदर दुष्ट वर्तन पाहून शेषास फार उद्वेग व वीट आला. तो आपल्या मातेचा व भावांचा त्याग करून गंधमादन, हिमालय, गोकर्ण वगैरे ठिकाणीं वायुभक्षण करून तप करूं लागला. त्याच्या तपश्चर्येनें प्रसन्न होऊन ब्रह्मदेवानीं त्यास दर्शन दिलें. तेव्हां शेषानें आपल्या वैराग्याचें व तपःश्चर्येचें कारण त्यांस सांगितलें. तो म्हणाला:— ‘ माझे भाऊ व माता हीं फार दुष्ट आहेत; माझी सापत्न माता विनता व तिचा पराक्रमी पुत्र गरुड यांचा ते द्वेष करतात एवढेंच नव्हे, तर ते **एकमेकांचाही हाडवैऱ्याप्रमाणें द्वेष करतात. अशा दुष्ट व आत्मघातकी बांधवांचा सहवास ह्या किंवा पुढील कोणत्याही जन्मीं मला नको;** एवढें वरदान मला द्यावें ! !’ शेषाची ही प्रार्थना मान्य करून ब्रह्मदेवानीं त्यास इष्ट वर दिला; आणि म्हटलें कीं, ‘ डळमळणाऱ्या पृथ्वीला आपल्या मस्तकीं धारण करून तूं तिला स्थिर कर; व अशा रीतीनें **लोकोपकाराचें पुण्य संपादन कर.** ’ ब्रह्मदेवाच्या ह्या आज्ञेप्रमाणें शेषानें पृथ्वीच्या विवरांतून आंत प्रवेश करून आपल्या अनंत शरीरांनीं तिचें धारण केलें. ( आदि०अध्याय ३६ )

जनमेजयाचे सर्पसत्रांत नागांचा संहार होईल, हा कद्रूचा शाप ऐकून वासुकीप्रभृति नागांस फारच चिंता उत्पन्न झाली. कारण,

**सर्वेषामेव शापानां प्रतिघातो हि विद्यते ।**
**न तु मात्राभिशप्तानां मोक्षः क्व च न विद्यते ॥**

**इतर लोकांच्या शापांचा प्रतिकार करण्याचे उपाय असतात, पण मातेनें शापिलेल्या पुत्रांची त्या शापांतून मुक्तता होणें अशक्य असतें.** तथापि सर्पसत्रांतून आपला बचाव कसा करावा, याचा सर्व नाग एकत्र जमून विचार करूं लागले. अनेकांनीं अनेक बऱ्यावाईट युक्त्या व उपाय सुचविले. ब्राह्मण किंवा जनमेजयाचे मंत्री होऊन सत्र न होण्याची त्यास सल्ला द्यावी. सत्र करणारा खुद्द जनमेजय किंवा सत्रकर्ता अथवा सर्पसत्रविधि जाणणारे सर्व ऋत्विज, व उपाध्याय यांस दंश करून ठार मारावें, अगर यज्ञद्रव्यें भ्रष्ट करावीं किंवा चोरावीं, अग्नि विझवून टाकावा, असे अनेक उपाय अनेकांनीं सुचविले; परंतु वासुकी, एलापत्र वगैरे धार्मिक नागांस ते आवडले नाहींत. कारण,

**सम्यक्सद्धर्ममूला वै व्यसने शांतिरुत्तमा ।**
**अधर्मोत्तरता नाम कृत्स्नं व्यापादयेज्जगत् ॥**

**सद्धर्मानें वागत असतां संकटांत मरण आलें तरी तें उत्तम आहे; पण अधर्ममार्गानें संकटांतून मुक्तता झाली तरी तीमुळें मुक्त झालेल्यांचाच काय पण सगळ्या जगाचाही नाश होईल,** हें तत्त्व ते जाणून होते. कद्रूनें शाप दिला, त्या वेळीं एलापत्र नागमातेच्या पोटाशीं भीतीनें चिकटून बसला होता. त्यानें त्या वेळीं ब्रह्मदेव व इतर देव यांचें झालेलें भाषण ऐकिलें होतें, व त्यांतच शापमुक्तीचा जो उपाय ब्रह्मदेवांनीं सांगि-

तला होता, तो एलापत्रानें सर्वांस निवेदन केला. तो म्हणाला:—" जनमेजयाचे सर्पसत्रांत दुष्ट, दुराचरणी व विषारी जेवढे नाग आहेत तेवढ्यांचाच संहार होणार असून धार्मिक व सुबुद्धीचे जे नाग आहेत, त्यांचें संरक्षण जरत्कारूचा पुत्र करील. आणि जरत्कारूस हा पुत्र सारख्या नांवाच्या स्त्रीचे पोटीं मात्र होईल." हा उपाय सर्वांस पसंत पडला. वासुकीची जरत्कारु या नांवाची बहीण होती; तिचें पालनपोषण करून तिला योग्य वेळीं जरत्कारूस देण्याची वासुकी वाट पाहत बसला. (आदि.अ.३७–३९)*

## परीक्षित राजाचा वध.







अभिमन्यूचा पुत्र जो परीक्षित राजा त्यानें आपल्या वयाचे ६० वर्षांपर्यंत हस्तिनापुर येथें राजधर्माप्रमाणें प्रजापालनपूर्वक राज्य केलें. त्यास पांडुराजाप्रमाणेंच मृगयेचा अतिशय नाद होता. पुढें एकदा तो वनांत मृगया करीत असतां पायींच एका मृगाचे पाठीस लागला. त्याच्या बाणानें जखमी झालेला तो मृग वेगानें जीव घेऊन पळत होता, व राजाही त्याचा पाठलाग जास्त नेटानें करीत होता. याप्रमाणें पाठलाग करीत असतां राजा तहानेनें, भुकेनें व श्रमानें व्याकुळ होऊन शमीकऋषींच्या आश्रमाजवळ आला. तेथें शमीकऋषि मौनव्रत धारण करून बसले

* जरत्कारूचा विवाह व आस्तिक-जन्म ही कथा मागें पृ.१७–१९त आली आहे.

होते. गाईच्या थानांचें दूध पीत असतां वांसरांचे तोंडास जो फेंस लागे, तो मात्र हे ऋषि पीत असत. 'बाणानें घायाळ झालेला मृग कोणीकडे पळाला?' असें राजानें शमीकांस अनेकदा विचारलें; पण त्यानीं मौनव्रत घेतलें असल्यामुळें राजाचे प्रश्नांस मुळींच उत्तर दिलें नाहीं. भूक, तहान, श्रम व वार्धक्य यांनी त्रस्त झालेल्या राजास शमीकांच्या मौनाचें खरें कारण ठाऊक नसल्यामुळें त्यास फार क्रोध आला; व मेलेल्या सापाचें वेटोळें धनुष्याचे टोंकानें त्यांचे खांद्यावर ठेवून परीक्षित राजा हस्तिनापुरास परत आला. परीक्षित राजानें एवढा उपमर्द केला तरी शांत व क्षमाशील शमीक त्यास कांहीं बोलले नाहींत किंवा त्याजवर रागावलेही नाहींत, अथवा त्यानीं आपल्या खांद्यावरील सर्पही काढून टाकला नाहीं! परंतु शमीकाचा गाईचे पोटीं झालेला पुत्र शृंगी आपल्या पित्यासारखा शांत व क्षमाशील नव्हता. कृशनामक गुरुबंधूनें परीक्षिताचें हें कृत्य शृंगीला कळविलें; एवढेंच नव्हे, तर 'तूं एवढा तपस्वी असून परीक्षितानें तुझ्या बापाचा असा उपमर्द करावा ना! तुझी घमेंड व्यर्थ आहे.' असा त्याच्या तेजाचा, तपःसामर्थ्याचा व रागीट स्वभावाचा उपहास केला. "माझ्या वृद्ध पित्यानें राजाचा कोणताही अपराध केला नसतां व तो मौनव्रत धरून बसला असतां दुरात्म्या, पापी, कुरुकुलास कलंक लावणाऱ्या व ब्रह्मद्वेषी परीक्षित राजानें त्याची ज्या अर्थी अशी मानहानि केली आहे, त्या अर्थी आजपासून सात दिवसांचे आंत नागराज तक्षक दंश करून त्याला यमसदनीं पाठवील" असा भयंकर शाप शृंगी ऋषीनें त्यास दिला; व आश्रमांत येऊन त्यानें ही सर्व हकीकत आपल्या पित्यास सांगितली. ती ऐकून शमीकास फार

वाईट वाटलें. तो म्हणाला:--" बिचाऱ्या परीक्षितराजानें अज्ञानानें व भूक, तहान आणि श्रम यांनीं पीडित झाल्यामुळें तसें कृत्य केलें आहे; त्याबद्दल त्यास तूं शाप दिलास, हें पोरकटपणाचें व मूर्खपणाचें कृत्य झालें. परीक्षित हा आपला राजा असून आपण त्याचे देशांत राहत आहों; **राजा हा दहा श्रोत्रियांच्या योग्यतेचा आहे,** असें मनुवचन असून **राजावरच प्रजेचे चतुर्विध पुरुषार्थ अवलंबून आहेत; त्या अर्थी राजाचे हातून कांहीं अपराध झाला तरीही आपणांसारख्या तपस्व्यांनीं त्यास क्षमाच केली पाहिजे. कारण मोठ्या तपश्चर्येनें संचित केलेलें पुण्य व सामर्थ्य असल्या रागानें त्वरित नाहींसें होत असतें.**" शमीकऋषीनीं आपल्या पुत्राची याप्रमाणें पुष्कळ समजूत घातली पण त्याचा राग शांत झाला नाहीं; किंवा त्यानें शापही परत घेतला नाहीं. " याला तुम्ही साहस म्हणा कीं दुष्कृत्य म्हणा; मी एकदा जें बोललों, माझ्या मुखांतून एकदा जी वाणी निघाली, ती कधींही असत्य होणार नाहीं. **माझी आजपर्यंतची सत्यनिष्ठाच तशी आहे.**" एवढें मात्र शृंगीनें आपल्या पित्यास उत्तर दिलें. आपला पुत्र आपलें ऐकत नाहीं असें पाहून **शमीकानें** आपला शिष्य **गौरमुख** यास **परीक्षितराजाकडे** पाठविलें; व मुलानें दिलेल्या शापाची वार्ता त्यास कळवून ' माझ्या पुत्राच्या या मूर्खपणाची क्षमा कर; व सात दिवस स्वतःचें मोठ्या बंदोबस्तानें संरक्षण कर. ' असेंही त्यानें राजास बजावलें. **गौर**-मुखाचे तोंडून ही सर्व हकीकत ऐकून **परीक्षितराजास** अत्यंत दुःख झालें. ' शमीकासारख्या परम तपस्वी व क्षमाशील ऋषीचा आपण उपमर्द केला, तरी तो आपणावर रागावला नाहीं; एवढेंच

नव्हे तर त्यानें उलट आपणास पुढील प्राणसंकटाची ममतेनें आगाऊ इशारतही दिली; अशा शांत, दयार्द्र व क्षमाशील ब्राह्मणाचा अपराध व उपमर्द आपले हातून घडला.' यांचेंच त्यास स्वतःच्या नजीक आलेल्या मृत्यूपेक्षांही अधिक वाईट वाटलें. तथापि तें सर्व दुःख गिळून त्यानें आपल्या मंत्र्यांचे सल्यानें एक वाडा एका खांबावर उभा असलेला असा तयार केला; व तेथें तो मोठ्या बंदोबस्तानें राहून राज्यकारभार पाहूं लागला. त्या वाड्याचे भोंवतीं सक्त पहारा ठेवून आणि मंत्रवेत्ते ब्राह्मण, मांत्रिक व वैद्य यांसही तेथें आणवून आपल्या संरक्षणाची व औषधोपचाराची जय्यत तयारीही त्यानें करून ठेविली.

याप्रमाणें सहा दिवस होऊन गेले. सातवे दिवशीं काश्यप नांवाचा मंत्रवेत्ता ब्राह्मण परीक्षितराजाकडे जाण्यास निघाला. 'तक्षकानें दंश केल्यानंतर आपण राजाचें विष उतरून त्यास बरें करावें म्हणजे आपणास पैसाही मिळेल व आपले हातून परोपकारही घडेल. असा त्यानें मनांत विचार केला. पण वाटेंत काश्यप व तक्षक यांची गांठ पडली. तक्षकानें एका प्रचंड न्यग्रोध (वड) वृक्षास दंश करून तो अगदीं जाळून टाकला; आणि 'या माझ्या विषाचे प्रभावावर तुझ्या विद्येची व मंत्रांची काय मात्रा चालते ती पाहूं' असें त्यानें काश्यपांस आव्हानही केलें! तें स्वीकारून काश्यपानीं आपल्या विद्येच्या व मंत्राच्या बलानें तो न्यग्रोध वृक्ष पुनः सजीव केला! तेव्हां तक्षक त्यांस म्हणाला:— "तुमच्या मंत्राचें सामर्थ्य मला आतां प्रत्यक्ष दिसून आलें. पण परीक्षितराजास ब्राह्मणाचा शाप झालेला आहे व त्याचें आयुष्यही संपलें आहे, त्या अर्थीं तुम्हीं राजाकडे जाऊं नये; कारण तुमच्या विद्येस

अपयश येईल. तुम्ही राजाकडून जेवढें द्रव्य घेणार तेवढें मीच तुम्हांस देतों; तुम्ही परत जावें." काश्यपानीं क्षणभर विचार केल्यावर, तक्षकाचें बोलणें सत्य आहे, असें त्यांस अंतर्ज्ञानानें कळलें; व ते तक्षकापासून धन घेऊन परत गेले.

तक्षक हस्तिनापुरास आल्यावर राजानें केलेल्या सक्त बंदोबस्ताची त्यास वार्ता कळली. त्यानें आपल्याबरोबरच्या नागांस तपस्वी ब्राह्मणांचा वेष दिला; आणि दर्भ, उदक व फळें त्यांजपाशीं देऊन त्यांस राजाचे भेटीस पाठविलें. परीक्षितराजानें त्यांचा सत्कार करून त्यांनीं आणलेले दर्भ, उदक व फळें यांचा आदरपूर्वक स्वीकार केला. हे मायावी तपस्वी निघून गेल्यानंतर आपले मंत्री व आप्त यांसह राजा तीं फळें खाऊं लागला. दैवयोगानें एक फळ हातीं घेऊन तो खाऊं लागला असतां त्यांतून एक फार लहान अशी तांबड्या रंगाची व काळ्या डोळ्यांची आळी निघाली. ती हातांत घेऊन परीक्षितराजा ऐटीनें आपल्या सचिवांस म्हणाला:—'हा पहा, सूर्य अस्तास चालला आहे! आतां मला सर्पविषाचें भय नाहीं! पण श्रृंगी ऋषींचा शब्द खरा करण्यासाठीं ह्या अळीचेंच आपण तक्षक नांव ठेवूं; ती मला दंश करो; असें म्हणून परीक्षितराजानें ती अळी आपलें कंठास लावली, व तो मोठ्यानें उपहासपूर्वक हांसला! त्याचें हंसें संपतें न संपतें तोंच त्या अळीचा प्रचंड तक्षक नाग होऊन त्यानें झपाट्यानें परीक्षिताचे गळ्याभोंवतीं बळकट वेढे घालून व मोठा फूःत्कार करून त्यास कडकडून दंश केला; तेव्हां राजा आपला जीव वांचविण्याची धडपड करूं लागला! हा भयंकर प्रकार पाहून तेथें जमलेले मंत्री व इतर लोक पळून गेले; व परीक्षित विजेनें



परीक्षितराजा आपला जीव वांचविण्याची धडपड करूं लागला.

होरपळल्याप्रमाणें गतप्राण होऊन पडला! पुढें ह्या मंत्र्यांनीं व उपाध्यायांनीं परीक्षिताचा बाल राजपुत्र जनमेजय यास सिंहासनावर बसवून राज्यकारभार पूर्ववत् चालविला. पुढें योग्य कालीं काशीराजा सुवर्णवर्मा याची कन्या वपुष्टमा इजशीं जनमेजयाचा विवाह झाला. तो तिजवर अत्यंत प्रेम करीत असून तिजवांचून अन्य स्त्रीकडे त्याचें मन केव्हांही गेलें नाहीं. ( आदि. अ. ४०–४४ व अध्याय ४९–५० )

---

## सरमेचा शाप.



परीक्षित राजाचा वडील राजपुत्र जनमेजय हा कुरुक्षेत्रांत दीर्घसत्र नांवाचा यज्ञ करीत होता. श्रुतसेन, उग्रसेन व भीमसेन या आपल्या भावांसह तो यज्ञमंडपांत बसला असतां, देवशुनी (कुत्री) सरमा हिचा पुत्र सारमेय तेथें आला. जनमेजयाचे भावांनीं त्यास मारल्यामुळें तो केंकटत आपल्या आईकडे गेला. " मीं जनमेजयाचे यज्ञांतील हविर्भागास स्पर्श केला नाहीं किंवा त्यांजकडे पाहिलें सुद्धां नाहीं, अथवा त्यांचा दुसराही कोणता अपराध केला नाहीं. असें असतां मला निरपराध्याला जनमेजयाच्या भावांनीं विनाकारण मारलें. " अशी त्यानें आपल्या आईजवळ कागाळी केली. पुत्राच्या दुःखानें कळवळून जाऊन सरमा यज्ञमंडपाकडे गेली; व ' माझ्या मुलानें कोणताही अपराध केला

नसतां त्यास कां मारलें ?' असा तिनें जनमेजयास प्रश्न केला. जनमेजय त्या प्रश्नास उत्तर न देतां स्वस्थ बसला. तेव्हां रागानें तिनें त्यास शाप दिला कीं, ' तुम्हीं ज्या अर्थी निरपराधी प्राण्यास मारलें, त्या अर्थी तुम्हांस लवकरच अकल्पित भय प्राप्त होईल ! ' सरमेचा हा शाप ऐकून जनमेजय राजा गोंधळून गेला; व उद्विग्न चित्तानें कसातरी यज्ञ समाप्त करून हस्तिनापुरास परत आला. आपल्या या पापकर्माचें परिमार्जन योग्य उपायानें करील, अशा प्रकारच्या पुरोहिताचा त्यानें पुष्कळ शोध केला। परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढें एके समयीं जनमेजय राजा आपल्या देशांतील एका अरण्यांत मृगया करीत असतां त्यास एक आश्रम दिसला. हा आश्रम श्रुतश्रवा नांवाच्या ऋषींचा असून त्याचा सोमश्रवानामक एक मोठा तपस्वी पुत्र होता. ह्या पुत्रास आपलें पौरोहित्य करण्यास ऋषींनीं पाठवावें, अशी राजानें श्रुतश्रवा ऋषींस विनंति केली. तेव्हां ते म्हणाले:—" हा माझा पुत्र महातपस्वी, वेदवेत्ता व ब्रह्मचारी असून माझें शुक्र प्याल्यामुळें एका नागिणीचे पोटीं हा झाला आहे. हा ' महादेवकृत्या ' खेरीजकरून तुझ्या इतर सर्व पापकृत्यांचें निवारण करील. मात्र याचें एक कडक व्रत असें आहे कीं, कोणत्याही ब्राह्मणानें याजजवळ कोणतीही वस्तु मागितली तर ती त्यास द्यावयाची. हें त्याचें व्रत पालन करण्याचा जर तूं पत्कर घेत असलास, तर त्यास तूं आपल्याबरोबर खुशाल ने." श्रुतश्रवाऋषींचें हें म्हणणें मान्यकरून जनमेजयानें सोमश्रवाऋषींस आपल्याबरोबर नेऊन त्यांस राजपुरोहित केलें. ' आपला पुरोहित जें जें मागेल तें तें त्यास विचार न करतां देत जा ' अशीही आपल्या भावांस जनमेजयानें

आज्ञा केली. या आज्ञेप्रमाणें वागण्याचें त्यांनीं वचन दिल्यानंतर जनमेजय तक्षशिला नगरास गेला; व तो देश त्यानें जिंकला. विजयी होऊन जनमेजय हस्तिनापुरास परत आल्यावर गुरूचा आशीर्वाद घेऊन तेथें उत्तंकऋषि आला होता. आपल्या बलाचे गर्वानें फुगून जाऊन तक्षकानें आपल्या गुरुकार्यांत विघ्न केलें ह्याबद्दलचा राग उत्तंकाचे मनांत अद्याप कायम होता. त्यानें जनमेजयाकडे जाऊन, तक्षकानें त्याचे निरपराधी पित्यास कसें मारलें, ' हें निवेदन केलें. व शेवटीं तो म्हणाला:—' सर्पसत्र करून तक्षक-कुलाचा संहार करशील व अशा रीतीनें बापाचा सूड उगवशील तरच पित्याचे ऋणांतून तूं मुक्त होशील, व मला विघ्न करणाराचा निःपात झाल्याचें पाहून मलाही संतोष होईल. ' उत्तंकाची ही मसलत जनमेजयास पसंत पडून सर्पसत्र करण्याचा त्यानें विचार केला. ( आदि० अध्याय ३ )

तक्षकानें परीक्षितराजाचा कसा वध केला, त्याची सविस्तर हकीकतही त्या वेळीं प्रत्यक्ष हयात असलेल्या वृद्ध मंत्र्यांकडून जनमेजयास कळून आली. ( आदि० अ० ४९–५० ) त्यामुळें तर त्याचा क्रोध जास्तच वाढला; व त्यानें सर्पसत्र करून तक्षक कुळाचा संहार करण्याचा पक्का निश्चय केला. तो म्हणाला:—" तक्षकानें शृंगी ऋषीच्या शापाचें केवळ निमित्त करून माझ्या पित्याचा खून केला आहे. शिवाय पैसा देऊन काश्यप ब्राह्मणास त्यानें परतविलें, ह्यावरून तर त्याची दुष्ट बुद्धि व्यक्त होत आहे. काश्यपानें येऊन माझ्या बापास जिवंत केलें असतें तर तक्षकाचें काय जात होतें? परीक्षितराजा मरावा म्हणून त्यानें द्रव्यलोभी काश्यपास येऊन परतविलें द्रव्य हा त्याचा

महान् अपराध झाला असून त्याबद्दल त्यास सर्पसत्रद्वारें शासन झालेंच पाहिजे. तक्षकानें जसें माझे पित्यास विषाचे आगीनें होर-पळून टाकलें, तसें त्यासही प्रत्यक्ष अग्नीमध्यें भाजून काढणें, माझें कर्तव्य आहे ! "

---

## सर्पसत्र.





उत्तंक व जनमेजय यांचा हा विचार सर्वांस पसंत पडून विधिपूर्वक सर्पसत्राची तयारी सुरू झाली. यज्ञमंडप तयार होत असतां, तो बांधण्याचें काम ज्यावर सोंपविलें होतें तो वृद्ध सुतार म्हणाला कीं, ' यज्ञभूमि मोजण्याचें काम ज्या वेळीं व ज्या स्थळीं सुरू झालें. त्यावरून ह्या यज्ञास एका ब्राह्मणामुळें विघ्न उपस्थित होऊन यज्ञ शेवटास जाणार नाहीं असें दिसतें. ' पण यावर जनमेजयानें उत्तर दिलें कीं, ' मला न कळत असें विघ्न करणारा कोणींही ब्राह्मण यज्ञमंडपांत येऊं शकणार नाहीं; त्याबद्दल काळजी करणें नको. ' सर्व तयारी झाल्यावर सर्पसत्रास यथाविधि सुरवात झाली. चंडभार्गव, कौत्स, सारंगव, पिंगल यांस अनुक्रमें होता, उद्गाता, ब्रह्मा, व अध्वर्यु यांचीं कामें देण्यांत आलीं व व्यासादि ऋषि सदस्य झाले. याप्रमाणें नेमलेले ऋत्विज काळीं वस्त्रें नेसून यज्ञ करूं लागतांच लक्षावधि लहानमोठे नाग अग्नींत पडून जळून गेले; व यज्ञमंडप नागांचे आक्रोशांनीं व त्यांच्या जळ-

णाऱ्या चरबीच्या घाणीनें भरून गेला! जनमेजयानें सर्पसत्राची दीक्षा घेतल्याचें ऐकून तक्षक इंद्राकडे जाऊन, आश्रयास राहू-देण्याविषयीं त्याची याचना करूं लागला; तेव्हां त्यानेंही त्यास अभय देऊन आपल्याजवळ ठेवून घेतलें. इकडे वासुकीलाही सत्राची बातमी ऐकून मोठी चिंता उत्पन्न झाली. त्यानें आपल्या बहिणी-कडून आस्तिकास सर्व हकीकत निवेदन करून त्यास जनमेज-याचे यज्ञाकडे पाठविलें. आपल्या मातेच्या आज्ञेवरून मातुल-कुलाचें संरक्षण करण्यासाठीं आस्तिकऋषि यज्ञमंडपापाशीं आले; पण द्वारपालांनीं त्यांस आंत सोडलें नाहीं. परंतु आस्तिकानीं जन-मेजयाची, त्याच्या यज्ञाची, ऋत्विजांची व सभासदांची अशी व इतकी स्तुति केली कीं, ते सर्व खूष झाले. जनमेजयासही परम संतोष होऊन त्यानेंही आस्तिकास वर देऊं केला. परंतु, ज्या-साठीं सर्पसत्र केलें तो तक्षक अद्याप अग्नींत येऊन पडला नाहीं, हें सर्वांच्या लक्षांत आलें; व तो येऊन पडेपर्यंत वर देऊं नये. असें ठरलें. तक्षक इंद्राचे आश्रयास जाऊन राहिला आहे, हें कळतांच, जनमेजयानें, इंद्रासुद्धां तक्षकास बोलवा, असें ऋत्विजांस रागानें सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं मंत्र म्हणतांच इंद्र व तक्षक दोघेही यज्ञकुंडावर आकाशांत आले! आपणावर ओढवलेलें हें अकल्पित संकट पाहून, आपल्या उत्तरीय वस्त्रांतील तक्षक-नाग काढून खालीं टाकून इंद्र चालता झाला! तक्षक आकाशां-तून खालीं पडत यज्ञकुंडाकडे येत आहे, असें पाहून आस्तिकानें तीनदां 'तिष्ठ, तिष्ठ, तिष्ठ' (थांब, थांब, थांब) असें म्हणून त्यास आकाशांतच लोंबकळत ठेवलें! इकडे आकाशांतून तक्षक अग्नींत येऊन पडत आहे, असें दिसतांच आपला कार्यभाग झाला

असें वाटून, जनमेजयानें आस्तिकास वर मागण्याची विनंति केली. आस्तिकानें हें सर्पसत्र आतां बंद कर, हा वर मागितला! आस्तिकाचें हें भाषण ऐकून जनमेजयास फार वाईट वाटलें. 'वाटेल तितकें धन, द्रव्य, गाई मागा, पण हा वर मागूं नका;' असें त्यानें आस्तिकास पुष्कळ विनविलें. परंतु मातेची आज्ञा व मातुलकुलास दिलेलें अभयवचन यांच्या भंगाचे पातकापुढें धनांच्या राशीची किंमत त्यास कांहींच वाटली नाहीं. अखेर जनमेजयानेंही ब्राह्मणास दिलेलें वचन खरें करण्यासाठीं सर्पसत्र बंद केलें; आणि सर्व ऋत्विज, सभासद व आस्तिक यांची सन्मानपूर्वक संभावना करून त्यांस निरोप दिला. यज्ञास विघ्न होईल असें भविष्य ज्या सुतारानें वर्तविलें होतें, त्यासही जनमेजयानें पुष्कळ द्रव्य देऊन संतुष्ट केलें. आस्तिकऋषिही कृतकृत्य होऊन मातेकडे परत आले असतां तिनें व वासुकीनें त्यांची पुष्कळ वाहवा केली; आणि 'जे तुझें नामस्मरण करतील त्यांचे वाटेस नाग किंवा सर्प जाणार नाहींत' असा वरही आस्तिकास दिला. ( आदि. अध्याय ५१–५८ )



# शकुंतला-चरित्र.



पौरव वंशांत दुष्यंत नांवाचा महापराक्रमी राजा होऊन गेला. त्याची सत्ता देशाचे सर्व समुद्र-किनाऱ्यांपर्यंत पसरली होती. त्याचे राज्यांतील सर्व चतुर्वर्णी प्रजा आपापलीं कर्तव्यें निरपेक्षतेनें करीत असत. त्याचे राज्यांत वेळचे वेळीं पाऊस पडे. सस्य-धान्यें सकस निपजत; आणि धन, रत्नें व पशु यांचीही त्याचे राज्यांत समृद्धि असे. त्याचे प्रजाजनांस चोरांचें, दुष्काळाचें, किंवा सांथीचें बिलकूल भय नसे. स्वतः राजाही तरुण, धर्मनिष्ठ, धनुर्विद्याकुशल व बलवान् असा होता. विष्णूसारखें बल, सूर्यासारखें तेज, समुद्रासारखी शांतता व गांभीर्य आणि पृथ्वीसारखी सहनशीलता हे सद्‌गुण त्याचे अंगीं एकवटले होते. (आ० अ० ६८)

एके दिवशीं दुष्यंत राजा चतुरंग सैन्य आणि शिकारीचे घोडे व हत्ती बरोबर घेऊन मृगयेस निघाला. राजधानीच्या राजमार्गांतून हत्तीवरून तो जात असतां प्रजाजन दुतर्फा उभे राहून आशीर्वाद देत त्याचा जयजयकार करीत होते; आणि खिडक्यांतून व गच्च्यांवरून स्त्रिया त्याजवर पुष्पवृष्टि करीत होत्या. याप्रमाणें राजधानींतून बाहेर पडल्यानंतर रथांतून कांहीं वेळ प्रवास केल्यावर एक मोठें निर्जन व निर्जल अरण्य त्यास लागलें. त्यांत खैर, बेल, कवठी, अर्क, (रुई) धाव इ० झाडें गजबजून गेलीं होतीं. पर्वतांवरून कोसळून पडलेल्या अनेक शिळांनीं तें दुर्गम

झालें होतें; सिंह, वाघ व इतर क्रूर श्वापदें यांनींही तें भरलेलें होतें. अशा प्रकारच्या वनांत शिरून दुष्यंत सैन्यासह शिकार करूं लागला. त्यानें अनेक वाघ, हरिणें व इतर जंगली जनावरें मारलीं. हरणांचे कळप ओरडत भीतीनें भैरावैरा धावूं लागले. तृषेनें व भुकेनें जर्जर होऊन भूमीवर पडलेले असे कित्येक हरीण भुकेलेल्या वाघांनीं खाऊन टाकले. शिकारी लोकांच्या बाणांच्या जखमा झाल्यामुळें क्रुद्ध होऊन रानहत्तींनीं दुष्यंताचे कांहीं लोक पायांखालीं तुडवून मारले; कांहींनीं भुकेनें व्याकुळ होऊन मांस शेकोटीवरच भाजून कुटून खाल्लें. ( आदि०अ०६९. )

याप्रमाणें मृगया करून हजारों श्वापदें मारल्यानंतर एका मृगाचा पाठलाग करीत असतां एक मोठें ओसाड मैदान ओलांडून दुष्यंतराजा दुसऱ्या वनांत शिरला. ह्या वनांत अनेक जातींचे लहान मोठे वृक्ष असून ते फुलांनीं गजबजले व फळांनीं वांकले होते; कोकिलादि अनेक पक्ष्यांच्या, झिल्लीनामक किड्यांच्या व भ्रमरांच्या शब्दांनीं तें वन भरून गेलें होतें; आणि मंद, शीतळ व सुगंधित वारा सर्वत्र वाहत होता. मोटमोठ्या वृक्षांची दाट व गार छाया पडली होती; व हे वाऱ्यानें हालले म्हणजे त्यांच्या पुष्पांनीं खालच्या सावलींत पुष्पशय्याच बनत असत. कांहीं गगनचुंबित वृक्ष उंच ध्वजासारखे दुरून दिसत. ठिकठिकाणीं हिरव्यागार व कोवळ्या गवतांनीं जमीन व्यापलेली होती; व ठायीं ठायीं लता-गृहेंहीं बांधलीं होतीं. अशा प्रकारचें मालिनी नदीच्या तीरीं असलेलें हें रम्य वन पाहून दुष्यंतराजाची तहान-भूक हरली. या वनांत आणखी प्रवेश केल्यावर हें ऋषींच्या अनेक आश्रमांनीं वेष्टिलेलें तपोवन आहे, असें त्यास दिसून आलें.

नदीतीरास लागून ऋषींचे अनेक आश्रम वसले असून मालिनी नदी, आलिंगन देणाऱ्या मातेप्रमाणें त्या आश्रमांस वळसा घालून वाहत होती! नदीमध्यें लहान बेटें अनेक असून तिचें पाणी स्वच्छ, शीतळ व पवित्र होतें; आणि तिच्या विस्तीर्ण वाळवंटावर चक्रवाक व मोर यांचे थवे हिंडत होते. रानहत्तींचे व हरणांचे माण-साळलेले कळप इतस्ततः संचार करीत होते. अशा प्रकारचें तें मनोहर तपोवन पाहून ऋषींचें दर्शन घेण्याची राजाला उत्कंठा झाली. त्यानें तपोवनाचे बाहेरच आपलें सर्व सैन्य ठेवलें; आणि आपलीं सर्व राजभूषणें काढून विनयपूर्वक साध्या पोषाखानेंच कांहीं अमात्य व पुरोहित एवढीच मंडळी बरोबर घेऊन राजानें आश्रमांत प्रवेश केला. जप-होम करणारे तपस्वी, यज्ञयाग करणारे मुनि, चतुर्वेदांचें अध्ययन करणारे ऋषि व इतर अनेक शास्त्रांचा अभ्यास करणारे ब्राह्मण यांच्या गंभीर ध्वनीनें तो आश्रम दुम-दुमून गेला होता. हे सर्व आश्रम, ठिकठिकाणीं मांडलेलीं विचित्र आसनें, व देवालयें पाहून झाल्यानंतर दुष्यंतराजा अमात्य व पुरो-हित यांस तेथेंच ठेवून एकटाच कश्यपपुत्र कण्वऋषि यांच्या आश्रमाकडे निघाला. हा आश्रम इतरांपासून कांहींसा दूर, एकांत व विशेष रम्यस्थलीं वसला होता. ( आदि० अ० ७० )

दुष्यंत राजा कण्वऋषींच्या आश्रमांत जाऊन पाहतो तों त्यास तेथें कोणींही दिसेना, कण्वऋषिही तेथें दृष्टीस पडेनात. तेव्हां ( क इह ) 'येथें आश्रमांत कोण आहे?' असा त्यानें मोठ्यानें प्रश्न केला. राजाचा हा शब्द ऐकून एक तापसी वेष धारण केलेली पण तरुण व अत्यंत सुस्वरूप कन्या—ह्या आश्रमाची जणूं मूर्तिमंत लक्ष्मीच—'स्वागतं ते' (तुमचें स्वागत असो) असें म्हणत

बाहेर आली ! तिनें राजाचें यथोचित स्वागत करून त्यास बसावयास आसन दिलें, व अतिथीस योग्य अशी त्याची पूजा करून त्यास कुशल प्रश्न विचारले. 'कण्वऋषींच्या दर्शनास मी आलों आहें, ते कोठें आहेत ?' असा दुष्यंतानें कन्येला प्रश्न विचारला. तेव्हां 'माझा पिता फळें आणण्यासाठीं वनांत गेला आहे; घटकाभर थांबा, म्हणजे तुम्हास त्यांचें दर्शन होईल.' असें शकुंतलेनें त्यास उत्तर दिलें. शकुंतलेचें तें अद्वितीय रूप, यौवन, विशेषतः **तपानें व मनोनिग्रहानें आलेलें अपूर्व तेज** हीं पाहून राजाचें मन तिजवर तात्काल बसलें. आणि, 'ती कोणाची कोण व येथें आश्रमांत कां राहिली आहे' हें जाणण्याची इच्छा त्यानें प्रदर्शित केली. तेव्हां 'मी कण्वाची मुलगी आहें,' असें शकुंतलेनें हसत हसत हळूच उत्तर केलें. कण्वऋषि हे नैष्ठिक ब्रह्मचारी असून त्यांची ही कन्या कशी ? हे ऋषि आपल्या व्रतापासून केव्हांही ढळणार नाहींत; तेव्हां त्यांस ही मुलगी कशी होणार ?' असे संशय दुष्यंताचे मनामध्यें आले; व ते त्यानें शकुंतलेस बोलूनही दाखविले. तेव्हां पूर्वीं एके प्रसंगीं कण्वऋषींनीं दुसऱ्या एका ऋषीस सांगितलेलें आपलें पूर्ववृत्त तिनें दुष्यंतास निवेदन केलें.

ती म्हणालीः-- "पूर्वीं विश्वामित्रऋषि घोर तपश्चर्या करूं लागले, त्यामुळें इंद्राचे मनांत मोठी भीति उत्पन्न झाली. त्यांचे तपांत विघ्न आणून त्यांस तपोभ्रष्ट करण्याचे कामीं इंद्रानें मेनका अप्सरेची योजना केली. परंतु विश्वामित्रऋषींचा तपःप्रभाव व कोपिष्ठ स्वभाव तिला माहीत असल्यामुळें, 'आपण त्यांजसमोर जाऊन शृंगारचेष्टा करूं लागल्यास रागानें शाप देऊन कदाचित् ते आपणांस भस्मच करून टाकतील' अशी तिला भीति वाटली. परंतु

इंद्रानें तिचे मदतीस वायु, मदन वगैरे देऊन तिच्या संरक्षणाची पुरती तजवीज केली; व तिला विश्वामित्राकडे पाठविलें. ( आदि०अ०७१ ) विश्वामित्र हिमालय पर्वतावर मालिनी नदीचे तीरानजीकचे आश्रमांत तपश्चर्या करीत होते. तेथें जाऊन मेनका नदीमध्यें जलक्रीडा करूं लागली; तोंच वाऱ्यानें तिचें तीरावर ठेवलेलें शुभ्र वस्त्र उडवून दूर नेलें. तेव्हां ती गोंधळून जाऊन व लज्जित होऊन तशीच नदींतून विश्वामित्रांचे आश्रमाकडे आली. तिचें सुरूप, तारुण्य, कंठमाधुर्य, शृंगारचेष्टा व सस्मित भाषणें यांचा विश्वामित्रासारख्या कडकडीत तपोनिष्ठ मुनीवरही परिणाम होऊन त्याचें मन अनावर झालें. मालिनी नदीचे तीरीं दोघांनीं अनेक दिवस क्रीडा व विलास केले. शेवटीं विश्वामित्रापासून झालेली कन्या मालिनीचे तीरावर टाकून कृतकार्य होत्सातां मेनका इंद्रलोकीं गेली. इकडे त्या तान्ह्या कन्येभोंवतीं जमून शकुंतपक्षी तिचें संरक्षण व पोषण करीत होते. कांहीं काळानें कण्वऋषि नदीवर स्नानास गेले असतां ती कन्या त्यांचे दृष्टीस पडली. तिला त्यांनीं आश्रमांत आणली, व आपल्या औरस कन्येप्रमाणें तिचें पालनपोषण केलें. कण्वऋषींनीं नदीवरून जी कन्या आणली ती मीच होय. निर्जन अरण्यांत ' शकुंत ' पक्ष्यांनीं माझें संरक्षण केलें म्हणून त्यांनीं माझें नांव ' शकुंतला ' असें ठेवलें; आणि तेव्हांपासून ते माझें पोटच्या मुलीप्रमाणें लालनपालन व पोषण करीत आहेत; व मीही त्यांस पित्याप्रमाणेंच मान देत आहें. कारण—

शरीरकृत्प्राणदाता यस्य चान्नानि भुंजते ।
क्रमेणैते त्रयोऽप्युक्ताः पितरो धर्मशासने ॥

जन्मदाता, प्राणदाता व अन्नदाता हे एकाखालच्या एक योग्यतेचे तीन पितेच होत, असें धर्मशास्त्राचें वचन आहे." ( आदि० अ० ७२ )

शकुंतलेच्या तोंडची ही हकीकत ऐकून दुष्यंतास फार आनंद झाला. शकुंतला ही कण्वकन्या—ब्राह्मणाची मुलगी—नसून राजकन्या आहे, हें त्याचे ध्यानांत आलें. 'माझे सर्व राज्याची तूंच स्वामिनी हो, व मजशीं गांधर्व विवाह कर' असें म्हणून त्यानें तिला आपलें मनोगत कळविलें. शकुंतलेचें जरी राजावर मन बसलें होतें, तरी त्याच्या या म्हणण्यास ती कबूल होईना. 'माझा पिता फलें आण्यास गेला आहे; तुम्ही क्षणभर थांबा. तो आल्यावर तुम्ही त्याजपाशींच माझी मागणी करा, म्हणजे तोच मला तुमचे स्वाधीन करील' असें ती म्हणूं लागली. परंतु दुष्यंत राजास कण्व येईपर्यंत वाट पाहणें इष्ट वाटलें नाहीं. किंबहुना कण्वांचें दर्शन घेण्यासंबंधाचें आपलें पहिलें बोलणें विसरून 'मी केवळ तुझ्याकरितांच येथें थांबलों आहें' असेंही त्यानें या वेळीं तिला सांगितलें! त्यानें धर्मशास्त्रांत सांगितलेल्या आठ विवाह-पद्धतींचें तिजपाशीं वर्णन केलें. या आठांपैकीं पैशाच व आसुर हे विवाह अधर्म्य आहेत; ब्राह्म, दैव, आर्ष व प्राजापत्य हे पहिले चार विवाह ब्राह्मणांस उक्त असून राक्षस व गांधर्व हे विवाह क्षत्रियांस विहित आहेत, असें त्यानें तिला सांगितलें. तेव्हां शकुंतला म्हणाली:—'गांधर्व विवाह धर्म्य असेल, व स्वतःचें दान करण्यास स्वतःचे देहावर जर माझें स्वामित्व असेल तर मी गांधर्व विवाह करण्यास तयार आहें; मात्र माझे पोटीं होणारा पुत्र तुमचे सिंहासनाचा—राज्याचा—वारस व युवराज झाला पाहिजे. ही अट



माझ्या सर्व राज्याची तूंच स्वामिनी हो: व मजशीं गांधर्व
विवाह कर.

तुम्हांस मान्य असेल, तर मी तुमचे म्हणण्यास कबूल आहें.' शकुंतलेची ही अट दुष्यंतानें विचार न करितां एकदम कबूल केली, व तिजशीं गांधर्व विवाह केला. 'राजधानीस परत गेल्यावर मीं चतुरंग सैन्य पाठवून तुला सन्मानपूर्वक घेऊन जाईन' असें परत जातांना त्यानें तिला वचनही दिलें. क्षत्रियांचा गांधर्व विवाह जरी धर्मशास्त्रसंमत असला तरी कण्वऋषींचे अपरोक्ष आपण अननुभवी शकुंतलेचें मन वळवून व कोणाची सल्ला घेण्याचीही तिला संधि न देतां तिजशीं घाईनें केलेलें हें लग्न गैरशिस्त होय, असें दुष्यंताचे मनास खातच होतें; व म्हणूनच तो कण्वऋषि परत येण्यापूर्वीच त्वरेनें राजधानीस निघून गेला. राजधानीस पोंचेपर्यंत आपल्या ह्या अविचाराच्या कृत्याचें वर्तमान ऐकून महान् तपस्वी कण्वऋषि आपणास काय करतील कोणजाणे, असे विचार त्याचे मनांत सारखे घोळत होते. असो;

दुष्यंत आश्रमांतून गेल्यानंतर लवकरच कण्वऋषि परत आले. पण या वेळीं नेहमींप्रमाणें पुढें येऊन, आपल्या पित्याचे जवळून फळें घेऊन उतरून ठेवणें व त्यांचा सत्कार करणें, वगैरे गोष्टी लाजून गेल्यामुळें शकुंतला करीना. पण कण्वऋषींस सर्व प्रकार अंतर्ज्ञानानें कळून चुकला होता. '**मला न विचारतां माझे अपरोक्ष केलेलें हें कृत्य माझा-पित्याचा-अनादर करणारें आहे,** तरी तें धर्म्य आहे' असें त्यांनीं तिला सांगितलें, एवढेंच नव्हे तर शकुंतलेस होणारा पुत्र मोठा बलाढ्य चक्रवर्ती होईल, असाही त्यांनीं तिला आशीर्वाद दिला. दुष्यंतराजा धर्मात्मा, महात्मा व उत्तम पुरुष आहे असेंही ते म्हणाले. तेव्हां शकुंतलेचा संकोच दूर होऊन तिनें सर्व गोष्टी त्यांजपाशीं कबूल केल्या; व

दुष्यंतावर–आपल्या पतीवर–कृपादृष्टि असावी, अशी तिनें त्यांस विनंति केली. कण्वऋषींनीं दुष्यंतासाठीं तिला वर देऊं केला; तेव्हां ' सर्व पौरव राजे सदैव धर्मनिष्ठ राहोत, व ते राज्यभ्रष्टही कधीं न होवोत ' असा **धर्मनिष्ठ व स्वाभिमानी पतिव्रतेस साजेल असा वर तिनें मागून घेतला.** ( आदि० अ० ७३ )

शकुंतलेस वचन देऊन दुष्यंत हस्तिनापुरास परत गेल्यानंतर तीन वर्षें तिचे पोटांत गर्भ वाढून नंतर ती प्रसूत झाली व तिला तेजस्वी पुत्र झाला. त्याचे शरीराबरोबरच त्याचें रूप, बुद्धिमत्ता, औदार्यादि सद्गुणांची वृद्धि होऊं लागली. कण्वऋषींनीं त्याचे जातकर्मादि संस्कार विधिपूर्वक करविले. त्याचें डोकें मोठें होतें; त्याचें मुख अत्यंत तेजस्वी असून त्याचे दांत पांढरे शुभ्र, कोंवळे व अणकुचीदार होते; व त्याचे हातावर चक्रचिन्हें होतीं. असा हा सुलक्षणी राजपुत्र त्या तपोवनाच्या पवित्र व मोकळ्या वातावरणांत झपाट्यानें वाढूं लागला. हा मुलगा सहा वर्षांचा झाला नाहीं, तोंच तो अरण्यांतील सिंह, व्याघ्र, रानडुकरें, रानरेडे, हत्ती वगैरे पशु पकडून आणून झाडांस बांधून टाकी; त्यांचे पाठीवर बसून व त्यांस आपल्या कह्यांत आणून त्यांशीं खेळे, आणि त्यांस चोहोंकडे फिरवी ! ' सर्व ' हिंस्र पशूंस हा कह्यांत आणूं लागला ( दमयति ) म्हणून आश्रमांतील ऋषींनीं त्याचें नांव ' **सर्वदमन** ' असें ठेवलें. दुष्यंतपुत्राचा हा पराक्रम पाहून तो **यौवराज्याभिषेकास** योग्य झाला, असें कण्वांनीं शकुंतलेस सांगितलें व तिला मुलासह हस्तिनापुरास पाठविण्याचीही त्यांनीं तयारी केली. त्यांनीं आपल्या शिष्यांस सांगितलें कीं,

नारीणां चिरवासो हि बांधवेषु न रोचते ।
कीर्तिचारित्र्यधर्मघ्नस्तमान्नयत मा चिरम् ॥

"माहेरीं फार दिवस राहणें पतिव्रता स्त्रियांस आवडत नाहीं; कारण त्यामुळें त्यांची कीर्ति, पातिव्रत्य व धर्म यांस काळिमा लागण्याचा संभव असतो. यासाठीं शकुंतलेला बरोबर नेऊन तिला राजपुत्रासह त्वरित दुष्यंताकडे पोंचवा." या आज्ञेप्रमाणें कण्वशिष्यांनीं शकुंतला व तिचा पुत्र यांस दुष्यंताकडे राजसभेंत नेऊन पोंचविलें, व ते आश्रमास परत आले.

शकुंतलेनें, सात वर्षांपूर्वीं कण्वाश्रमांत घडलेल्या गोष्टींची व त्या वेळीं दिलेल्या वचनाची दुष्यंतास आठवण दिली; आणि या पुत्रास आतां यौवराज्यभिषेक करा, असेंही त्यास सुचविलें. शकुंतलेनें सांगितलेल्या गोष्टींचें स्मरण असूनही मुद्दाम दुष्यंत राजा तिला म्हणाला:—'अगे, दुष्ट तापसी! तूं कोणाची कोण आहेस? तूं सांगितलेल्या गोष्टींचें किंवा तुजशीं धर्म, अर्थ, काम या बाबतींत कसलाही माझा संबंध असल्याचें मला स्मरत नाहीं. तूं येथून निघून जा किंवा जाऊं नकोस, अगर तुला वाटेल तें कर.' दुष्यंताचें हें कठोर भाषण ऐकून बिचारी शकुंतला लज्जेनें व दुःखानें भान नाहींसें होऊन दगडी पुतळीप्रमाणें स्तंभित व निश्चल होऊन गेली! एकीकडे संताप व दुःख आणि दुसरीकडे त्यांस आंवरणारा विवेक यांची झटापट तिचे हृदयांत सुरू झाली; तिनें आपलें तपःसामर्थ्याचें तेजही आवरून धरलें. परंतु, क्षणभर विचार केल्यानंतर रागानें व आवेशानें तिचे ओंठ कांपूं लागले व डोळेही लाल झाले. अशा स्थितींत दुष्यंताकडे फेंकलेल्या एका वांकड्या कटाक्षानें जणूं त्याचें हृदय जाळीतच शकुंतला त्यास

म्हणाली:—" महाराज, खरें काय व खोटें काय हें तुमचें मन पूर्णपणें जाणतच आहे. आपण सर्व गोष्टी माहीत असूनही 'मी कांहीं जाणत नाहीं,' असें एकाद्या सामान्य माणसासारखें असत्य भाषण कां करतां?

**योऽन्यथा संतमात्मानमन्यथा प्रतिपद्यते ।**
**किं तेन न कृतं पापं चौरेणात्मापहारिणा ॥**

**जो आपलें खरें स्वरूप झांकून आपण भलतेच आहों असें दाखवितो, त्या आत्मवंचक चोरानें कोणतें पातक करावयाचें ठेवलें आहे? मला कोणीं पहात नाहीं व माझें खरें मनोगत कोणास ठाऊक नाहीं, अशा बुद्धीनें मनुष्य पाप करण्यास प्रवृत्त होतो; पण सर्वांच्या हृदयांत वास करणारा अंतरात्मा, तसेंच पृथ्वी-आकाश, दिवस-रात्र, चंद्र-सूर्य, वायु-अग्नि, यमधर्म हे मनुष्याच्या सर्व बऱ्यावाईट कृत्यांचे साक्षी असतात.** ही आपण होऊन आपल्याकडे आली, असें समजून माझी उपेक्षा करूं नका. मी आपण होऊन आलेली असलें तरी तुमची पतिव्रता भार्या—सहधर्मचारिणी—आहे. असें असूनही भरराजसभेमध्यें यःकश्चित् सामान्य पुरुषाप्रमाणें माझा कां उपमर्द करतां? तुम्हीं माझें बोलणें मुळींच ऐकत नाहीं, यावरून माझें हें बोलणें अरण्यरोदनच झालें म्हणावयाचें?" याप्रमाणें विलाप करीत बोलत असतांही तिकडे कोणी लक्ष देत नाहीं, असें पाहून शकुंतलेचा राग क्षणभर अनावर होऊन ती अत्यंत त्वेषानें म्हणाली:— 'मी दीनपणानें याचना करीत असतांही जर तुम्ही माझा स्वीकार करणार नाहीं, तर त्यामुळें तुमच्या मस्तकाचे आज शतशः तुकडे

होतील, असा माझा शाप आहे!' पण पुनः कांहींशी शांत होऊन ती म्हणाली:-" तुम्हीं माझा व या पुत्राचा त्याग करण्याचा अविचार करूं नका. कारण—

अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा ।
भार्या मूलं त्रिवर्गस्य भार्या मूलं तरिष्यतः ॥
भार्यावंतः क्रियावंतो भार्यावंतः श्रियान्विताः ।
भार्यावंतः प्रमोदंते सभार्या गृहमेधिनः ।
सखायाः प्रविविक्तेषु भवंत्येताः प्रियंवदाः ।
पितरो धर्मकार्येषु भवंत्यार्तस्य मातरः ॥

पुरुषाचें भार्या हें अर्धें शरीर आहे; व भार्या हाच अत्यंत श्रेष्ठ मित्र होय. धर्मार्थकाम या तीन पुरुषार्थांचें मूळ व संसारसागर तरून जाण्याचें साधनही भार्याच आहे. धर्मपत्नीसह संसार करीत असलेल्या पुरुषांसच वैभव प्राप्त होतें, तेच कृतकृत्य होत व तेच विश्वासास पात्र होत. भार्या ही एकांतांत मधुर भाषण करणाऱ्या मित्राप्रमाणें, धर्मकार्यांत वाडवडिलांप्रमाणें व आजारांत मातेप्रमाणें उपयोगीं पडत असते. पतीवर कोणतेंही व केवढेंही संकट येवो, त्या वेळींही त्याचा त्याग न करणारी अशी एक भार्याच होय. आधीं मृत्यु आल्यास परलोकीं पतीची वाट पाहणारी व पति आधीं मरण पावल्यास त्याचेबरोबर सहगमन करणारी भार्येवांचून कोण आहे? भार्या ही इहपरलोकीं पतीची 'सहचारिणी' होते, हेंच 'पाणिग्रहणा' चें मुख्य रहस्य आहे.

आत्माऽऽत्मनैव जनितः पुत्र इत्युच्यते बुधैः ।
तस्माद्भार्यां नरः पश्येन्मातृवत् पुत्रमातरम् ॥

**पति भार्येचे ठिकाणीं पुत्ररूपानें स्वतःच जन्म घेत असतो; यासाठीं पुरुषांनीं आपल्या पुत्राचे आईला (स्वभार्येला) आपल्या स्वतःच्या मातेइतकाच मान द्यावा,** अशीं शास्त्रवचनें आहेत. पुरुषाच्या शारीरिक व मानसिक व्याधि शमविण्याचें सामर्थ्य भार्येमध्यें मात्र आहे. सुख, प्रेम व धर्म हीं तिन्ही भार्येवर अवलंबून असल्यामुळें क्रोध आला असतांही पुरुषांनीं पत्नीस दुःख देऊं नये. आरशांत स्वतःचें प्रतिबिंब पाहणें, त्याप्रमाणें भार्येचे पोटीं पुत्ररूपानें पुनः जन्मलेल्या स्वतःलाच पाहणें, यासारखी आनंदाची दुसरी कोणती गोष्ट आहे बरें? 'पुन्नामक' नरकांतून पितरांची मुक्तता करतो म्हणूनच मुलास 'पुत्र' म्हणत असतात, असें ब्रह्मदेवाचें वचन आहे. **पुत्रामुळेंच पुरुषास उत्तम लोक प्राप्त होत असतो.** धुळीनें अंग भरलेल्या मुलानें पुढें येऊन बापास नमस्कार करून आलिंगन दिलें असतां त्यास जें स्पर्शसुख होतें, त्याची सर कशास येणार आहे? यःकश्चित् मुंग्यासुद्धां आपलीं अंडीं जपून तोंडांत धरून न फोडतां दूर नेत असतात; तर तुमच्यासारख्यांनीं आपल्या धर्मपत्नीचा व पुत्राचा त्याग करावा काय? तुम्ही मृगया करतां करतां कण्वाश्रमांत आलां होतां; व मजशीं गांधर्वविधीनें विवाह केला होता. तेथून तीन वर्षें गर्भ धारण केल्यानंतर हा पुत्र मला झाला. हा कुमार चक्रवर्ती होऊन शंभर अश्वमेध करील, अशी याचे जन्माचे वेळीं आकाशवाणी झाली आहे. तुमच्या देहाची दुसरी लहानशी प्रतिमा असलेला असा हा पुत्र तुमचेकडे उत्कंठेनें आला असून, तुम्हांकडे

मोठ्या आशेनें वांकड्या नजरेनें पाहत आहे. याचा त्याग तुम्ही करूं नका. विश्वामित्रापासून मेनकेचे पोटीं हिमालयाचे पठारावर मीं जन्मलें. पण ती निष्ठुर स्त्री जणूं काय दुसऱ्याचीच मुलगी असल्यासारखी मला तेथेंच टाकून चालती झाली. पूर्व जन्मीं मीं असें कोणतें पातक केलें होतें कीं, लहानपणीं आईबापांनीं मला टाकली व आतां तारुण्यांत तुम्ही माझा त्याग करीत आहां! माझा त्याग करावयाचाच असेल तर करा; मी कण्वाश्रमास परत जाईन. पण या तुमच्या—व माझ्या—बाळाचा मात्र त्याग नकाहो करूं!"

शकुंतलेचें हें दीनवाणें व दगडासही पाझर फोडणारें भाषण ऐकूनही दुष्यंतानें आपला कठोरपणा सोडला नाहीं. तो म्हणाला:-- ' तुझ्या पोटीं झालेला हा पुत्र माझा, असें मी मुळींच ओळखीत नाहीं. बायका फार लबाड असतात; तुझ्या बोलण्यावर कोणाचा विश्वास बसेल? तुला हिमालयावर टाकून देणारी तुझी आई मेनका निर्दय व वेश्या होती. तुझा बाप विश्वामित्र क्षत्रिय असूनही त्यास ब्राह्मणत्वाचा लोभ सुटला होता, व तोही तिच्या इतकाच कामातुर व निष्ठुर होता. तथापि तुझ्या म्हणण्याप्रमाणें मेनका ही श्रेष्ठ अप्सरा व विश्वामित्र हा महान् ऋषि असला, तरी त्यांची मुलगी म्हणविणारी तूं व्यभिचारिणीसारखें माझेसमोर बोलत आहेस; तुला लाज कशी नाहीं वाटत? अगे दुष्ट तापसी! तुझ्या बोलण्यावर माझा मुळींच विश्वास बसत नाहीं; तूं मुकाट्यानें चालती हो. मेनका अप्सरा कोणीकडे, विश्वामित्र कोणीकडे, आणि तूं त्यांची तापसी वेषानें मजकडे आलेली मुलगी कोणीकडे? हा तुझा मुलगा तूं सांगितलेल्या ६ वर्षांचे वयाचे

मानानें फारच मोठा व सशक्त दिसत आहे; सहा वर्षांत हा इतका कसा गे वाढला ? मदनपीडित मेनकेपासून तूं यदृच्छेनें उत्पन्न झालेली असून हलक्या कुलाची आहेस; व म्हणूनच जारिणीसारखें असलें वाईट भाषण करीत आहेस. तूं सांगत आहेस त्या गोष्टी मला मुळींच माहीत नाहींत; व मी तुलाही ओळखत नाहीं. वाट फुटेल तिकडे तूं चालती हो ! ”

राजाचें हें अत्यंत कठोर भाषण ऐकून शकुंतलेनें उत्तर केलें:— “ राजा, दुसऱ्याचे डोळ्यांतलें कुसळ तुला दिसतें, पण स्वतःच्या डोळ्यांतलें मुसळही दिसत नाहीं ! माझ्या कुलाची तूं निंदा-कर; पण तुझ्यापेक्षां माझें कुल श्रेष्ठ आहे. माझी माता मेनका ही देवांतील अप्सरा आहे. तूं नुसता या मृत्युलोकावरचा पामर आहेस; पण सर्वलोकीं व अंतरिक्षांतही मला संचार करतां येतो. आरशांत मुख पाहीपर्यंतच कुरुप्यास आपण सर्वांगसुंदर आहों, असें वाटत असतें; व स्वतः दुर्जन असलेलाच पुरुप सज्जनास ‘ दुर्जन ’ म्हणत असतो; तुझीही स्थिति अशीच झाली आहे. कुल व वंश यांचा आधारस्तंभ असलेल्या व पितरांची नरकापासून मुक्तता करणाऱ्या अशा पुत्राचा त्याग करणाराचे वैभवाचा देव नाश करतात. तुझ्या ह्या वर्तनानें धर्म व सत्य या दोहोंचीही हानि होत आहे !

**वरं क्रतुशतात्पुत्रः सत्यं पुत्रशताद्वरम् ।**

**शंभर यज्ञांहून पुत्राची योग्यता अधिक आहे. पण पुत्रा-हूनही सत्याची थोरवी जास्त आहे.**

सर्ववेदाधिगमनं सर्वतीर्थावगाहनं ।
सत्यं च वचनं राजन्समं वा स्यान्न वासमम् ॥
नास्ति सत्यसमो धर्मो न सत्याद्विद्यते परम् ।
न हि तीव्रतरं किंचिदनृतादिह विद्यते ॥

**सर्व वेदांचें अध्ययन किंवा सर्व तीर्थांचें स्नान यांस तरी सत्याची सर येईल कीं नाहीं याची वानवाच आहे. सत्यासारखा दुसरा धर्म नाहीं व सत्याहून कांहींही श्रेष्ठ नाहीं. तसेंच असत्याहून अधिक तीव्र असें दुसरें कोणतेंही पातक नाहीं.** यासाठीं आपलें वचन मोडून सत्यभ्रष्ट होऊं नका. इतकें मीं सांगत असूनही माझें बोलणें जर तुम्हांस खरें वाटत नसेल, किंवा असत्याचरणच तुम्हांस करावयाचें असेल, तर तुम्हांजवळ राहण्याची माझीही इच्छा नाहीं! हिमालयरूपी शुभ्र तुराच जिनें मस्तकीं धारण केला आहे, अशा या समुद्रवलयांकित भूमीचें राज्य तुमच्या साहाय्याशिवायच माझा हा पुत्र संपादन करील."

याप्रमाणें बोलून शकुंतला निघून जाऊं लागली. इतक्यांत, "शकुंतला सांगत आहे तें सर्व खरें आहे; हा तुझाच पुत्र आहे. याचें भरण ( पालनपोषण ) तूं कर; आमच्या सांगण्यावरून तूं याचें 'भरण' केलेंस म्हणजे मग त्याचें नांव '**भरत**' असें ठेव.' अशी आकाशवाणी झाली. ती ऐकून दुष्यंत राज-सभेंतील आचार्य, पुरोहित व मंत्री यांस आनंदानें म्हणाला:—'ही आकाशवाणी ऐका; हा माझाच पुत्र आहे हें मीं जाणतच होतों. पण मीं जर त्याचा व हिचा केवळ हिच्या म्हणण्यावरूनच एकदम स्वीकार केला असता, तर लोकांस माझ्याविषयीं संशय येऊन या दोघांच्या शुद्धतेविषयींही त्यांस शंका आली असती' असें बोलून

दुष्यंतानें भरतास प्रेमानें आलिंगून आपल्याजवळ बसवून घेतलें. सर्व सभासदांसही आनंद व हर्ष झाला. राजा शकुंतलेचें प्रेमानें सांत्वन करीत म्हणालाः—" देवी ! तुझा माझा घडलेला संबंध जरी धर्म्य तरी गुप्त होता. हा संबंध लोकांच्या परीक्षेच्या भट्टींतून तावून सुलाखून घेणें मला भाग पडलें, व त्यामुळेंच मीं असें निष्ठुर आचरण केलें. मी तुम्हां दोघांचा एकदम स्वीकार केला असता तर तूं केवळ स्त्रीस्वभाव म्हणून व कामप्रेरित होऊन माझ्याशीं संगम केलास, आणि मींही राज्यावर कोणीतरी कसला तरी वारस हवा म्हणून पुत्राचा स्वीकार केला, असें प्रजाजनांस वाटलें असतें. हा अपवाद टळावा म्हणून मी तुला भलभलतें बोललों; तें ऐकून त्या वेळीं तूं संतापानें जें जें मला बोललीस त्याची मी तुला क्षमा करतों."*

* कालिदासाच्या सुप्रसिद्ध 'अभिज्ञान शाकुंतल' नाटकांत ही कथा कांहीं अंशीं निराळी दिली आहे. तींत शकुंतला हस्तिनापुरास ६।७ वर्षांनीं जात नसून गर्भवती असतांनाच गेली आहे. तिचा भरराजसभेंत दुष्यंतानें अपमान केला, त्या वेळीं कण्वशिष्य तेथेंच आहेत. महाभारतांतील कथेप्रमाणें, दुष्यंत विशिष्ट हेतूनें शकुंतलेशीं केलेल्या विवाहाचें स्मरण नसल्याचें ढोंग करीत नसून दुर्वासानें शकुंतलेस दिलेल्या शापामुळें त्यास विस्मृति झालेली आहे. कण्वाश्रमांतून परत जातांना दुष्यंतानें शकुंतलेस गांधर्वविवाहाची खूण म्हणून स्वतःचें नांव कोरलेली अंगठी दिली होती, व ती हातांत घालूनच ती राजधानीस जात होती. पण दुष्यंतास ती अंगठी काढून दाखविण्यासाठीं बोट चाचपते, तों तेथें अंगठी नाहीं असें दिसून येतांच शकुंतला गांधळून गेली व 'बायका लबाड असतात' असें दुष्यंतास म्हणतां आलें. ही अंगठी शकुंतलेला न कळत तिच्या बोटांतून वाटेंतील शची- तीर्थांत पडली होती. राजानें त्याग केल्यानंतर शकुंतला अप्सरस्तीर्थाजवळ जाऊन अत्यंत शोक करूं लागली असतां

[ पुढें चालू ]

पुढें दुष्यंतानें पुत्राचें नांव 'भरत' ठेवून त्यास युवराजाचा अभिषेक केला. त्यानें आपल्या पराक्रमानें सर्व राजे जिंकले; व अनेक यज्ञ केले. 'भरतखंडाचा चक्रवर्ती व सार्वभौम राजा' अशी त्याची कीर्ति सर्वत्र दुमदुमूं लागली. कण्वऋषींनीं त्याजकडून 'गोवितत' नांवाचा अश्वमेध यज्ञही करविला. हा यज्ञ समाप्त झाल्यानंतर भरतानें त्यांस एक हजार पद्म दक्षिणा दिली! याच भरताचे नांवावरून त्याचे कुलास व पुढील वंशजांस 'भारत' अशी संज्ञा प्राप्त झाली. ( आदि० अ० ७४ )

---

[ मागील पृष्ठावरून ]

मेनका अप्सरेनें तिला उचलून नेऊन मारीच ऋषीचे आश्रमांत ठेवलें. इकडे तीर्थांत पडलेली अंगठी ज्या माशानें गिळली, तो मासा एका धीवरानें धरून मारला, तेव्हां त्याचे पोटांतील अंगठी त्यास दिसली. ती राजनामांकित अंगठी हस्तिनापुराचे बाजारांत तो विकीत असतां, राजदूतानें त्यास पकडून दुष्यंताकडे नेलें. अंगठी दृष्टीस पडतांच राजास शकुंतलेशीं केलेल्या विवाहाचें स्मरण होऊन तो अतिशय शोक करूं लागला. पुढें बरेच दिवसांनीं राक्षससंहाराचे कार्यांत इंद्रास साहाय्य करून दुष्यंत परत येत असतां, वाटेंत मारीचाश्रमांत शकुंतलेचा पुत्र पाहून, त्यास न ओळखतांही दुष्यंताचे मनांत एकदम विलक्षण वात्सल्य उत्पन्न झालें; आणि पुढें शकुंतलेची व पुत्राचीही ओळख पटून उभयतांच्या विरहाचा व दुःखाचा गोड शेवट झाला; अशी शाकुंतल नाटकांतील कथा आहे.

# देवयानी, शर्मिष्ठा व ययाति.



प्रथम युगारंभानंतर, त्रैलोक्याचे राज्यवैभवासाठीं देव-दानवांचें भयंकर युद्ध चाललें होतें. यज्ञयागादिकांनीं आपापले पक्षास विजय व यश यांची प्राप्ति करून घेण्याचा त्यांनीं निश्चय केला; आणि देवांनीं बृहस्पति (आंगिरस) व दानवांनीं शुक्र (काव्य, उशनस्) यांची या कामीं योजना केली. बृहस्पति व शुक्र यांचीही पूर्वीपासूनच स्पर्धा होती. युद्धामध्यें जे जे असुर मरण पावत त्यांस शुक्र आपल्या संजीवनी विद्येच्या बलानें पुनः जिवंत करीत असत. पण ही विद्या देवांच्या गुरूस माहीत नसल्यामुळें दिवसेंदिवस देवपक्ष दुर्बल व दानवपक्ष प्रबळ होत चालला. संजीवनी विद्या हरप्रयत्नानें प्राप्त झाल्याशिवाय आपणांस यश येणार नाहीं, हें देवांस कळून चुकलें. उघडच आहे कीं, **शत्रूची विशिष्ट शक्ति कशांत आहे हें समजून घेऊन ती शक्ति किंवा ती विद्या प्राप्त करून घेतल्यावांचून कोणासही विजय प्राप्त होणार नाहीं.** दानवांचा गुरु शुक्र व त्याची लाडकी एकुलती एक मुलगी देवयानी, यांस आपलें शील, सभ्यता, माधुर्य, सदाचरण, आत्मसंयमन इ० सद्गुणांनीं खूष करून ही विद्या संपादन करण्यास बृहस्पतीचा ज्येष्ठ पुत्र कच हाच एक योग्य पुरुष आहे, असें देवांस दिसून आलें; व त्याप्रमाणें त्यांनीं कचास ही

गोष्ट निवेदन केली. तेव्हां, स्वकीयांचे हितार्थ शत्रूचे गोटांत जाऊन त्यांची विशिष्ट विद्या घेऊन येण्याचें जोखमीचें काम कोणींतरी स्वीकारलेंच पाहिजे; हें लक्षांत आणून, ही संजीवनी विद्या आणण्यासाठीं तो दानवाधिपति वृषपर्वा याचे राजधानींत आला. आणि शुक्राकडे जाऊन, 'मीं अंगिरसाचा नातु व बृहस्पतीचा कचनामक पुत्र असून शिष्य या नात्यानें तुमची सेवा करण्याची मला इच्छा आहे' असें त्यानें त्यांस कळविलें. आपल्या प्रतिस्पर्ध्याचा पुत्र आपली सेवा करण्यास आला, याबद्दल आनंद होऊन शुक्रांनीं त्यास आपल्याजवळ ठेवून घेतलें; व कचही आपला गुरु व देवयानी यांची मनोभावें सेवा करूं लागला. नृत्य-गायन-वादनादिकांनीं आणि पुष्प-फलादि वस्तूंनीं त्यानें देवयानीचें मन आपणाकडे ओढून घेतलें. देवयानीही एकांतांत आपल्या गायनानें व विलासांनीं कचाचें मन रिझविण्याचा प्रयत्न करूं लागली. याप्रमाणें बराच काळ लोटल्यानंतर दानवांस कचाचा संशय आला; आणि तो वनांत गाई राखीत असतां राक्षसांनीं देवांच्या द्वेषामुळें व विद्यारक्षणासाठीं त्यास ठार मारलें; व त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे करून ते कोल्ह्यालांडग्यांस खावयास घातले! इकडे, सायंकाळच्या होमासाठीं आश्रमांतील अग्निकुंडें पेटलीं, सूर्य अस्तास गेला, आणि गाईही कचाशिवाय एकट्याच आश्रमास परत आल्या; हें पाहून देवयानी बावरून गेली. 'कच वनांत मेला तरी असेल किंवा कोणीं त्यास मारलें तरी असेल' असें तिच्या मनानें पक्कें घेतलें. आपला हा संशय बापास सांगून 'कच जिवंत परत आला नाहीं, तर मी कांहीं जिवंत राहणार नाहीं' असा आपला निर्धारही देवयानीनें त्यास कळविला. शुक्रांनीं

मुलींसाठीं संजीवनी मंत्र जपून ' कचा, ये ! ' म्हणून हांक मारली ! तों कच,त्याचें मांस खाणाऱ्या कोल्ह्यालांडग्यांचीं शरीरें फाडून आनंदित होऊन सजीव बाहेर आला ! देवयानीनें विचारलें असतां कचानें वनांतील सर्व वर्तमान तिला सांगितलें. तो म्हणालाः—' दर्भ, समिधा व लांकडें यांचा भारा घेऊन वनांतून येत असतां थकून एका वटवृक्षाखालीं मी बसलों; गाईही झाडाचे सावलींत बसल्या. इतक्यांत दानवांनीं येऊन 'तूं कोण ? म्हणून मला विचारलें. ' मीं बृहस्पतिपुत्र कच आहें ' असें मीं सांगतांच त्यांनीं मला मारून माझे तुकडे कोल्ह्यालांडग्यांस खावयास घातले. पण गुरूच्या कृपेनें कसाबसा जिवंत होऊन परत आल्यामुळें मला त्यांचें—व तुझें—दर्शन झालें. " यानंतर कांहीं दिवसांनीं कच पुनः देवयानीचे सांगण्यावरूनच फुलें आणण्यास गेला असतां, राक्षसांनीं पुनः त्यास मारलें; आणि त्याच्या शरीराचे तुकडे करून समुद्रांत टाकले ! पण पुनः देवयानीनं बापास सांगून संजीवनी विद्येनें त्यास जिवंत करविलें ! तिसऱ्या खेपेस दानवांनीं अधिक खबरदारी राखून कचास ठार मारून त्यास जाळलें; आणि त्याचीं हाडें चूर्ण करून तें व रक्षा हीं मद्यांत मिसळून तें शुक्रासच प्यावयास दिलें ! पुनः देवयानीनें पूर्वींसारखाच बापापाशीं हट्ट घेतला. ' कचास आपण नेहमीं जिवंत करावें व पुनः राक्षसांनीं त्यास मारावें, असा प्रकार चालला आहे. राक्षसांचे मनांत मजविषयीं वैषम्य आलें असून सर्व ब्राह्मणांचा निःपात करण्याचा त्यांचा इरादा दिसतो; तर आतां काय करावें ' अशी शुक्रांस चिंता पडली. पण देवयानी आपला हट्ट सोडीना. तेव्हां निरुपायानें शुक्रानीं संजीवनी मंत्र जपून कचास हाक मारली. तों त्या शुक्रांचे

पोटांतूनच ‘ओ’ दिली! तेव्हां ‘कचास जिवंत केलें तर मी मरेन, मी जगावयास हवा असेन तर कच जिवंत होणार नाहीं’ असें त्यांनीं देवयानीस सांगितलें. तेव्हां ती म्हणाली:—‘दोघेही मला प्रिय आहेत, व दोघेही जिवंत राहिले पाहिजेत. त्यांपैकीं कोणा एकाचाही नाश झाला तरी मी आपला जीव ठेवणार नाहीं.’ अखेर शुक्रानीं निरुपायानें कचास संजीवनी विद्या शिकविली; त्या विद्या-बलानें कच शुक्रांचें उदर विदारण करून बाहेर आला; आणि स्वतः पुनः मंत्र जपून त्यानें गुरूसही सजीव केलें! **सुरापानामुळें आपला असा बुद्धिभ्रंश व फसवणूक झालेली पाहून शुक्रांस सुरापानाचा पूर्ण तिटकारा आला.** आणि—

**यो ब्राह्मणोऽद्यप्रभृतीह कश्चित् । मोहात्सुरां पास्यति मंदबुद्धिः ॥**
**अपेतधर्मब्रह्महा चैव स स्यात् । अस्मिंल्लोके गर्हितः स्यात्परे च ॥**

**‘आजपासून जो ब्राह्मण सुरापान करील त्यास ब्रह्महत्येचें पातक लागेल’** असा कडक निर्बंध त्यांनीं घातला! शुक्रानीं दानवांस बोलावून आणून त्यांसही कळविलें कीं, कचास आतां संजीवनी विद्या प्राप्त झाली आहे; या पुढें त्यास तुम्ही माराल तर त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं! (आ० अ० ७६)

गुरुशुश्रूषा, विद्यासंपादन आणि सेवावृत्ति यांची मुदत संपल्यानंतर कच स्वगृहीं जाण्यास निघाला. देवयानीचा निरोप घेण्यास तो आला असतां **त्याच्या कर्तव्यनिष्ठेची व आत्मसंयमनाची फारच कसून परीक्षा झाली.** देवयानीचा निरोप घेण्यास कच आला असतां त्यांचें पुढीलप्रमाणें संभाषण झालें:—

**देवयानी**–' तुझें ब्रह्मचर्यव्रत समाप्त होईपर्यंत मीं आपलें प्रेम तुजपाशीं उघड केलें नाहीं. आतां तूं आपलें विद्यासंपादन पूर्ण करून स्वगृहीं जात आहेस; तर माझें विधिपूर्वक पाणिग्रहण करून मला कृतार्थ कर.'

**कच**––' माझा बाप तसाच तुझा बाप व नाझा गुरु मला पूज्य आहे; आणि गुरुपुत्री या नात्यानें तूंही त्यांच्याइतकीच मला पूज्य आहेस; तूं असें भलतें भाषण करूं नको.'

**देव०**–' तूं माझ्या पित्याचा ' शिष्य ' आहेस, ' पुत्र ' नाहींस. त्या अर्थी तुजशीं असें भाषण करण्यास कांहीं हरकत नाहीं. दानव वरचेवर तुझा प्राण घेत असतां मीं तुला वरचेवर ज्या प्रेमानें जिवंत केलें, त्याची कांहीं तरी आठवण असूं दे. तसेंच तुजवर माझें प्रेम व स्नेह किती आहे, हेंही तुला विदित आहे. यासाठीं तूं माझा त्याग करूं नको.'

**कच०**–' तुमच्या घरीं मी सुखानें व आनंदानें राहिलों; तुम्हांबद्दल मला कसलाही राग नाहीं. पण तूं मला अयोग्य असें हें कृत्य करावयास सांगत आहेस. शुक्राच्या ज्या कुशींत तूं होतीस तेथेंच माझें वास्तव्य झालेलें असल्यामुळें धर्मतः तुझें माझें भाऊ-बहिणीचें नातें होत आहे. मी तुझा निरोप घेण्यास आलों आहें; तर माझा प्रवास सुखकर होवो, असा मला अशीर्वाद दे.'

**देव०**–' धर्म-काम-अर्थ या तीन पुरुषार्थ-साधनासाठीं मी तुझी याचना करीत असूनही तूं माझा अनादर करित आहेस, तर तुझी विद्या तुला सिद्धिप्रद होणार नाहीं, असा माझा तुला शाप आहे.'

**कच०**—' मी **तुझा अनादर धर्मासाठीं करीत असल्यामुळें त्याबद्दल मला शाप दिलास तरी मला त्याची फिकीर नाहीं. पण ज्या अर्थी तूं केवळ कामप्रेरित होऊन मला भलतीच विनंति केलीस, त्या अर्थी तुझा कामही सफल होणार नाहीं**; कोणताही ऋषिपुत्र तुझें पाणिग्रहण करणार नाहीं. माझी विद्या मला सिद्धिप्रद होणार नाहीं, असा तुझा शाप आहे; पण ही विद्या मी ज्यास शिकवीन त्याला तर ती फलप्रद होणारच.' याप्रमाणें बोलून **कच** स्वर्गास परत आला. **संजीवनी** विद्या संपादन करून **कच** परत आलेला पाहून देवांस फार हर्ष झाला. ( आदि० अ० ७७ )

**कच** याप्रमाणें जी विद्या शिकून आला होता ती सर्व देवांनी त्याजपासून संपादन केली. या विद्येमुळें अधिक हुरूप येऊन **दानवां**वर हल्ला करण्यास हीच संधि चांगली आहे, असें त्यांनीं इंद्रास सांगितलें. तें मान्य करून **इंद्र देवांसह** आकाशमार्गानें फिरू लागला असतां **वृषपर्व्याची** कन्या **शर्मिष्ठा** व **शुक्रकन्या देवयानी** ह्या इतर दानवकन्यांसह वनांतील एका सरोवरांत जलक्रीडा करीत असलेल्या त्यांचे दृष्टीस पडल्या. तेव्हां **इंद्रानें वायूचें** रूप धारण करून त्या कन्यांचीं तीरावरील वस्त्रें एकमेकांत मिसळून टाकलीं. जलक्रीडा आटोपून कन्यांनीं बाहेर येऊन हातीं लागतील तीं वस्त्रें परिधान केलीं. **शर्मिष्ठा** चुकून या गडबडींत **देवयानीचें** वस्त्र नेसली. या कारणानें दोघींत भांडण जुंपलें. **देवयानी** म्हणाली:— ' अगे असुरी ! माझी शिष्या असून तूं माझें वस्त्र कां नेसलीस ? सदाचाराचें तूं उल्लंघन केलेंस, तुझें कधीं चांगलें होणार नाहीं.' **देवयानीच्या** या बोलण्यास **शर्मिष्ठेनें** अधिकच उद्दामपणानें उत्तर

झालें कीं, ‘ माझा पिता बसलेला असो, अगर निजलेला असो; तुझा बाप त्याच्यापुढें नम्रपणानें येऊन एकाद्या नीच भाटाप्रमाणें त्याची स्तुति करीत असतो. स्तुतिपाठक, याचक व भिक्षुक यांची तूं पोरगी असून मी राजाची राजकन्या आहें. अगे भिकारडे ! तूं वाटेल तितकी फणफण, जळफळ, रागाव व माझा दुष्टपणा कर; निःशस्त्र भिक्षुकी सशस्त्र राजकन्येवर रागावली तरी त्या पोकळ रागाला पुसणार कोण ? मी तुझ्या रागाची मुळींच पर्वा करीत नाहीं. भांडण व झगडा करूं लागशील तर मीही कांहीं माघार घेणार नाहीं.” असें बोलून, आपल्या नेसलेल्या वस्त्राशीं हिसका-हिसकी करणाऱ्या व हाडवैरीण झालेल्या देवयानीला एका विहि-रींत ढकलून आणि ती मेली असें समजून, रागारागानें शर्मिष्ठा राजवाड्यांत परत आली. कांहीं वेळानें त्या वनांत नहुषपुत्र ययातिराजा मृगया करीत करीत आला; त्याच्या रथाचे घोडे थकले असून त्यासही तहान लागली होती. पाणी पिण्यासाठीं तो विहि-रीच्या जवळ जाऊन पाहतो तों विहीर गवतानें व वेलींनीं आच्छादलेली असून कोरडी झालेली आहे, आणि तींत एक सुंदर व तेजस्वी कन्या पडली आहे, असें त्याचे दृष्टीस पडलें. त्यानें तिला विचारल्यावरून देवयानीनें आपण कोणाची कोण हें ययातीस सांगितलें. आणि ‘ तुम्ही शांत, बलवान् व यशस्वी असून कुली-नही आहां; यासाठीं तुम्ही माझा उजवा हात धरून मला या विहिरींतून वर काढा, अशी तुम्हांला विनंति करण्यास कांहींच हरकत नाहीं. ’ देवयानी संकटांत पडली असून ब्राह्मणकन्या आहे, असें जाणून ययातीनें आपल्या उजव्या हातानें तिचा उजवा हात धरून तिला वर काढलें; आणि तिचा निरोप घेऊन तो राज-

धानीस परत गेला. ययाति गेल्यानंतर देवयानीनें घूर्णिका नांवाच्या मैत्रिणीस, बापाकडे जाऊन 'वृषपर्व्याच्या नगराचें मी इतःपर दर्शन सुद्धां घेणार नाहीं' असा निरोप सांगण्यास सांगितलें. त्याप्रमाणें शुक्राकडे जाऊन घूर्णिकेनें हा निरोप व शर्मिष्ठेचें सगळें दुष्ट वर्तन त्यास निवेदन केलें. आपल्या लाडक्या व एकुलत्या एक कन्येची ही दुःस्थिति ऐकून शुक्र दुःखानें वनांत धांवतच आले, आणि देवयानीस प्रेमानें पोटाशीं धरून म्हणालेः—

आत्मदोषैर्नियच्छंति सर्वे दुःखसुखे जनाः ।

'**मनुष्यास सुखदुःख जें होत असतें तें त्याच्या आंगच्याच गुणदोषांमुळें होत असतें.** तुजवर जें हें संकट आलें यांत बहुतकरून तुझाच दोष असावा' यावर देवयानी रागानें म्हणालीः—"माझा दोष असो वा नसो; वृषपर्व्याच्या स्तुतिपाठकाची मी मुलगी आहें, असें जें शर्मिष्ठा मला म्हणाली तें मात्र खरें दिसत आहे. 'तूं भाटाची, याचकाची व भिक्षुकाची पोरगी असून मी राजकन्या आहें' असें पुनः पुनः गर्वानें शर्मिष्ठा मला टोंचून बोलली. तें जर खरें असेल, तर मी जाऊन शर्मिष्ठेच्या शंभरदां पाया पडतें." यावर शुक्र म्हणालेः—'शर्मिष्ठा बोलली तें साफ खोटें आहे. मी भाट नाहीं, याचक नाहीं व भिक्षुकही नाहीं. माझें सामर्थ्य व बल काय आहे, हें हा वृषपर्वा, इंद्र व ययाति राजा हे पूर्णपणें जाणत आहेत.' वगैरे भाषण करून शुक्रानीं देवयानीचें थोडेंसें समाधान केलें. ( आदि० अ० ७८ ) पण तिचा राग पूर्णपणें शमला नाहीं. ती म्हणालीः—'वृषपर्व्याची मुलगी जें मला दुरुत्तर बोलली, तें माझें अंतःकरण सारखें जाळीत राहणार.

**यः सपत्नश्रियं दीप्तां हीनश्रीः पर्युपासते ।**
**मरणं शोभनं तस्य इति विद्वज्जना विदुः ॥**

**वैभवहीन पुरुषावर वैभवशाली व तेजस्वी अशा शत्रूंची सेवा करण्याचा प्रसंग येण्यापेक्षां मरण आलेलें अधिक श्रेयस्कर होय,** असें विद्वानांचें मत आहे.' ( आदि० अ० ७९ )

देवयानीचें हें बोलणें ऐकून तिला तेथेंच ठेवून रागानें शुक्र नगरांत परत आले आणि थेट वृषपर्व्यापर्यंत जाऊन म्हणाले:— 'माझा सच्छील शिष्य कच व माझी आवडती एकुलती एक कन्या देवयानी यांचा प्राण घेण्याचा तुम्हीं दानवांनीं प्रयत्न केला आहे; मी याउपर तुम्हांजवळ राहूं इच्छित नाहीं.' वृषपर्वा:–'तुमचें म्हणणें सर्वस्वीं खरें आहे; आमचेकडून महान् अपराध झाला खरा, पण तेवढ्यासाटीं जर तुम्ही आम्हांस सोडून जाल, तर आम्हां सर्वांस समुद्रांत शिरून प्राणत्याग करणें भाग पडेल.' शुक्र:– 'तुम्हीं समुद्रांत बुडा किंवा दशदिशांस पळून जा. देवयानी माझा जीव कीं प्राण आहे. तुम्हां सर्वांचें योगक्षेमही माझे हातीं आहे. तेव्हां मी तुम्हांस हवा असेन तर आधीं देवयानीस प्रसन्न करून घ्या !' वृष०:–'सर्व दानवांची व माझी धनदौलत आणि मीं स्वतः यांचे तुम्हीच स्वामी आहां.' शुक्र:—'हें खरें असेल, तर आधीं देवयानीस शरण जाऊन तिला सुप्रसन्न करा.' शुक्राचे या म्हणण्याप्रमाणें वृषपर्वा व शुक्र नगराबाहेर देवयानीकडे आले; वृषपर्व्यानें कबूल केलेली गोष्ट शुक्रानें आपल्या मुलीस सांगितली. तेव्हां ती स्त्रीस्वभावास अनुरूप अशा कुत्यानें म्हणाली:— 'राजाच्या धनदौलतीचे व राजाचे तुम्ही स्वामी आहां, ही गोष्ट तुमचे तोंडून मला नको आहे. तसें राजानेंच आपल्या तोंडानें

म्हटलें पाहिजे.' वृषपर्व्यानेंही निरुपाय होऊन त्याप्रमाणें देवयानीस म्हटलें; आणि 'काय मागशील तें मी तुला देईन, तूं प्रसन्न हो' अशी तिची विनवणी केली. तेव्हां देवयानी म्हणाली:—'एक हजार कन्यांसह शर्मिष्ठेनें माझी दासी झालें पाहिजे; व मी सासरीं गेल्यावर त्या सर्वांनीं मजबरोबर आलें पाहिजे.' देवयानीचें हें बोलणें ऐकून वृषपर्व्यानें दाईला पाठवून शर्मिष्ठेस पालखींत घालून हजार कन्यांसह तेथें आणलें. आपल्या दोषामुळें शुक्र व देवयानी यांनीं निघून जावें, व आपल्या दैत्य ज्ञातीचा घात व्हावा, हें शर्मिष्ठेला आवडलें नाहीं. यासाठीं तिनें **स्वकीयांच्या कल्याणासाठीं देवयानीची जन्मभर दासीही होण्याचें कबूल केलें.** तेव्हां देवयानीनें, स्त्रीस्वभावाप्रमाणें, दासी झालेल्या शर्मिष्ठेस, मागील बोलणें उकरून काढून, टोमणा देण्यास कमी केलें नाहीं. ती म्हणाली:—'तूं राजकन्या असून त्या राजाचा भाट, याचक व भिक्षुक याची मी कन्या आहे ना? मग माझी दासी कशाला होतेस?' शर्मिष्ठा:—

**येन केनचिदार्तानां ज्ञातीनां सुखमावहेत् ।**

**स्वज्ञाती संकटांत पडली असतां प्रत्येकानें कांहींही करून त्यांचें संकटनिवारण करणें, हें त्याचें कर्तव्य आहे;** म्हणून मी तुझी दासी झाल्यें आहें.' आपल्या बापाचें सामर्थ्य व विद्या यांच्या ह्या प्रभावामुळें शर्मिष्ठा आपली कायमची दासी झालेली पाहून देवयानीसही आनंद झाला; व ती नगरांत मोठ्या थाटानें परत आली. ( आदि० अ० ८० )

पुढें कांहीं कालानें देवयानी स्वतःच्या एक हजार कन्या-दासी, आणि दुसऱ्या हजार दासींसह शर्मिष्ठा यांस बरोबर घेऊन त्याच

वनांत क्रीडा करण्यास आली. नाना प्रकारचीं फळें व पुष्पें आणि खाद्यें व पेयें यांचा उपभोग, अनेक क्रीडा व खेळ इत्यादिकांनीं त्या कन्या आपलें मनोरंजन करीत होत्या. इतक्यांत त्या वनांत नहुषपुत्र ययातिराजा मृगया करीत तृषेनें व्याकुळ होऊन पाणी पिण्यासाठीं आला. दोन हजार सुस्वरूप कन्यांमध्यें शोभणारी व शर्मिष्ठा पाय रगडीत आहे अशी देवयानी त्याचे दृष्टीस पडली. एकमेकांचे कुशल प्रश्न झाल्यानंतर आपण कोणाचे कोण हें देवयानीनें ययातीला व त्यानें तिला निवेदन केलें. वृषपर्व्याची मुलगी शर्मिष्ठा ही आपली सखी व दासी कशी झाली, हेंही तिनें त्यास सांगितलें. ययातीनेंही आपलें नांव व वंशकथा देवयानीस पुढीलप्रमाणें सांगितली:-( आदि० अ० ८१ ) "प्राचेतस् मनूला पुण्यवान् व सदाचारी असे दहा पुत्र झाले, पण ते त्याचे मुखांतून निघणाऱ्या अग्नीनें जळून गेले. पुढें प्राचेतसास दक्षप्रजापति हा पुत्र झाला; हा सर्व लोकांचा पितामह असून त्यापासूनच सर्व प्रजांची उत्पत्ति झाली. दक्षप्रजापतीस वीरिणीचे पोटीं स्वतःइतकेच तेजस्वी व तपस्वी असे एक हजार पुत्र झाले. त्यांना नारदांनीं मोक्षविद्या व सांख्यशास्त्र शिकविलें. पुढें दक्षास पांचशें कन्या झाल्या. त्यांपैकीं त्यानें दहा कन्या धर्माला, तेरा कश्यपाला व सत्तावीस चंद्राला दिल्या. कश्यप मारीचांना तेरा पत्न्यांपैकीं दाक्षायणीचे पोटीं द्वादश आदित्य, इंद्रादि देव व विवस्वान् हे पुत्र झाले. विवस्वानास पुढें यम व मनु हे पुत्र झाले. मनु महाबुद्धिमान् व धर्मात्मा होता; त्याचे पासूनच सर्व मानववंशाची उत्पत्ति झाली. ब्राह्मण, क्षत्रियादि वर्णही त्याजपासूनच उत्पन्न झाले व तेव्हांपासून 'ब्रह्मक्षत्र' हे बंधुबंधुप्रमाणें एकत्र वागूं लागले. वेण, धृष्णु,

नरिष्यंत, नाभाग, इक्ष्वाकु, कारूष, शर्याति, इला ( कन्या ) पृषध्र, नाभागारिष्ठ, हे पुत्र व कन्या आणि इतर ५०० पुत्र वैवस्वत मनूस झाले. पण आपापसांतील भाऊबंदकीच्या वैरामुळें त्या सर्वांचा नाश झाला. इलेच्या पोटीं पुरूरवा पुत्र झाला; त्याची माता व पिता दोनहीं इलाच होतीं असें म्हणतात! पुरूरवा समुद्रांतील तेरा बेटांवर राज्य करीत होता. तो स्वतः मनुष्य असूनही त्याचेभोंवतीं मनुष्येतर राक्षसादिकांचा गराडा पडल्यामुळें तो त्यांचेसारखाच बनला! त्यानें वीर्योन्मत्त होऊन ब्राह्मणांशीं युद्ध आरंभिलें; आणि शेवटीं त्या सर्वांस लुटून फस्त केलें. सनत्कुमारांनीं ब्रह्मलोकाहून येऊन त्याची कानउघाडणी केली; पण त्यानें त्यांचें कांहीं ऐकलें नाहीं. तेव्हां त्यांनीं शाप देऊन ह्या लोभी, बेहोष व बलोन्मत्त राजाचा तात्काल नाश केला. या पुरूरव्यानें गंधर्व लोकांतून उर्वशीसह यज्ञक्रियेसाठीं तीन अग्नि भूलोकीं आणले होते. पुरूरव्याला उर्वशीपासून आयु, धीमान्, अनावसु, दृढायु, वनायु व शतायु वगैरे आठ पुत्र झाले. त्यांपैकीं आयूला नहुष, वृद्धशर्मा, राजिंगय, अनेनस असे चार पुत्र स्वर्भानवीपासून झाले. नहुषानें उत्तम प्रकारें राज्य करून सर्व लोकांचें समतेनें पालनपोषण केलें. त्यानें सर्व दस्यूंचा संहार करून ऋषींना आधार दिला. तो त्यांस पशूप्रमाणें आपल्या पाठीवरूनही वाहून नेत असे! त्यानें आपल्या तेजानें, तपानें, पराक्रमानें व बलानें देवांस पराभूत करून त्यांचें इंद्रत्वही संपादिलें. त्यास यति, ययाति, संयाति, अयाति, अयति व ध्रुव असे आम्ही सहा पुत्र आहोंत. पहिला

पुत्र यति हा योगी व तपस्वी असल्यामुळें मी ययाति सम्राट् झालों आहें." ( आदि० अ० ७५ )

ही हकीकत ऐकून, 'शर्मिष्ठा व दोन हजार कन्या यांसह मी आपणांस वश झालें आहें. आपण माझा **'सखा व भर्ता' या नात्यांनीं स्वीकार करावा'** अशी देवयानीनें ययातीस विनंति केली. पण ययातीस तपस्वी ब्राह्मणांचा स्वभाव माहीत होता. विशेषत: शुक्राच्या कन्येशीं विवाह करून वर्णसंकरकारक गोष्ट करण्यास त्याचें मन धजेना. देवयानी त्याची अनेक प्रकारें समजूत करूं लागली. ती म्हणाली:—'क्षत्रियानें ब्राह्मणकन्येशीं विवाह करण्यास हरकत नाहीं; शिवाय मी संकटांत सांपडलें असतां तुम्हींच माझा हात धरून मला वर काढलें. एका दृष्टीनें तुम्हीं तें माझें पाणिग्रहणच केलेलें असल्यामुळें मी दुसऱ्या कोणाशींही विवाह करणार नाहीं. आपण होऊन गांधर्वविवाह करण्याचा अगर मागणी घालण्याचा तुम्हांस संकोच अगर भीति वाटत असेल, तर मी आपल्या पित्याकडून तुम्हांस मला देववितें, म्हणजे झालें.' देवयानीची ही शेवटची युक्ति ययातीसही पसंत पडली. ठरल्याप्रमाणें देवयानीनें ही सर्व हकीकत आपल्या दाईकडून पित्यास कळविली. त्यासही ही गोष्ट मान्य होऊन त्यानें आपली कन्या ययातीस देऊं केली. ययातीनेंही, या विवाहामुळें होणाऱ्या वर्णसंकराचें पाप आपणास न लागेल अशी तजवीज करण्याचें शुक्रापासून अभिवचन घेतलें. 'राजकन्या शर्मिष्ठा ही देवयानीची दासी आहे तरी तिला चांगला मान दे; पण तिजशीं विशेष सलगी माल ठेवूं नको' असें शुक्रानें ययातीस बजावलें. पुढें देवयानीशीं यथाविधि विवाह झाल्यावर देवयानी,

शर्मिष्ठा व हजार कन्या यांसह ययाति आपल्या राजधानीस परत गेला. ( आदि० अ० ८१ )

नगरास परत आल्यानंतर ययातीनें देवयानीस आपल्या अंतः-पुरांत ठेवलें; व शर्मिष्ठेसाठीं अशोकवनिकेनजीक एक वाडा बांधून तेथें तिला तिच्या एकहजार दासींसह ठेवलें, आणि त्या सर्वांची सर्व प्रकारची तरतूद निराळी करून दिली. कांहीं कालानें देव-यानीस गर्भ राहून पुढें तिला पुत्र झाला. शर्मिष्ठाही या वेळीं तारु-ण्याचे भरांत आली होती. परंतु, 'आपला विवाह झाला नसून आपलें यौवन व्यर्थ जाणार आणि आपली मैत्रीण देवयानी हिला मात्र मुलगाही होऊन गेला' असे विचार तिचे मनांत येऊन तिला वारंवार वाईट वाटे. पुढें एके समयीं ययातिराजा त्या अशोकवनिकेंत आला असतां शर्मिष्ठेनें त्याची एकांतीं गांठ घेतली, आणि तिनें आपलें मनोगत त्यास कळविलें. शर्मिष्ठा त्यास म्हणाली:—'माझें रूप, शील व कुलीनता तुम्हांस माहीत आहेच. स्वतःचा पति काय व धनिणीचा पति काय दोघे दासींना सारखेच असतात. भार्या, दास व सुत यांस स्वतःच्या मालकीचें असें धन नसतें. मी देवयानीची दासी म्हणजे अर्थात् तुमचेंच धन झालें आहे. यासाठीं माझेवर तुमची देवयानीइतकीच सत्ता आहे.' शर्मिष्ठेचें हें मायावी भाषण ऐकून तिच्या रूप-यौवनाचा लोभ ययातीस सोडवेना; पण ययातीला तिचें हें म्हणणें एकदम कबूलही करवेना! शुक्रानें सांगितलेल्या गोष्टींचीही त्यास या वेळीं आठवण झाली. शिवाय, **सर्व प्रजाजन राजाचें वर्तन कित्त्या-प्रमाणें पुढें ठेवीत असल्यामुळें तो जर दुराचरण करील तर त्याचा त्वरित नाश होतो. ( राजा प्रमाणं भूतानां स नश्येत**

**मृषा वदन** ) हें नीतितत्त्वही सोडण्याचें त्यास धैर्य होईना. तेव्हां, याचकाचे मनोरथ पूर्ण करणें हें आपलें व्रत असून तें आपण पाळलें पाहिजे, असें मनाचें खोटेंच समाधान करून घेऊन त्यानें शर्मिष्ठेचे मनोरथ पूर्ण केले. या गुप्त समागमापासून तिलाही योग्य कालीं एक पुत्र झाला. ( आदि० अध्याय ८२ ) पण ही बातमी ऐकून देवयानीस अतिशय राग आला व दुःखही झालें. तिनें शर्मिष्ठेकडे येऊन यासंबंधानें चौकशी केली. तेव्हां, ती म्हणाली कीं, 'कोणी एक धर्मात्मा व वेदवेत्ता ऋषि इकडे आला होता; त्याजपासून मला हा पुत्र झाला आहे.' हें ऐकून 'त्या द्विजाचें नांव व गोत्र काय' असें देवयानी विचारूं लागली. तेव्हां शर्मिष्ठेनें उत्तर केलें कीं, 'त्याच्या तपाचें तेज पाहून मी दिपूनच गेलें; म्हणून त्याचें नांव व कुल विचारण्याचें मला भानच राहिलें नाहीं.' शर्मिष्ठेच्या या लपंडावाच्या उत्तरानें देवयानीचें समाधान झालें व तिचा राग निघून गेला. कांहीं वेळ दोघींनीं मैत्रिणीप्रमाणें हास्यविनोद केल्यावर देवयानी राजवाड्यांत परत गेली. ययाति व शर्मिष्ठा यांचा हा गुप्त प्रेमसंबंध असाच आणखीही बरींच वर्षे चालून तिला तीन पुत्र झाले; त्यांचीं नांवें द्रुह्यु, अनु व पुरु अशीं ठेविलीं होतीं. या अवधींत देवयानीलाही दोन पुत्र होऊन असून त्यांचीं नांवें यदु व तुर्वसु अशीं ठेविलीं होतीं.

पुढें एके समयीं देवयानी व ययातिराजा हीं त्या अशोकवनिकेंत आलीं असतां, तेथें मोकळ्या मनानें खेळत असलेले तीन कुमार देवयानीस दिसले. रूपानें व तेजानें एकासारखे एक असलेले हे कुमार कोणाचे, असें तिनें राजास विचारलें; व लागलीच तोच प्रश्न तिनें त्या मुलांसही केला. त्यांनीं 'आमची माता

शर्मिष्ठा ' असें सांगितलें; व राजाकडे बोट दाखवून ' हा आमचा पिता ' असेंही देवयानीस कळविलें; आणि लागलीच हे तिघेही मुलगे धांवत येऊन राजाशीं लडिवाळपणा करूं लागले! पण देवयानीचे देखत त्यांनीं असें करणें राजास न आवडल्यामुळें त्यानें त्यांस दूर केलें. पित्याचें हें वर्तन पाहून तिघेही कुमार शर्मिष्ठेकडे रडत गेले, व त्यांनीं सर्व प्रकार तिला सांगितला. इकडे या कुमारांचें राजाशीं झालेलें सलगीचें वर्तन पाहून देवयानीच्या ध्यानांत सर्व प्रकार आला; व तिनें शर्मिष्ठेकडे येऊन, ' तूं माझी दासी असून माझ्या मनाविरुद्ध असें आचरण कां केलेंस? पुनः तूं आपल्या आसुरी वळणावर जावयाची ती गेलीसच. तुला भीति कशी वाटत नाहीं?' अशी तिची कानउघाडणी केली. पण शर्मिष्ठेवर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. ती म्हणाली:—' माझें वर्तन न्यायास व धर्मास अनुसरूनच आहे. तूं जेव्हां ययातीशीं लग्न केलेंस तेव्हां मींही त्यास मनानें वरलें होतें. शिवाय माझा पति काय आणि माझी सखी व धनीण तूं तिचा भर्ता काय एकच. तूं ब्राह्मणी व माझ्याहून वडील असल्यामुळें मला पूज्य व मान्य आहेस खरी; पण तुझ्याहून मला ययाति हे राजर्षि ज्यास्त पूज्य आहेत, हें तुला कसें कळत नाहीं? मला ऋषीपासून पुत्र झाले म्हणून मीं सांगितलें हें कांहीं खोटें नाहीं. ' हृदयास घरें पाडणारें शर्मिष्ठेचें हें दुष्ट भाषण ऐकून देवयानी कांहींच बोलली नाहीं. ' माझें अप्रिय ज्या अर्थीं झालें आहे त्या अर्थीं मला आतां येथें राहावयाचें नाहीं ' असें राजास बोलून ती ताडकन् उठली आणि नागिणीप्रमाणें फुसफुसत व अश्रु ढाळीत आपल्या बापाकडे निघाली. राजाही तिचे मागोमाग तिची समजूत करीत जाऊं लागला. पण तिनें त्याजकडे

लक्षही दिलें नाहीं व त्याशीं ती एक अक्षर बोललीही नाहीं. लवकरच दोघेंही शुक्रापाशीं जाऊन पोंचलीं. पित्यास नमस्कार करून देवयानी म्हणाली:—' हा राजा मोठा धर्मात्मा आहे, म्हणून म्हणतात. पण यानें धर्ममर्यादा सोडून कुकर्म केलें आहे. याजपासून शर्मिष्ठेला तीन पण मला अभागीला दोनच पुत्र झाले. अर्थात कनिष्ठानें वरिष्ठाचा व अधर्मानें धर्माचा पाडाव केला, असेंच म्हटलें पाहिजे.' मुलीचें हें बोलणें ऐकून शुक्रानीं राजास रागानें शाप दिला कीं, ' या अधर्मामुळें तुझें शरीर जरायुक्त होईल. ' याचकाचे मनोरथ पुरविणें हें सज्जनांचें व्रत आहे, ऋतु-कालीं स्त्रीचा मनोभंग करणें म्हणजे ब्रह्महत्येचें पातक पदरीं घेणें आहे, इ० प्रकारें ययातिराजा आपल्या वर्तनाचें पोकळ समर्थन करूं लागला. पण **धर्माचरणाचे कामीं लपंडाव करणारा पुरुष चोराइतका पातकी आहे, ( मिथ्याचारस्य धर्मेषु चौर्यं भवति नाहुष )** असें त्यास शुक्रांनीं दरडावून सांगितलें. त्याबरोबर ययातीचें तारुण्य जाऊन तो वृद्ध पुरुष बनला ! पण देवयानीसह यौवनोपभोग घेण्याचें व विलास करण्याचे कामांत आपलें अद्याप समाधान झालेलें नाहीं, अशी ययातिराजा शुक्रापुढें गयावया करूं लागला. तेव्हां शुक्रांनीं त्यास उःशाप देऊन सांगितलें कीं, ' तुला आपली ही जरा दुसऱ्यास देतां येईल. तुझ्या पांच पुत्रांपैकीं जो ही तुझी जरा घेईल त्यास राज्य, पुण्य, कीर्ति, आयुष्य व संतति यांचा लाभ होईल. ' ( आदि० अ० ८३ )

शुक्राचें हें भाषण ऐकून ययाति आपल्या नगरास परत आला; व आपली जरा घेऊन स्वतःचें यौवन आपणास देण्यास कोणता पुत्र तयार आहे, हें पाहूं लागला. ' यौवन-सुखोपभोगाची माझी

अजून तृप्ति झालेली नाहीं; यासाठीं एक हजार वर्षेपर्यंत माझें पाप व जरा घेऊन आपलें यौवन मला दे; माझी तृप्ति झाली म्हणजे तुझें यौवन पुनः परत देऊन मी आपली जरा परत घेईन.' असें त्यानें प्रत्येक पुत्रास म्हटलें. पण पानभोजनाचीं व यौवनाचीं सुखें नष्ट करणारी, सर्व गात्रें शिथिल करून आनंद, शक्ति, बुद्धि, रूप व धर्माचरण यांची हानि व नाश करणारी अशी जरा घेऊन आपलें यौवन पित्यास देण्यास यदु, तुर्वसु, द्रुह्यु, अगर अनु यांपैकीं एकही तयार होईना. हें पाहून ययातीनें प्रत्येकास शाप दिला. 'तुझे राज्यांत अराजक माजेल' असा शाप यदूला, 'पापी म्लेंच्छांचा तूं राजा होशील' असा तुर्वसूला, 'तुझे मनोरथ पूर्ण न होतां तूं अश्वादि वाहनरहित अशा प्रदेशांत जाऊन पडशील' असा द्रुह्यूला 'तुझी प्रजा तारुण्य येतांच मरण पावेल, आणि तूं आगी व परचक्र यांमुळें मृत्यु पावशील' अशा शाप अनूला ययातीनें दिला. सर्वांत धाकटा पुत्र पुरु हा मात्र पित्याची आज्ञा मान्य करून त्याची जरा घेऊन आपलें यौवन त्यास देण्यास तयार झाला. ययातीनें शुक्राचें स्मरण करून आपली जरा पुरूला दिली व त्याचें यौवन घेतलें; आणि 'तुझ्या राज्यांतील सर्व प्रजांचे मनोरथ पूर्ण होऊन त्यांची समृद्धि येईल' असा त्यास वर दिला. ( आदि० अ० ८४ )

पुरूनें दिलेल्या यौवनाचा ययातीनें पुष्कळ वर्षे उपभोग घेऊन धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांचीं यथेच्छ सुखें भोगलीं. तरी त्याचें समाधान न होतां त्यांबद्दलची त्याची लालसा व आसक्ति हीं वाढतच चाललीं.

**न जातु कामः कामानां उपभोगेन शाम्यति ।**
**हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥**

**सर्पणानें अग्नि न विझतां जसा अधिकच पेटतो, त्याप्रमाणें विषयवासना विषयोपभोगानें कमी न होतां उलट वृद्धिंगतच होते. विषयसुखाची तृष्णा अशी आहे कीं, तिचें पूर्ण समाधान कधींही होणें नाहीं; हा मनुष्याला जडलेला एक 'प्राणांतिक रोग 'च आहे;** असा त्यास पुढें पूर्ण प्रत्यय आल्यामुळें मात्र **ययातीस** सुखोपभोगाचा विट आला. त्यानें **पुरूला** त्याचें यौवन देऊन राज्यही त्यास देण्याचा निश्चय केला, व राज्याभिषेकाची तयारी केली. ' नेहमींच्या पद्धतीप्रमाणें राज्य वडील पुत्रास न देतां तें सर्वांत धाकट्या राजपुत्रास राजा देत आहे, हा अधर्म होय. ' असा **ययातीच्या** सर्व प्रजाजनांचा समज झाला. परंतु **ययातीनें** जरा-यौवनाच्या अदलाबदलीची हकीकत त्यांस कळवून सांगितलें कीं, " पहिल्या चारही पुत्रांनीं माझी अवज्ञा केली आहे. **पुरूनें** मात्र माझी आज्ञा मान्य करून मला यौवन दिलें, तोच माझा खरा पुत्र होय. कारण—

**मातापित्रोर्वचनकृद्धितः पथ्यश्च यः सुतः ।**
**स पुत्रः पुत्रवद्यश्च वर्तते पितृमातृषु ॥**

**आईबापांची आज्ञा पालन करून जो त्यांजसंबंधाचें पुत्रकर्तव्य चांगल्या रीतीनें बजावतो, व सदैव त्यांचें हित व कल्याण करितो, तोच खरा पुत्र होय.** शिवाय **शुक्रानीं** मला शाप दिला त्याच वेळीं त्यानीं सांगितलें होतें कीं, जो पुत्र तुझी जरा घेऊन तुला आपलें तारुण्य देईल, त्यासच तूं आपलें राज्य दे.

शुक्राचार्यांची ही आज्ञा मानणें मला भाग आहे.' ययातीचें हें बोलणें ऐकून त्याच्या प्रजाजनांचें समाधान झालें; व त्यांनीं पुरूच्या राज्याभिषेकास संमति दिली. पुरूचा यथाविधि अभिषेक झाल्यावर ब्राह्मण व तपस्वी बरोबर घेऊन ययाति तपश्चर्यार्थ वनांत गेला. गंगा व यमुना या नद्यांमधील मुख्य राज्य पुरूकडे आलें, आणि यदु, तुर्वसु, द्रुह्यु व अनु यांस चारी दिशांचें अंत्याधिपत्व ( सरहद्दींचें संरक्षण करण्याचें काम ) मिळालें. यदूपासून पुढें यादव वंश झाला; तुर्वसूपासून यवन व अनूपासून म्लेंच्छजाती उत्पन्न झाल्या; आणि द्रुह्यूपासून भोजकुळ निर्माण झालें. ( आदि० अध्याय ८५ )

तपोवनामध्यें अनेक प्रकारचीं तपें करून ययातीनें अखेर स्वर्ग संपादन केला. परंतु तेथें एके प्रसंगीं, ' मजसारखा तपस्वी त्रैलोक्यांत एकही नाहीं ! ' अशी त्यानें **बढाई मारल्यामुळें त्याच्या पुण्याचा क्षय झाला,** व तो पृथ्वीवर पडूं लागला. पण अष्टक, प्रतर्दन, वसुमान व शिबी या चार राजर्षींनीं असें सांगितलें कीं, आम्हीं आपलीं सर्व पुण्यें तुला दिलीं आहेत, तूं पुनः स्वर्गीं जा; आम्हीं आमचें पुण्य दिल्यामुळें आम्हांस स्वर्गाऐवजीं नरकप्राप्ति झाली तरी त्याची आम्हांस पर्वा नाहीं. ' पण **क्षत्रियानें दुसऱ्याच्या कोणत्याही वस्तूचें दान घेतां कामा नये,** असा धर्म असल्यामुळें त्यांचीं पुण्यें ययातीनें घेतलीं नाहींत. वरील चारी **राजांचें औदार्य व ययातीचें आत्मसंयमन व धर्मनिष्ठा हे सद्गुण** कसोटीस उतरल्यामुळेंच त्यास पुनः स्वर्गप्राप्ति झाली; व पांचही राजे पांच सुवर्ण रथांत बसून स्वर्गास गेले. ( आदि० अध्याय ८६–९३ )



---

# उतथ्य-पुत्र दीर्घतमा.





विवाहबंधनें अत्यंत शिथिल व स्त्री-पुरुषसंबंध फार स्वैर होते, अशा अतिप्राचीन काळीं उतथ्य व बृहस्पति या नांवाचे दोघे भाऊ भाऊ ऋषि होते. दोघेही बुद्धिमान् असून धाकटा बृहस्पति हा विशेष तेजस्वी होता. देवांचें पौरोहित्यही त्याजकडेच होतें. उतथ्याची पत्नी ममता नांवाची असून ती सन्मान्य स्त्री होती. उतथ्यापासून ती गर्भवती होऊन तो गर्भ सारखा वाढूं लागला; इतका कीं, गर्भावस्थेंतच त्याचें षडंग-वेदाचें अध्ययन झालें! अशा स्थितींत ममता असतांही बृहस्पतीची कामुक वृत्ति अनावर होऊन तो आपल्या वडील भावजयीपाशीं गेला. तिनें अनेक प्रकारें बोलून बृहस्पतीचें पुष्कळ निवारण केलें; गर्भस्थ बालकासही वाचा फुटून त्यानेंही त्याची कानउघाडणी केली. तरीही त्यास न जुमानतां बृहस्पति बलात्कारानें ममतेशीं रममाण होऊं लागला. परंतु ममतेच्या शारीरिक परिस्थितीमुळें त्यापासून त्यास सुख होण्याऐवजीं त्याचा मनोभंग झाला. म्हणून 'तूं जन्मांध होशील' असा बृहस्पतीनें गर्भस्थ बालकास शाप दिला! त्याप्रमाणें ममता प्रसूत झाल्यावर तिला जन्मांध पुत्र झाला, त्याचें नांव 'दीर्घतमा' असें ठेवलें. हा जन्मांध असला तरी अतिबुद्धिमान् व वेदवेत्ता असल्यामुळें त्याचें प्रद्वेषीनामक एका तरुण व सुस्वरूप ब्राह्मणकन्येशीं लग्न झालें. तिच्यापासून त्यास गौतमादि अनेक पुत्र झाले. पुढें हा

अंध ऋषि पशूप्रमाणें दिवसा व सर्व लोकांसमक्ष निःशंकपणें आपल्या स्त्रीशीं रत होऊं लागला ! तेव्हां आश्रमांतील इतर ऋषींनीं दीर्घतम्यास तेथून हांकून दिलें. त्याचे मनांतून आपली पत्नी व पुत्र यांनींही आपल्याबरोबर यावें असें होतें. आपण कोणा तरी क्षत्रिय राजाकडे गेलों म्हणजे आपलें सर्वांचें चांगलें पोषण होईल, असेंही त्यास वाटलें. प्रद्वेषीला दीर्घतम्याच्या अमर्याद वर्तनाचा अतिवीट आला होता, व तिला पुत्र वगैरे संततिही झाली होती; म्हणून तिनें दीर्घतम्याबरोबर जाण्याचें नाकारलें. त्यास तिरस्कारानें ती म्हणाली:—

**भार्याया भरणाद्भर्ता पालनाच्च पतिः स्मृतः ।**

**"नवरा बायकोस अन्नवस्त्रादि देऊन तिचें 'भरण' करतो म्हणून तो 'भर्ता' व तिचें पालन करतो म्हणून तो 'पति' होय.** तुम्ही मला अन्नवस्त्रही देत नाहीं व माझें पालनही करीत नाहीं; उलट मलाच तुमचें व तुमच्या मुलांचें पालन-पोषण करावें लागतें. तुम्ही माझे 'भर्ते' कसले व 'पति' तरी कसले ? मी यापुढें तुम्हांस खावयास मुळींच घालणार नाहीं; मला तुमचें तें द्रव्य नको व जाचही नको. मी आतां आपला दुसराच नवरा करतें." आपल्या स्त्रीचें हें भाषण ऐकून दीर्घतम्यास अतिक्रोध आला; व त्यानें स्त्री-धर्माची पुढीलप्रमाणें मर्यादा घातली. तो म्हणाला:—"यापुढें **जन्मभर स्त्रीस एकच पति असावा; तो जिवंत असतांना किंवा तो मेला तरी तिनें दुसरा पति करूं नये. तिनें तसें केलें तर ती पतित होईल.** पतीचा त्याग करून किंवा पतिमरणोत्तर दुसरा पति न करतां ती परपुरुषाशीं व्यभिचार करील तर तिचें तें कृत्य व तज्जन्य संतति हीं व्यर्थ, दुष्कीर्ति-

कारक व निंद्य समजावीं." नवऱ्याचें हें भाषण ऐकून त्याला गंगेंत नेऊन टाकण्याची प्रद्वेषीनें आपल्या गौतमादि पुत्रांस आज्ञा केली! तीप्रमाणें त्यांनीं आपल्या वृद्ध व अंध पित्यास नदीवर नेलें; परंतु त्यांस त्याचा अशा रीतीनं प्राण घेववेना! तेव्हां त्यांनीं त्यास एका ताफ्यावर बांधलें, तो ताफा नदींत सोडून दिला व ते परत गेले. हा ताफा नदीचे ओघाबरोबर बऱ्याच देशांतून वाहत वाहत एका नगरींत एका घाटास लागला. त्या वेळीं तेथील बलिनामक राजा नदीवर स्नानास आला होता. त्यानें हा ताफा वर ओढून घेऊन दीर्घतम्यास आपल्या राजवाड्यांत नेलें. त्याचे तोंडून सर्व हकीकत ऐकून घेतल्यावर बलीनें त्यास आपणापाशींच ठेवून घेतलें; आणि आपल्या क्षत्रियेचे पोटीं संतानोत्पत्ति करण्याचें काम त्यास सांगितलें. राजानें आपल्या सुदेष्णानामक राणीस दीर्घतम्याची सेवा करण्यास जाण्याची आज्ञा केली; पण दीर्घतमा वृद्ध व अंध आहे असें पाहून राणी स्वतः न जातां त्याजकडे आपली शूद्रदासी पाठवूं लागली. याप्रमाणें कांहीं वर्षे लोटल्यावर त्या शूद्रीचे पोटीं दीर्घतम्यास काक्षीवदादि अकरा पुत्र झाले. राजास खरी हकीकत माहीत नसल्यामुळें तो हे आपलेच पुत्र आहेत, असें समजत होता. परंतु दीर्घतम्यानें राणीनें केलेला लपंडाव राजास सांगितला. तेव्हां बलिराजा पुनः सक्त आज्ञा करून सुदेष्णेस दीर्घतम्याकडे पाठवूं लागला. याप्रमाणें या दीर्घतमा ऋषीपासून बलिराजास राणी सुदेष्णेचे पोटीं अंग, वंग, कलिंग, पुंड्र व सुह्म असे पुत्र झाले. यांच्याच संततीनें पुढें जे जे देश व्यापले त्यांस तीं तीं नांवें पडलीं. ( आदि० अ० १०४ )

---

# अणीमांडव्य-उपाख्यान.





मांडव्य नांवाचा एक धैर्यवान्, धर्मज्ञ व तपोनिष्ठ ब्राह्मण आपल्या आश्रमाजवळच्या एका वृक्षाखालीं वर हात धरून व मौनव्रत स्वीकारून घोर तपश्चर्या करीत होता. अशी त्याची तपश्चर्या बरींच वर्षें झाल्यानंतर एके दिवशीं कांहीं चोर लूट घेऊन तेथें आले. त्यांचा पाठलाग राजाचे बरेच शिपाई करीत असल्यामुळें, लुटीचें धन **मांडव्याचे** आश्रमांत टाकून देऊन चोर तेथेंच लपून बसले. पाठलाग करणाऱ्या शिपायांनीं तेथें येऊन 'चोर कोणत्या मार्गानें गेले, तें आम्हांस त्वरित सांगा' अशी त्यास विनंति केली. परंतु **मांडव्यानें** मौनव्रत स्वीकारलें असल्यामुळें त्यानें त्यांस मुळींच उत्तर दिलें नाहीं. आपल्या या मौनाचा काय परिणाम होणार व त्यापासून आपणावर कोणतें संकट येणार, हें **मांडव्य** जाणून होता. परंतु **व्रतभंगाचे पातकापेक्षां शारीरिक हाल सोसणें हेंच श्रेयस्कर होय,** असें जाणून तो कांहींएक बोलला नाहीं. शिपायांनीं सर्व आश्रम धुंडाळून पाहिला; तेव्हां त्यांस लपलेले चोर व चोरीचा मुद्देमालही सांपडला. या गोष्टीशीं **मांडव्याचे** मौनाचा निकट संबंध असला पाहिजे, असें वाटल्यामुळें शिपायांस अर्थातच त्याचाही संशय आला; व त्यांनीं त्यासही चोरांबरोबर मुसक्या बांधून राजाकडे नेलें. राजानेंही त्यास त्या चोरांसह सुळावर चढविण्याची शिक्षा दिली! राजाचे आज्ञे-

प्रमाणें सर्वांस सुळावर चढवून शिपाई लुटीचे धनासह राजाकडे परत आले. कांहीं वेळानें सर्व चोर मरण पावले, पण **मांडव्यऋषि** आपल्या तपःसामर्थ्यानें तशा भयंकर स्थितींत उपाशीं असतांही अनेक दिवस वांचला! त्याची ही स्थिति ऐकून इतर अनेक तपस्वी पक्ष्यांचे रूपानें रात्रीं येऊन त्याचा समाचार घेऊं लागले, व त्याचें सांत्वन करूं लागले. सुळीं चढविला तरी **मांडव्य** ब्राह्मण मरत नाहीं, हें पाहून शिपायांनीं हें वर्तमान राजास निवेदन केलें. हा चमत्कार ऐकून, आपण कोणातरी महातपस्वी ब्राह्मणास चुकून सुळावर दिलें, असें त्याच्या लक्षांत आलें. नंतर तो आपल्या मंत्र्यांचा सल्ला घेऊन **मांडव्याकडे** आला; आणि 'मजकडून हा चुकून अपराध घडला, मजवर क्रोध करूं नये' अशी त्याची विनवणी करूं लागला. **मांडव्यानें** त्यास क्षमा करून शाप न देण्याचें वचन दिलें. नंतर राजानें त्यास सुळावरून खालीं उतरवून शूळ उपटून काढण्याचा प्रयत्न केला; पण कांहीं केल्या शूळ निघेना! तेव्हां अखेर मुळापासून तो शूळ तोडून काढावा लागला. शूळाचें अग्र जसें शरीरांत घुसलें होतें, तसेंच वागवून **मांडव्यास** आयुष्य कंठावें लागलें! आरंभींची **घोर तपश्चर्या, व्रतभंग न करण्याचा निश्चय, शूलावर तसेंच तपाचरण चालू ठेवण्यांत दिसून आलेला करारीपणा, अपराधी राजाबद्दल क्षमावृत्ति, इत्यादिकांमुळें संपादिलेल्या पुण्याचे जोरावर तो इतरांस दुर्लभ अशा उत्तम लोकीं गेला.** तेव्हांपासून त्याचें नांवही लोकांत '**अणीमांडव्य**' असें पडलें. **यमधर्माकडे** जाऊन त्यानें त्यास प्रश्न केला कीं, 'मीं अज्ञानानें किंवा न कळत असें कोणतें पातक केलें कीं, त्याचें मला असलें भयंकर व दुःखदायक प्राय-

श्चित्त मिळालें ?' यमधर्मानें उत्तर केलें:—'लहान पक्ष्यांचे पुच्छांमध्यें तूं लहानपणीं काडी टोंचली होतीस, त्याचें हें तुला फळ मिळालें.' तेव्हां अणीमांडव्य म्हणाला:—"अशा प्रकारच्या लहान अपराधासाठीं तूं मला फारच कडक शासन केलेंस. यासाठीं तूं मृत्युलोकीं मनुष्य होऊन, शूद्र जातींत जन्म घेशील असा माझा तुला शाप आहे. आणि आजपासून मी असा नियम घालून देतों कीं, **चवदा वर्षांचे आधीं केलेल्या कोणत्याही कृत्याचें पाप मनुष्यास लागूं नये; त्यानंतर मात्र बऱ्यावाईट कृत्याची जबाबदारी ज्याची त्याजकडे असावी.**" अणीमांडव्याच्या या शापामुळें पुढें यमधर्म हस्तिनापुरांत विदुराचे रूपानें अवतरला. (आदिपर्व अ० १०७, १०८.)

---

## व्युषिताश्वराजा.





प्राचीन काळीं व्युषिताश्व नांवाचा एक सुप्रसिद्ध राजा होता. तो अत्यंत धार्मिक, पराक्रमी तेजस्वी व वैभवशाली असून त्यानें अश्वमेध, सोमयागादि अनेक यज्ञ केले होते. याजपासूनच पुढें पुरु वंशाचा विस्तार झाला. कक्षीवान् राजाची कन्या भद्रा ही याची परम प्रिय पत्नी होती. हिचें सौंदर्य अद्वितीय असून या पतिपत्नींचें उभयतांवर विलक्षण प्रेम होतें. त्यामुळें व्युषिताश्व राजा आपला बहुतेक काळ राणीबरोबर सुख-

विलास करण्यांतच घालवूं लागला. **या विलासातिरेकानें क्षयरोग होऊन लवकरच राजा मरण पावला आणि राज्यसुख व स्त्रीसुख यांस कायमचाच अंतरला.** प्रियपति मृत्यु पावल्याचें पाहतांच भद्रा अतिशोक व विलाप करूं लागली. पूर्व जन्मीं आपण प्रेमळ पतिपत्नींची ताटातूट करण्याचें व इतरही घोर पातकें व दुष्कृत्यें केलीं म्हणून आपणास हा कायमचा पतिवियोग झाला, असेंही तिला शोकभरांत वाटूं लागलें. आपल्या पतीचे प्रेतास कवटाळून भद्रा विलाप करीत असतां व्युषिताश्वराजाचा आत्मा आकाशवाणीनें तिला म्हणाला कीं, ' तूं हें माझें शव आपल्या शयनमंदिरांत जपून ठेव, व ऋतुस्नात झाल्यावर चतुर्दशीस किंवा अष्टमीस त्याजसह शयन कर; म्हणजे तुला व मला अपत्यें होतील. ' ह्या आकाशवाणीप्रमाणें भद्रा राणीनें केलें. तेव्हां तिला त्या पति-शवापासून सात पुत्र झाले. व्युषिताश्व राजाच्या ह्या मानस संततीपासून पुढें पुष्कळ विस्तार होऊन पहिल्या तीन पुत्रांचे वंश शाल्वदेशांत व पुढच्या चौघांचे मद्र देशांत राज्यें स्थापून नांदूं लागले. ( आदि० अ० १२१ )

---



# श्वतकेतुमुनि.



अति पुरातन काळीं उद्दालक नांवाचा एक मोटा तपस्वी असून त्यास श्वेतकेतुनामक एक पुत्र होता. एके समयीं उद्दालक व श्वेतकेतु यांचे समक्ष एका ब्राह्मणानें श्वेतकेतूचे मातेचा हात धरून तिला रतिक्रीडार्थ ओढून नेलें. हें कृत्य पाहून श्वेतकेतूस फार राग आला; पण उद्दालकास त्याचें कांहींच वाटलें नाहीं! 'अनादिकालापासून स्त्रिया अशाच स्वैर व स्वतंत्र रीतीनें वागत असून तो त्यांचा धर्मच आहे; यांत रागावण्याचें कांहींच कारण नाहीं' अशी तो उलट आपल्या मुलाचीच समजूत करूं लागला! परंतु ही **स्वैरवृत्ति पशुतुल्य व मनुष्यास अधोगतीस नेणारी आहे,** असें वाटत असल्यामुळें श्वेतकेतूनें स्त्री-धर्माची तेव्हांपासून अशी मर्यादा घातली:—" आजपासून ज्या **स्त्रिया भर्त्यावांचून अन्य पुरुषाशीं समागम करतील त्यांस भ्रूणहत्येचें पातक लागेल.** तसेंच **कौमारावस्थेपासून शुद्ध असलेल्या आपल्या साध्वी स्त्रीवांचून अन्य स्त्रीशीं संबंध ठेवील त्या पुरुषासही हेंच पातक लागेल.** मात्र केवळ पुत्रप्राप्त्यर्थ अन्यपुरुष-समागम करण्याची आज्ञा पतीनें केली असतां, स्त्रीनें त्याप्रमाणें वागलेंच पाहिजे; न वागेल तर तिलाही हेंच पाप लागेल. "
( आदि० अ० १२२ )

---

# तपती व संवरण.





सर्व भूमंडळ व आकाशमंडळ आपल्या तेजानें प्रकाशित करणाऱ्या सूर्याच्या दोन कन्या होत्या. थोरलीचें नांव सावित्री व धाकटीचें तपती ( तापी नदी ) असें होतें. तपतीच्या सौंदर्याची व सद्गुणांची तोड त्रैलोक्यांत कोणाही स्त्रीचे ठिकाणीं नव्हती. ती उपवर झाल्यानंतर तिचें रूप, शील, गुण व विद्या यांस अनुरूप असा वर न मिळाल्याकारणानें सूर्यास मोठी चिंता उत्पन्न झाली. इकडे कुरुकुलांतील ऋक्षराजाचा पुत्र संवरण हा एकनिष्ठेनं सूर्याराधना करीत होता. रोज सूर्योदयाचे वेळीं तो त्याची भक्तिभावानें पूजा व स्तुति करीत असे. आपल्या तपती कन्येस संवरण हाच अनुरूप वर आहे, असें दिसून आल्यावरून तिला त्यास देण्याचा सूर्यानें निश्चय केला. संवरण राजा एके समयीं पर्वतानजीकच्या अरण्यांत मृगया करीत असतां भुकेनें, ताहनेनें व श्रमानें व्याकुळ होऊन त्याचा घोडा मरण पावला. तेव्हां तो पायींच त्या अरण्यांत हिंडूं लागला. कांहीं वेळानें एका पर्वताच्या शिखरावर उभी असलेली एक अत्यंत लावण्यवती कन्या त्यास दिसली. तिचें तें सूर्यासारखें तेज, चंद्रासारखी कांति व सोन्यासारखा वर्ण पाहून संवरणराजा मोहित झाला. त्यानें तिजजवळ जाऊन ' तूं कोणाची कोण ? अरण्यांत एकटीच कां हिंडत आहेस ? ' इ० विचारपूस केली; आणि तिच्या सौंदर्याची स्तुति करून त्यानें आपलें मनोगत तिला कळविलें. संवरणराजाचें हें

भाषण ऐकून ती कन्या त्यास कांहींएक उत्तर न देतां, मेघांत वीज एकदम गुप्त व्हावी, तशी गुप्त झाली ! हा चमत्कार पाहून राजा वेड लागल्याप्रमाणें सगळ्या अरण्यांतून तिचा शोध करीत फिरूं लागला. पण ती कांहीं केल्या सांपडत नाहीं, असें पाहून शेवटीं तो शोकानें विव्हल होऊन भूमीवर मूर्च्छित पडला. ( आदिपर्व अ० १७३ )

निर्जन अरण्यामध्यें संवरण राजा अशा स्थितींत पडलेला पाहून तपती पुनः प्रगट झाली. आणि ' राजा, सावध हो; असें धैर्य सोडणें तुला उचित नव्हे ' असें त्यास म्हणूं लागली. तिचें हें मधुर भाषण कानीं पडतांच राजा सावध होऊन उठून बसला; आणि खोल गेलेल्या आवाजानें व अस्पष्ट उच्चारानें तिला म्हणाला:- ' तुजवांचून आतां अन्य स्त्रीवर माझें प्रेम जडणार नाहीं; आतां माझे प्राण तुझे हातीं आहेत. तूं जर गांधर्व विवाहानें माझी पत्नी होणार नाहींस, तर माझे प्राण खास जाणार.' हें भाषण ऐकून तपतीनें स्मितपूर्वक उत्तर केलें:—"मी सूर्याची तपती नांवाची कन्या असून सावित्रीची धाकटी बहीण आहें; मला पाहून तुझी जशी स्थिति झाली तशी माझीही तुला पाहून झाली आहे. पण बापाचे आधीन असलेली अशी मी कन्या असल्यामुळें मी स्वतंत्र नाहीं, व माझी या देहावर सत्ताही नाहीं. यासाठीं तुझें जर मजवर खरें प्रेम असेल तर सूर्यास प्रसन्न करून घेऊन त्याजवळ माझी मागणी कर; त्यानें जर मला तुला दिली तर मी तुझी भार्या होईन. हल्लींच्या स्थितींत मला नुसतें तुजजवळही येतां येत नाहीं." ( आदि० अ० १७४ )

असें बोलून तपती पुनः गुप्त झाली व संवरण पूर्ववत् निश्चेष्ट होऊन भूमीवर पडला. कांहीं वेळानें राजाचा वृद्ध अमात्य त्याचा शोध करीत सैनिकांसह तेथें आला. राजा तहानभुकेनें व श्रमानें व्याकुल होऊन पडला असावा, असें वाटून अमात्यानें त्यास उठविलें; आणि त्याचे डोक्यावर कमलांनीं सुवासिक केलेल्या गार पाण्याची धार धरून त्यास सावध केलें. राजानें तो अमात्य खेरीज करून इतर सर्व सैनिकांस परत जाण्याचा हुकूम केला; व त्याप्रमाणें सैन्य राजधानीस परत गेलें. व राजा शुचिर्भूत होऊन तेथेंच सूर्याराधना करीत बसला. राजाची ही वार्ता कळल्यावर त्याचे गुरु वसिष्ठमुनिही तेथें आले. राजाच्या या वैराग्याचें खरें कारण अंतर्ज्ञानानें जाणून वसिष्ठ सूर्याकडे गेले, व त्यांनीं त्याची तपती कन्या संवरणासाठीं भूलोकीं आणून तिचा त्याच पर्वतावर यथाविधि संवरणाशीं विवाह करून दिला. राजा परत राजधानीस न येतां तपतीसह त्याच वनांत राहून ऐषआरामांत व क्रीडेंत काळ दवडूं लागला. सर्व राज्यकारभार अमात्यावर सोंपवून त्यानें अशा प्रकारच्या चैनींत बारा वर्षें व्यर्थ घालविलीं! **राजा प्रजेची अनास्था करूं लागला, म्हणजे तिजवर आधिदैविक व आधिभौतिक अनेक संकटें येऊन ती गांजली जाते** व त्यावरून राजाची कर्तव्यभ्रष्टता ईश्वर त्याचे नजरेस आणतो. या नियमानुसार संवरणाचे राज्यांत अनावृष्टीमुळें लवकरच भयंकर दुष्काळ पडला. पोटासाठीं लोक घरदार टाकून दशदिशा भटकूं लागले. जे घरीं राहिले तीं पाण्याचीं पितरें होऊन सर्व राष्ट्रास यमपुरीचें स्वरूप आलें! हें पाहून वसिष्ठऋषींनीं पुनः अरण्यांत जाऊन संवरणास राजधानीस परत आणलें. संवरण व तपती राज्यांत

आल्यापासून पुनः पाऊस पडून धनधान्यसमृद्धि व सुबत्ता झाली. अशा रीतीनें आणखी १२ वर्षें संवरणानें तपतीसह राज्य केलें; तिच्या पोटीं त्याला कुरु नांवाचा पुत्र झाला. ( आदि० अ० १७५ )

---

## वसिष्ठ व विश्वामित्र.





कुशिकाचा पुत्र गाधि हा कान्यकुब्ज देशावर राज्य करीत होता. या राजाचे मागून त्याचा पराक्रमी पुत्र विश्वामित्र हा कान्यकुब्ज देशाचा राजा झाला. एके प्रसंगीं अमात्यांसह घोर अरण्यांत मृगया करीत असतां विश्वामित्र मृगांचा पाटलाग करूं लागला. या मृगयेच्या श्रमानें व तहानेनें विव्हळ होऊन विश्वामित्रराजा वसिष्ठऋषींच्या आश्रमांत आला. ज्या ज्या पदार्थाची इच्छा करावी, तो तो देणारी नंदिनी नांवाची कामधेनु वसिष्ठऋषींजवळ होती. तिचा वर्ण शुभ्र असून तिचे डोळे बेडकाच्या डोळ्यांसारखे मोठे होते; तिचें डोकें व मान पुष्ट असून ती सहा विती उंच होती. ह्या कामधेनूच्या कृपेमुळें वसिष्ठांनीं विश्वामित्राचें त्याच्या सैन्यामात्यांसह उत्कृष्ट स्वागत केलें! ही कामधेनु पाहून विश्वामित्रास तिचा लोभ सुटला. एक अर्बुद ( १० कोटी ) गाई देतों, किंबहुना मी आपलें राज्यही तुम्हांस देतों; पण एवढी कामधेनु मला द्या, असें तो वसिष्ठांस

म्हणूं लागला. ‘ पण देवता, अतिथि व पितर यांचेकरतां व यज्ञासाठीं हिची मला गरज असल्यामुळें राज्याच्या मोबदल्यानेंही ती मला देतां येणार नाहीं ’ असें वसिष्ठांनीं विश्वामित्रराजास उत्तर दिलें. तें ऐकून निद्रित असलेली विश्वामित्राची उद्दाम वृत्ति जागृत झाली. तो म्हणालाः—“ मी धनुर्धारी क्षत्रिय असून तप व वेदाध्ययन हींच काय तीं तुमचीं शस्त्रें आहेत. शांत व आत्मसंयमी अशा तुम्हां ब्राह्मणांत पराक्रम कोठून येणार ? अर्बुद गाई मी देऊं केल्या असूनही तुम्ही माझें ऐकत नाही; तर मी क्षत्रियधर्मानुसार जबरदस्तीनें तुमची कामधेनु नेणार ! ” विश्वामित्राची ही गर्वोक्ति ऐकूनही वसिष्ठांची शांतवृत्ति बिलकूल ढळली नाही. “ तूं राजा आहेस, पराक्रमी क्षत्रिय आहेस व तूं आपल्या सैन्यासह येथें आला आहेस. तेव्हां विचार न करितां जें मनास आलें असेल तें खुशाल व त्वरित कर ” एवढेंच उत्तर वसिष्ठांनी त्यास दिलें. इकडे विश्वामित्रानें आज्ञा केल्यावरून त्याच्या सैनिकांनी गाईला चाबूक व काठ्या यांनी मारून हांकून नेण्याचा प्रयत्न केला; पण कांहीं केल्या ती आश्रमांतून जाईना ! चाबकाचे तडाखे व काठ्यांचे रट्टे बसत असल्यामुळें मोठ्यानें हंबरडा फोडीत ती वसिष्ठाजवळ आली, व म्हणालीः—‘ चाबूक व काठ्या यांनीं मारून विश्वामित्राचे सैनिक मला जबरीनें ओढून नेत असतां व मी आक्रोश करीत असतां तुम्ही माझी कां उपेक्षा करीत आहां ? ’ वसिष्ठः— ‘ **तेज हें क्षत्रियांचें व क्षमा हें ब्राह्मणांचें बल आहे.** यासाठींच मी क्षमावृत्ति स्वीकारली आहे; तुला आवडत असेल तर तूं जा.’ नंदिनीः—‘ एखाद्या सामान्य ब्राह्मणासारखें तुम्ही बोलत आहां. तुम्हीं माझा त्याग केलात काय ? तुम्हीं माझा त्याग

जर केला नसेल तर जबरदस्तीनें मला नेण्याचें कोणाचेंही अंगीं सामर्थ्य नाहीं.' वसिष्ठः—' मीं कांहीं तुझा त्याग केला नाहीं; तुला सामर्थ्य असेल तर तूं रहा. तो पहा तुझा वत्स बळकट दाव्यानें बांधून सैनिक ओढून नेत आहेत!' ' तूं रहा ' अशी आज्ञा मिळतांच नंदिनीनें आपलें रौद्र स्वरूप प्रगट केलें. आपले डोळे रागानें लाल करून, डोकें व मान वर उचलून तिनें गंभीर हंबारव केला; व आपल्या पुच्छापासून पल्हव, दुधापासून द्राविड व शक, योनीपासून यवन, शेणापासून शबर, मूत्रापासून कांची, बरगड्यांपासून शरभ आणि फेंसापासून पौण्ड्र, किरात, सिंहल, बर्बर, खश, चिबुक, पुलिंद, चीन, हूण, केरल, इत्यादि म्लेंछ जातीचे अनेक सैनिक निर्माण केले. या म्लेंच्छ सैन्याची संख्या इतकी झाली कीं विश्वामित्राच्या प्रत्येक सैनिकाचे भोंवतीं पांच-पांच सात सात म्लेंच्छांचा गराडा पडला! याप्रमाणें कांहीं वेळ युद्ध होऊन विश्वामित्रासमक्ष त्याचें सर्व सैन्य तीन योजनें दूर उधळून गेलें! हें पाहून विश्वामित्राचा गर्व नाहींसा होऊन, बलाबलाचा विचार करतां क्षत्रिय-बलाहून ब्रह्म तेजाचें बल अधिक आहे, ही गोष्ट त्याच्या पूर्ण प्रत्ययास आली. तेव्हां तेथून पुढें राज्यवैभव व राज्यसुख यांचा त्याग करून त्यानें घोर व दीर्घ तपश्चर्या केली; त्या तपानें सिद्धि मिळून तिचे जोरावर त्यानें अखेर ब्राह्मणत्व संपादन केलें. ( आदि० अ० १७७ )*

---

* वसिष्ठ-विश्वामित्रांच्या ह्या पुराणप्रसिद्ध विरोधाची कथा अन्यत्र ( शल्य-पर्व अ० ४० ) जरा निराळ्या तऱ्हेनें दिली आहे. गाधी राजाचे मागून विश्वामित्र गादीवर येतांच त्याचे राज्यावर राक्षसांचें परचक्र आलें. त्याचें निवारण

[ पुढें चालू ]

इक्ष्वाकु वंशांत सुदासपुत्र कल्माषपाद नांवाचा एक अत्यंत तेजस्वी व मानी राजा होता. तो एकदां वनांत मनसोक्त मृगया करून रथांत बसून परत राजधानीस जात असतां वसिष्ठ ऋषींच्या शंभर पुत्रांपैकीं सर्वांत वडील मुलगा शक्ति हा त्याच मार्गानें समोरून येत होता. क्षत्रियत्व, राज्यवैभव आणि अहंकारी स्वभाव यांमध्येंच भूक व तहान यांची भर पडल्यामुळें कल्माषपादानें शक्तीला समोर पाहून ' आमच्या मार्गांतून दूर हो; आम्हांला वाट सोड ' असें त्यास उर्मटपणानें बजावलें. वसिष्ठपुत्र शक्ति हा जरी शांत तरी तितकाच मानी असल्यामुळें त्यानें सौम्यपणानें राजास सांगितलें कीं, ' मी कांहीं तुला वाट सोडणार नाहीं. कारण ब्राह्मण समोरून आला असतां राजानें त्यास वाट सोडली पाहिजे, असें शास्त्रवचन आहे.' याप्रमाणें दोघांची बोलाचाली सुरू झाली; कोणीही माघार घेईना. शक्तिही वाट सोडीना, व कल्माषपादही क्रोध व अभिमान यांनीं प्रेरित होऊन रथ बाजूस घेईना. अखेर राजाचा क्रोध अनावर होऊन त्यानें हातांतील चाबूक शक्तीवर अनेकदां ओढले! राजाची उद्दाम वृत्ति अशा

---

[ मागील पृष्ठावरून ]

करण्यासाठीं तोससैन्य जात असतां वाटेंत **वसिष्ठाश्रम** लागला. **विश्वामित्राचें** सैन्य उन्मत्तपणें या आश्रमाभोंवतालच्या महावनाचा विध्वंस करूं लागलें. तेव्हां **वसिष्ठांनीं** क्रोधाविष्ट होऊन आपल्या कामधेनूकडून अनेक भयंकर भिल्ल उत्पन्न केले; व या भिल्लांनीं **विश्वामित्राचें** सैन्य पराभूत करून पिटाळून लावलें! **राजसत्तेपेक्षां तपःसामर्थ्य हें श्रेष्ठ आहे** ही गोष्ट लक्षांत येऊन **विश्वा**मित्रानें पृथूदक **सरस्वतीच्या** तीर्थासन्निध दीर्घकाल घोर तपश्चर्या केली. तिनें संतुष्ट होऊन ब्रह्मदेवानें त्यास ब्राह्मण्य दिलें ' अशी त्रोटक कथा सदर अध्यायांत आहे.



तूं नरमांसभक्षक राक्षस होऊन पृथ्वीवर भटकत राहशील.

रीतीनें कळसास पोंचलेली पाहून शक्तीनें त्यास संतापानें शाप देऊन म्हटलें:—" राजाधमा! ज्या अर्थी तूं माझ्यासारख्या तपस्व्याला राक्षसाप्रमाणें चाबकांनीं मारीत आहेस, त्या अर्थी तूं नरमांसभक्षक राक्षस होऊन पृथ्वीवर भटकत राहशील." कल्माषपाद व शक्ति यांचेमध्यें असा तंटा चालला असतां विश्वामित्र तेथें आले, व तंट्याचें कारण त्यांस कळलें; आणि आपण ज्याचा अनन्वित उपमर्द केला तो ऋषि वसिष्ठाचा ज्येष्ठ पुत्र शक्ति हा आहे, असें राजासही कळून आलें. तेव्हां तो शक्तीला शरण जाऊन त्यास उःशाप मागूं लागला. वसिष्ठाशीं असलेल्या आपल्या हाडवैराचा सूड उगविण्याची ही संधी बरी आहे, असें वाटून विश्वामित्रानें किंकरनामक राक्षसाकडून राजाचे शरीरांत प्रवेश करविला, व विश्वामित्र निघून गेले! शक्ति व राजाही आपापल्या वाटेनें गेले. कांहीं वेळानें कल्माषपादराजास एक द्विज भेटला; त्यानें त्या कालच्या रिवाजाप्रमाणें आपणास मांसान्न भोजन घालण्याची राजास विनंति केली. ' तुम्ही येथेंच वनामध्यें थांबा, मी राजधानीस जाऊन परत येतों व तुमची इच्छा परिपूर्ण करतों.' असें सांगून राजा आपल्या नगरास गेला; व तो ब्राह्मण त्याची वाट पाहत तेथेंच बसला. राजवाड्यांत परत आल्यावर ब्राह्मणास दिलेल्या वचनाची त्यास आठवण राहिली नाहीं; पण मध्यरात्रीं त्यास याचें स्मरण होऊन त्यानें आपल्या मुख्य आचाऱ्यास बोलावून आणून, वनांत वाट पहात बसलेल्या ब्राह्मणास मांसान्न नेऊन घालण्याची आज्ञा केली. ' मध्यरात्रींचे वेळीं कोठें मांस मिळत नाहीं' असें त्यानें राजास कळविलें. तेव्हां शरीरांतील राक्षसी वृत्तीमुळें त्यानें बिनदिक्कत आचाऱ्यास सांगितलें कीं, इतर मांस मिळत

नसेल तर नरमांसाचें भोजन त्यास घाल. राजाच्या ह्या आज्ञे-प्रमाणें, वधाची शिक्षा झालेले कैद्यांस सुळीं देणारे लोक असतात त्यांजकडे आचारी गेला; आणि त्यांजपासून नरमांस घेऊन व यथाशास्त्र शिजवून तें त्यानें वनांतील ब्राह्मणास नेऊन दिलें. पुढें आलेलें मांस खाण्यायोग्य नसून निषिद्ध असें नरमांस आहे, असें त्या ब्राह्मणास दिव्यदृष्टीनें कळलें. तेव्हां त्यानेंही संतापानें ‘ नरमांसभक्षक राक्षस होशील ’ असा राजास शाप दिला ! या दुहेरी शापानें व राक्षस-प्रवेशामुळें कल्माषपादराजा पक्का राक्षस बनून माणसें मारीत व त्यांचें मांस खात वनांतून भटकूं लागला. थोड्याच दिवसांनीं कल्माषपादराजास शक्तिऋषि भेटला. तेव्हां ‘ तूं मला शाप दिल्यामुळें मी नरमांस खाऊं लागलों आहें, तर मी आतां तुलाच खाऊन टाकता ’ असें म्हणून त्यानें शक्तीला ठार मारून त्यास खाऊन टाकलें ! राजाचे शरीरांत प्रवेश केलेल्या किंकर राक्षसास विश्वामित्रानें वसिष्ठांच्या इतर पुत्रांवरही सोडलें, व विश्वामित्राचे इच्छेप्रमाणें त्यानें त्यांचे शंभरही पुत्र मारून त्यांचें मांस भक्षण केलें ! शंभर पुत्रांच्या अशा अमानुष वधामुळें आपला आश्रम रिकामा झालेला पाहून वसिष्ठांस अत्यंत दुःख झालें. तरी **त्यानीं आपल्या शत्रूबद्दल—विश्वामित्राबद्दल—मनांत मुळींच क्रोध आणूं न देतां**, व कौशिक कुळाचा संहार करण्याचा विचारही मनांत न आणतां स्वतःच जीव देण्याचा निश्चय केला. त्यानीं पर्वताचे उंच शिखरावरून खालीं उडी टाकली; पण कापसाचे राशीवर पडल्याप्रमाणें त्यांस कांहींच इजा झाली नाहीं ! नंतर त्यानीं वनांतील पेटलेल्या वणव्यांत प्रवेश केला; तरीही त्यांस मृत्यु आला नाहीं ! त्यांनीं गळ्यांत धोंडा बांधून समुद्रांत उडी घेतली;

तरी समुद्राच्या लाटांचे जोरानें ते पुनः जिवंतच किनाऱ्यास येऊन लागले ! आत्महत्येचे हे सर्व प्रयत्न असे निष्फळ झालेले पाहून वसिष्ठऋषि निरुपायानें आपल्या शून्य आश्रमास परत आले. ( आदि० अ० १७८ )

शंभर पुत्रांनीं सदैव गजबजून गेलेला आपला आश्रम शून्य पाहून वसिष्ठऋषींस पुनः दुःखाचा उमाळा आला; व ते एकटेच रानावनांत पुत्रशोकानें भ्रांत होऊन भटकूं लागले. पावसाळ्यांतील महापुरानें दुथडी भरून गेलेली व तीरावरील वृक्ष पुराचे जोरानें वाहून नेणारी एक नदी त्यांस दिसली. तेव्हां त्यांनीं स्वतःचें शरीर पाशांनीं बळकट बांधून त्या नदींत उडी टाकली. परंतु त्यांचा जीव जाण्याऐवजीं नदीनें त्यांचे पाश तोडून त्यांस पुनः तीरावर आणून टाकलें ! तेव्हां वसिष्ठऋषींनीं त्या नदीचें नांव विपाशा ( बियास) असें ठेवलें. पुनः अशाच रीतीनें अरण्यांत भटकत असतां त्यांस दुसरी एक भयंकर नदी दिसली. ही हिमालयांतून निघालेली असून तिचेमध्यें मोठमोठ्या सुसरी होत्या; या नदींतही वसिष्ठांनीं आत्म-हत्त्या करण्यासाठीं पुनः उडी टाकली. परंतु अग्नीसारख्या तेजस्वी व तपोनिष्ठ ऋषीचें तेज सहन न झाल्यामुळें ही नदी ( शतधा विद्रुता ) शेंकडों मार्गांनीं पळून गेली ! म्हणून वसिष्ठांनीं तिचें नांव शतद्रु ( सतलज ) असें ठेवलें. आत्महत्येचे अनेक प्रयत्न केले तरी ते सफल होत नाहींत असें पाहून, आपलें आयुष्य अद्याप सरलें नाहीं, अशी त्यांची खात्री झाली व ते आश्रमास परत आले. आश्रमांत येऊन इकडे तिकडे हिंडतात तों शक्तीसारखाच वेदवेदांग-घोष त्यांस ऐकूं येऊं लागला. त्यांनीं चौकशी केली, तेव्हां त्यांचे पाठोपाठ आलेल्या शक्तीच्या अदृश्यंती नांवाच्या पत्नीनें

उत्तर केलें कीं, 'माझे पोटीं जो गर्भ आहे त्याचा हा वेदपठनाचा ध्वनि आहे.' आपल्या सुनेचें हें बोलणें ऐकून वसिष्ठांस फार आनंद झाला. शंभर पुत्र मेले तरी आपल्या कुलाची शाश्वती या नातवामुळें कायम राहणार आहे, असें वाटून इतउत्तर त्यांनीं आत्महत्येचे विचार सोडून दिले.

पुढें एके दिवशीं वसिष्ठऋषि व त्यांची सून निर्जन अरण्यांत हिंडत असतां त्या वनांत नरमांस खात भटकत असलेला कल्माषपादराजा त्यांस दिसला. त्या दोघांस पाहतांच कल्माषपाद हातांत मोठा सोटा घेऊन त्यांस खाऊन टाकण्यासाठीं त्यांचे अंगावर धांवून आला. अदृश्यंती अगदीं गर्भगळित झाली; परंतु वसिष्ठांनीं तिला धीर देऊन कल्माषपादास नुसत्या हुंकारानेंच मागें हटविलें; आणि अभिमंत्रित पाणी त्याचे अंगावर फेंकून त्यास शापमुक्त केलें! शक्तीच्या शापानें बारा वर्षें राक्षसी वृत्तीनें ग्रस्त झालेला सुदासपुत्र कल्माषपादराजा वसिष्ठांचे कृपेनें शुद्धीवर आला. या उपकाराबद्दल वसिष्ठांची कृतज्ञतापूर्वक त्यानें स्तुति केली. आणि त्यांचे सांगण्यावरून 'श्रेष्ठ व पूज्य ब्राह्मणांचा यापुढें मी उपमर्द करणार नाहीं' असेंही त्यानें वचन दिलें. बारा वर्षें शापग्रस्त झालेला आपला सौदासराजा शापमुक्त होऊन वसिष्ठऋषींसह परत आपल्या राजधानीस येत आहे, हें ऐकून अयोध्यावासी लोकांनीं मोठा उत्सव केला; त्यांनीं रस्त्यावर कुंकमाचे सडे घालून सर्वत्र पताका, ध्वज व तोरणें उभारलीं. पुत्र प्राप्त इच्छा राजानें प्रदर्शित केल्यावरून व त्याचेच विनंतीवरून, त्या कालच्या रीतीप्रमाणें, वसिष्ठऋषींनीं त्याचे राणीचे पोटीं नियोगविधीनें पुत्र उत्पन्न केला. पोटांतील गर्भ योग्य वेळ झाली तरी बाहेर येईना,

असें पाहून राणीनें अश्मकानें ( दगडानें ) आपल्या पोटावर मारून घेतलें. तरीही हा गर्भ त्या वेळीं बाहेर न निघतां ती पुढें बारा-वर्षांनीं प्रसूत झाली ! या पुत्राचें पुढें ' अश्मक ' असें नांव ठेवण्यांत आलें. ( आदि० अ० १७९ )

कल्माषपादराजानें आपल्या मदयंती राणीचे पोटीं वसिष्ठाकडून नियोगानें पुत्रोत्पत्ति करविण्याचें तसेंच कारण होतें. शक्तीच्या शापानें व राक्षसप्रवेशानें उन्मत्त होऊन कल्माषपादराजा एकदां आपल्या अंतःपुरासह निर्जन अरण्यांत गेला. नरमांस शोधार्थ इकडे तिकडे हिंडत असतां एक ब्राह्मणाचें जोडपें रतिक्रीडा करीत असलेलें त्यास दिसलें. राजाचा लवाजमा पाहून ब्राह्मण व ब्राह्मणी लाजून पळून जात असतां कल्माषपादानें ब्राह्मणास बलात्कारानें धरलें; आणि त्यास जीवदान देण्यासाठीं ब्राह्मणस्त्री अत्यंत दीनवाणीनें राजाची विनवणी करून आक्रोश करीत असतांही तिकडे लक्ष न देतां त्यानें त्या ब्राह्मणास त्याचे पत्नीचे डोळ्यांदेखत, एकाद्या रानटी व क्रूर श्वापदाप्रमाणें ठार मारून खाल्लें ! तेव्हां त्या ब्राह्मणस्त्रीनें संतापानें राजास शाप दिला कीं, ' माझ्या प्रियपतीला अशा स्थितींत व माझ्या देखत ज्या-अर्थीं तूं मारिलेंस त्या अर्थीं आपल्या राणीशीं समागम करावयास लागतांच तूंही प्राणास मुकशील; तुझ्या कुलाची परंपरा राखणारा तुला राजपुत्र हवा असेल तर, ज्याचे शंभर पुत्र तूं मारून टाकलेस त्याच वसिष्ठ-ऋषींकडून तुला पुत्रोत्पत्ति करून घ्यावी लागेल ! ' हा शाप वसिष्ठांस अंतर्ज्ञानानें कळला होता. मदयंती राणीनें तर हा शाप समक्षच ऐकला होता. पुढें वसिष्ठऋषींच्या मंत्रोदकानें शापमुक्त झाल्यानंतर या शापाचें स्मरण न राहिल्यामुळें कल्माषपादराजा मनांत

समागमाची इच्छा धरून राणीजवळ गेला असतां तिनें त्यास शापाची आठवण करून दिली. तेव्हां तो अत्यंत उद्विग्न झाला, व त्यास फार पश्चात्तापही वाटला. अखेर आपलें राजकुळ व राजवंश अव्याहत राखण्यासाठीं त्यानें मदयंती राणीचे पोटीं वसिष्ठांकडून नियोगानें पुत्रोत्पत्ति करविली. ( आदि० अ० १८४ )

इकडे आश्रमामध्यें वसिष्ठांची सून अदृश्यंति ही प्रसूत होऊन तिला पुत्र झाला. आपल्या नातवाचे जातकर्मादि संस्कार वसिष्ठ-ऋषींनीं मोठ्या हौसेनें केले. त्या मुलानें गर्भस्थ असतांना वसिष्ठ ऋषींस ( परासुः ) आत्महत्त्येपासून पराङ्मुख करून संसारांत पुनः स्थापित केलें, म्हणून त्याचें नांव ' पराशर ' असें ठेवण्यांत आलें. त्याचें लालनपालन वसिष्ठांनींच केल्यामुळें पराशर त्यांसच आपला पिता मानूं लागला. बोलावयास येऊं लागल्यावरही तो त्यांस ' तात तात ' ( बाबा बाबा ) असेंच म्हणूं लागला ! आपल्या मुलाचें हें मधुर व अर्थपूर्ण बोबडें भाषण ऐकून अदृश्यंती पतीची आठवण होऊन अश्रु गाळीत असे. त्यास थोडेंसें समजूं लागल्यावर, एके वेळीं त्यानें वसिष्ठांस वरीलप्रमाणेंच हांक मारली असतां डोळ्यांत अश्रु आणून ती पराशरास म्हणाली:— ' बाळा, हे तुझे पिते नव्हेत; यांस ' तात तात ' असें म्हणूं नको. हे तुझ्या वडिलांचे पिते, तुझे अजोबा आहेत. तुझ्या पित्याला अरण्यांत राक्षसानें मारून खाऊन टाकलें आहे ! ' आपला बाप अशा रीतीनें मृत्यु पावल्याचें ऐकून क्रोधाचे भरांत सर्व लोकांचाच संहार करण्याचा त्यानें निश्चय केला. परंतु और्वाची कथा त्यास सांगून वसिष्ठानीं त्याचें मन या भयंकर पापकर्मापासून परावृत्त केलें. ( आदि० अ० १८० ) तथापि आपल्या पित्याच्या

वधाचा सूड उगविण्याची त्याची बुद्धि नाहींशी झाली नाहीं. त्यानें ' राक्षससत्र ' प्रारंभ करून लहान, तरुण, वृद्ध अशा सर्व राक्षसांचा संहार चालविला. याच्या ह्या दुसऱ्या प्रतिज्ञेचा भंग करण्याचा दोष आपणाकडे नको, म्हणून वसिष्ठऋषि या वेळीं त्यास बोलले नाहींत. पराशराचें राक्षससत्र याप्रमाणें बरेच दिवस चालून राक्षस जातीचा समूळ उच्छेद होण्याची वेळ आली. तेव्हां अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, महाक्रतु वगैरे ऋषि तेथें येऊन सत्र समाप्त करण्याची त्यास विनंति करूं लागले. पुलस्त्य-ऋषि त्यास म्हणाले:—" माझ्या सर्व राक्षसप्रजेचा उच्छेद तूं करूं नको. **तपस्वी द्विजांचें शम, मनोनिग्रह व आत्मसंयमन हें कर्तव्य असून लोकोच्छेद करणें हा त्यांचा मुळींच धर्म नाहीं.** तूं धर्मनिष्ठ व श्रेष्ठ असूनही हा अधर्म करीत आहेस. शक्तीनें आपल्या शापानें आपला मृत्यु उत्पन्न करून ठेवला होता; कारण कोणत्याही राक्षसाचे अंगीं त्याचा वध करण्याचें सामर्थ्य नव्हतें. **शक्ति आपल्या स्वतःच्याच दोषानें परलोकीं गेला.** या कामीं विश्वामित्र किंवा कल्माषपाद अगर तो राक्षस हे केवल निमित्तमात्र होत. राजा कल्माषपाद, शक्ति व त्याचे इतर बंधु हे सर्व सांप्रत आनंदानें एकत्र स्वर्गसुख अनुभवीत आहेत. हें सर्व वसिष्ठऋषींसही विदित आहे. यासाठीं तूं हें राक्षससत्र बंद कर." वसिष्ठऋषींनींही पराशरास असाच उपदेश केला. तेव्हां पराशरानें हें सत्र समाप्त करून त्यासाठीं तयार केलेला अग्नि हिमालय पर्वताचे उत्तर उतरणीवरील अरण्यांत टाकून दिला. हा अग्नि पांडवकाळींही तिकडे वृक्ष, शिला व राक्षस यांस जाळीत असलेला दिसून येत असे. ( आदि० अ० १८३ )

---

# और्व–उपाख्यान.





वेदवेत्या भृगुऋषींचा कृतवीर्य नांवाचा राजा यजमान होता. त्यानें एका सोमयज्ञाचे शेवटीं आपल्या पुरोहितांस उदारपणें फार विपुल धनधान्य दिलें. पुढें कृतवीर्यराजा मरण पावल्यानंतर त्याचे कुलांतील कार्तवीर्य राजांना द्रव्याची गरज पडली. आपल्या बापानें दिलेलें विपुल धन भार्गवऋषींचे जवळ आहे हें त्यांस माहीत होतें. त्यामुळें ते सर्व राजे सज्ज होऊन भार्गवाश्रमास आले. कार्तवीर्यांचे भीतीनें कित्येकांनीं आपलें धन जमिनींत पुरलें; कित्येकांनीं दान देऊन टाकलें; व कित्येकांनीं मुकाट्यानें तें कार्तवीर्यांच्या स्वाधीन केलें. सर्वांकडून सर्व धन आलें नाहीं, असें पाहून कार्तवीर्य राजे सरसकट लहानमोठ्या भार्गवांचा वध करूं लागले! आपल्या बाहुबलाचे घमेंडींत त्यांनीं आपल्या पुरोहित कुलाची अशी कत्तल सुरू केल्यामुळें भृगुकुलांतील स्त्रिया हिमालय पर्वताच्या बिकट दऱ्याखोऱ्यांत पळून गेल्या. त्यांपैकीं एकीनें कार्तवीर्यांचे भीतीनें आपल्या ऊरू-( मांडीं ) त गुप्तपणें गर्भ धारण केला होता. ही बातमी दुसरीनें कार्तवीर्यांस जाऊन सांगितली. ते तेथील सर्व आश्रमभूमि खणून व तेथें लप-

विलेलें द्रव्य हरण करून हिमालयांत आले. भार्गवांचा पूर्ण निःपात करण्याचा त्यांचा निश्चय असल्यामुळें ते त्या गर्भाचा उच्छेद करण्यासाठीं त्या स्त्रीजवळ आले. पण तिचें अपूर्व तेज पाहून ते चकित होतात न होतात तों अत्यंत देदीप्यमान गर्भ स्त्रीची 'ऊरु' फाडून बाहेर आला! त्याचे तेजानें त्या सर्व राजांचे डोळे जाऊन ते आंधळ्यासारखे हिमालयाचे दऱ्याखोऱ्यांत भटकूं लागले. **पराक्रमाचा मद अतिरेकास जाऊन त्यामुळें घोर कर्में होऊं लागलीं, कीं 'शेरास सव्वाशेर' या न्यायानें ईश्वर अधिक पराक्रमी व अधिक तेजस्वी पुरुष उत्पन्न करून जगाची बिघडलेली घडी पुनः नीट बसवितो.** और्वाच्या जन्माचें तरी हेंच कारण होतें. और्वाचे केवळ तेजानें आपली अशी अवस्था झालेली पाहून ते सर्व कार्तवीर्य राजे त्या भार्गव-स्त्रीस शरण आले; व "आमची दृष्टि आम्हांस परत येऊं दे, आम्ही मुकाट्यानें परत जातों" अशी तिची दीनपणें विनवणी करूं लागले. ( आदि० अ० १८० )

कार्तवीर्यांची ही दीन वाणी ऐकून ब्राह्मणीनें उत्तर केलें:— "मी तुमचेवर रागावलेली नाहीं; व मीं तुम्हांस अंधही केलेलें नाहीं. तुम्ही भृगुकुलांतील स्त्रियांच्या गर्भाचाही नाश करूं लागलांत तेव्हां भीतीनें मीं हा गर्भ शंभर वर्षें ऊरूमध्यें धारण केला. तेथेंच वेद-वेदांगांचें त्यास ज्ञान झालें. आपल्या बंधूंचा तुम्हीं केलेला संहार ऐकून ह्या माझ्या पुत्रास क्रोध येऊन त्यानेंच तुम्हांस अंध केलेलें आहे; त्यासच शरण जाऊन तुम्ही त्यास प्रसन्न करून घ्या, म्हणजे तुम्हांस दृष्टि येईल." स्त्रीचे या उपदेशाप्रमाणें त्यांनीं

और्वाची स्तुति केली, तेव्हां त्यांस पूर्ववत् दृष्टि येऊन ते आपापल्या राज्यांत निघून गेले. तथापि भृगुकुलाच्या संहाराचा सूड उगविण्याचा और्वाचा निश्चय कमी न होतां तो उलट वाढूंच लागला. तो आपल्या तेजानें कार्तवीर्यच नव्हे तर सर्व क्षत्रियांचा संहार करूं लागला. तेव्हां त्याचे पितर स्वर्गांतून त्याजकडे येऊन त्याचें मन वळवूं लागले. " आमचा संहार झाला यांत कार्तवीर्यांचा कांहीं दोष नाहीं; आमचींच आयुष्यें संपलीं म्हणून आम्हांस त्यांचे हातून मृत्यु आला. आम्हांला **सद्गतीपुढें द्रव्य किंवा सूड यांची मुळींच किंमत वाटत नाहीं.** यासाठीं क्षत्रियांचा संहार करण्याचें पापकर्म तूं करूं नको " इ० इ० प्रकारें ते बोलूं लागले. ( आदि० अ० १८१ ) तेव्हां और्वानें उत्तर केलें:—" सर्व लोकांचा संहार करण्याची जी प्रतिज्ञा एकदां मीं रागानें केली आहे ती कधींही खोटी होणार नाहीं. माझा राग किंवा प्रतिज्ञा हीं मीं निष्फळ होऊं दिलीं, तर माझा क्रोधाग्नि मलाच जाळून टाकील.

**यो हि कारणतः क्रोधं संजातं क्षंतुमर्हति ।**
**नालं स मनुजः सम्यक् त्रिवर्गं परिरक्षितुम् ।**
**अशिष्टानां नियंता हि शिष्टानां परिरक्षिता ।**
**स्थाने रोषः प्रयुक्तः स्यान्नृपैः सर्वजिगीषुभिः ॥**

**योग्य कारणामुळें उत्पन्न झालेला राग जो मनुष्य आवरून धरून क्षमेचा आश्रय करतो, त्याला धर्मार्थकाम ह्या तीन पुरुषार्थांचें नीट रक्षण करतां येत नाहीं. सर्वांवर आपली**

छाप बसविण्याची इच्छा करणाऱ्या राजांनीं योग्य स्थळीं जर क्रोध दाखविला तर त्यापासून सज्जनांचें रक्षण व दुर्जनांचें शासन आपोआपच होत असतें. या क्षत्रियाधमांनीं भृगु-कुलाचा—गर्भस्थापासून वृद्धापर्यंतचे सर्व पुरुष मारून—संहार चालविला; तेव्हां कोणी त्राता नसल्यामुळें आम्हांमध्यें झालेला हाःहाःकार व मातांचा शोक मला मातेच्या ऊरुगर्भांत ऐकूं आला. त्या वेळेपासूनच मला राग आला असून मीं क्षत्रियांचा संहार करण्याची प्रतिज्ञा केली आहे, ती पुरी झालीच पाहिजे. कारण,

प्रतिषेद्धा हि पापस्य यदा लोकेषु वर्तते ।
तदा सर्वेषु लोकेषु पापकृन्नापपद्यते ॥

जगामध्यें पापकर्मास प्रतिबंध करणारा कोणी असला, म्हणजे पापाकडे मनुष्याची प्रवृत्ति होत नाहीं; पण—

यदा तु प्रतिषेद्धारं पापो न लभते क्वचित् ।
तिष्ठंति बहवो लोकास्तदा पापेषु कर्मसु ॥

असा प्रतिबंधकर्ता कोणी नसला म्हणजे पुष्कळ लोकांची पापमार्गाकडे सहजच प्रवृत्ति होते. शिवाय—

जानन्नपि च यः पापं शक्तिमान्न नियच्छति ।
ईशः सन्सोऽपि तेनैव कर्मणा संप्रयुज्यते ॥

सामर्थ्य असूनही जो शक्तिमान् पुरुष जाणूनबुजून पापी पुरुषास प्रतिबंध करीत नाहीं त्या पुरुषासही त्या कर्माचें पातक लागतें. इतर राजांस सामर्थ्य असूनही ज्या अर्थीं त्यांनीं माझ्या पितरांचें संरक्षण आपल्या जिवाच्या आशेमुळें केलें नाहीं,

त्या अर्थी मीं त्या सर्वच क्षत्रियांचा संहार करण्याची प्रतिज्ञा केली आहे. मला सामर्थ्य असूनही जर मी प्रतिज्ञाभंग करून आपल्या पितरांच्या संहाराकडे कानाडोळा केला, तर त्या संहाराचें पातक मलाच लागेल. सर्व लोकांच्या हिताची इच्छा करणारे तुम्ही आहां हें मी जाणून आहें. पण तुमच्या आज्ञेवरून मीं जर आपला क्रोधाग्नि आंवरून धरिला तर तो मलाच जाळून भस्म करील; अशा स्थितींत मीं तरी काय करावें तें तुम्हींच सांगा." और्वाचें हें भाषण ऐकून पितरांनीं त्याची अशी समजूत घातली कीं, सर्वजण आपस्वरूपीच असल्यामुळें और्वानें आपला क्रोधाग्नि जर समुद्रांत टाकला तर त्याची प्रतिज्ञाही पुरी होईल, व लोकांचाही संहार टळेल. पितरांच्या ह्या उपदेशाप्रमाणें और्वानें आपला क्रोधाग्नि समुद्रांत टाकला; हाच अग्नि पुढें घोड्यासारखें डोकें धारण करून वडवानल झाला; व तेव्हांपासून आपल्या तोंडांतून निघणाऱ्या अग्नीचे योगानें तो समुद्राचें पाणी पिऊं लागला. (आ० अ० १८२)

---

## सुंद आणि उपसुंद.



हिरण्यकशिपु नांवाच्या महासुराच्या वंशांत 'निकुंभ' नामक एक प्रबळ व तेजस्वी दैत्यराजा होऊन गेला. त्याला सुंद व उपसुंद नांवाचे दोन महापराक्रमी पुत्र होते. त्यांचें परस्पर प्रेम इतकें होतें कीं, त्यांचीं सुखदुःखें एकच असत, ते एकाच शयनावर निजत, एकाच आसनावर बसत, एकत्र भोजन करीत व एक-

मेकांच्या सुखासाठीं सदैव झटत. त्यांचा स्वभाव, शील व आचार-विचारही एकच होते. सारांश, एकच दैत्य दोन ठिकाणीं विभागल्याप्रमाणें त्यांचें वर्तन असे. पुढें कांहीं कालानें सर्व त्रैलोक्यावर जय मिळवून त्यांचें राज्य संपादण्याची महत्त्वाकांक्षा त्यांचे मनांत उद्भवली. **शरीरबल, बुद्धिबल, ज्ञानबल, शस्त्रबल इत्यादि बलांचे जोडीस तपोबलही असलें म्हणजे इष्टकार्यसिद्धि हटकून होते.** हा सिद्धांत लक्षांत आणून हे दोघे दैत्यबंधु जटा-वल्कलें धारण करून विंध्यपर्वतावर उग्र तपश्चर्या करूं लागले. त्यांच्या ह्या दीर्घकालिक घोर तपाचे प्रभावानें विंध्यपर्वत तप्त होऊन गेला, व त्यांतून धुराचे लोट वर निघूं लागले! असुरबंधूंच्या या तपानें देवही भयभीत होऊन त्यांत विघ्न करूं लागले. बहुमोल रत्नें, सुंदर व तरुण स्त्रिया इत्यादि साधनांनीं त्यांचें मन भ्रष्ट करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला; पण सुंदोपसुंदांचें मन तिळमात्रही ढळलें नाहीं. तेव्हां 'त्यांच्या बहिणी, आया, भार्या व इतर आप्तेष्ट यांस एक राक्षस शूलानें मारीत आहे; आणि तीं केंस मोकळे टाकून व वस्त्रें-भूषणें अस्ताव्यस्त होऊन सैरावैरा ओरडत हिंडत आहेत; 'आणि आमचें रक्षण करा' असा आक्रोश करीत आहेत' असा देखावा देवांनीं त्या दैत्यबंधूंचे पुढें मायेनें उत्पन्न केला. तरीही त्यांनीं आपला व्रतभंग व तपोभंग होऊं दिला नाहीं. याही उपायानें सुंदोपसुंदांचे मनास क्षोभ किंवा दुःख होत नाहीं, असें दिसतांच ह्या सर्व स्त्रिया गुप्त झाल्या; व प्रत्यक्ष ब्रह्मदेव त्यांचे तपानें प्रसन्न होऊन समोर प्रगट झाले; व त्यांस वर देऊं लागले. 'सर्व माया व अस्त्रविद्या आम्हांस अवगत व्हावी, आम्हांस सर्व सामर्थ्य यावें, वाटेल तें रूप आम्हांस घेतां यावें व

आम्हीं अमर व्हावें ' असा त्यांनीं वर मागितला. तेव्हां ब्रह्मदेव म्हणाले:–' तुम्हीं त्रैलोक्य जिंकण्याचेच हेतूनें तप केलेलें असतांही तुम्ही अमरत्व मागतां हें ठीक नाहीं; तें तुम्हांस मी देणार नाहीं. अमरत्वाखेरीज इतर जें काय तुम्ही मागाल तें तुम्हांस मी देईन. ' हें ऐकून ' आम्हांस परस्पर खेरीज करून त्रैलोक्यांतील कोणत्याही स्थावरजंगम वस्तूपासून भय असूं नये. ' असा त्यांनीं वर मागितला, व तो ब्रह्मदेवांनींही त्यांस मोठ्या आनंदानें दिला. अशा प्रकारें त्यांचें तप सफल झाल्यावर ते राजधानीस परत आले, आणि जटा–वल्कलें काढून टाकून त्यांनीं राजमुकूट व बहुमोल वस्त्रें धारण केलीं. तसेंच त्यांनीं आपल्या तपःप्रभावानें आपल्या राज्यांत सर्वकाल चंद्रासारखा प्रकाश पाडून ठेवला ! याप्रमाणें या दैत्यराज-पुत्रांस असे अपूर्व वर मिळाल्या कारणानें त्या दैत्यराज्यांत पुष्कळ दिवस उत्सव व आनंदीआनंद होत होता. ( आदि० अ० २११ )

वरील आनंदोत्सव संपल्यानंतर सुंदोपसुंद बंधु दैत्यसैन्य बरोबर घेऊन त्रैलोक्य जिंकण्यासाठीं नगराबाहेर पडले. गदा, पट्ट, शूळ, मुद्गर इत्यादि आयुधें घेतलेल्या या असुरसैन्यासह जाऊन ह्या दैत्यबंधूंनीं देवांचा स्वर्गलोक, इंद्रलोक, यक्ष राक्षस, पातालवासी नाग, व समुद्रवासी सर्व म्लेंच्छजाति जिंकल्या. देवांचें तेज, बल व वैभव राजर्षि व ब्रह्मर्षि यांच्या यज्ञयागांनीं वाढत असतें; यासाठीं त्यांचा निःपात करण्याची त्यांनीं आपल्या सेनेस आज्ञा केली. त्याप्रमाणें पूर्वसमुद्रतीरापासून जी ही दैत्यसेना निघाली ती नगरें, आश्रम, यज्ञशाला यांचा विध्वंस आणि ब्राह्मण, मुनि, तपस्वी, ऋषि वगैरेंची कत्तल करीतच चालली ! तपोनिष्ठ मुनींनीं त्यांस

दिलेले शापही, ब्रह्मदेवांकडून मिळालेल्या वरांमुळें निष्फळ होऊं लागले. राक्षससेनेच्या या दुष्ट धामधुमीमुळें शेतकी, उद्योगधंदे, व्यापार-व्यवहार, यज्ञयाग, वेदाध्ययन वगैरे सर्व नष्ट होऊन सर्व जग उध्वस्त झालें. याप्रमाणें तामसी पराक्रम करून झाल्यावर ह्या दैत्यसेनेचा तळ कुरुक्षेत्रांत पडला. ( आदि० अ० २१२ )

सुंदोपसुंदांच्या जुलमानें त्रस्त झालेले देव व ऋषि यांनीं ब्रह्मलोकीं जाऊन ब्रह्मदेवास सर्व वृत्तांत निवेदन केला. आणि ह्या दैत्यबंधूंचा नाश करून सर्व जगाची दुःखांतून मुक्तता करण्याबद्दल त्यांची करुणा भाकली. ब्रह्मदेवानीं कांहीं वेळ विचार करून विश्वकर्म्यास बोलावून आणलें; आणि एक अत्यंत रूपवती व तरुण अप्सरा निर्माण करण्याची त्यास आज्ञा केली. त्याप्रमाणें विश्वकर्म्यानें सृष्टींतील प्रत्येक सुंदर व मनोहर वस्तूचा तिळ तिळ भाग घेऊन त्यापासून एक दिव्य स्त्रीरत्न निर्माण केलें; व म्हणून तिचें ब्रह्मदेवांनीं '**तिलोत्तमा**' असें नांव ठेवलें. * सुंदोपसुंद बंधूंकडे जाऊन तूं आपल्या अप्रतिम लावण्यानें व मनोहर विलासांनीं त्यांचीं मनें मोहित कर व त्या दोघांत वितुष्ट उत्पन्न कर, अशी ब्रह्मदेवांनीं तिला आज्ञा केली. त्या आज्ञेप्रमाणें तिकडे जाण्यापूर्वीं सर्व देवांस व ऋषींस ती प्रदक्षिणा करूं लागली असतां तिच्या सुंदर मुखाकडे सर्वांचे नेत्र व मनें आकर्षिलीं गेलीं. तिलोत्तमा याप्रमाणें प्रदक्षिणा करीत असतां महादेवास चार दिशांस चार मुखें झालीं, व इंद्रास सर्व शरीरभर सहस्रनेत्र उत्पन्न झाले ! तिलोत्तमेच्या रूपाचा हा प्रभाव पाहून सुंदोपसुंदांचा आतां खास नाश होणार, असें सर्व देवांस व ऋषींस वाटलें. ( आदि० अ० २१३ )

इकडे सुंदोपसुंद सर्व त्रैलोक्य जिंकून त्याचें निष्कंटक राज्य मिळाल्यामुळें निरुद्योगी होऊन त्रैलोक्यांतून जिंकून आणलेल्या सर्व संपत्तीचा उपभोग घेत वनोपवनांमध्यें यथेच्छ क्रीडा करूं लागले. एकदां विंध्यपर्वताच्या एका सपाट पठारावर फुलांनीं गजबजलेल्या शाल वृक्षाखालीं हे दोघे बंधु क्रीडा करीत यथेच्छ सुरापान करीत होते. इतक्यांत नदीतीरीं एकच तांबडें नेसतें वस्त्र अस्ताव्यस्त झालेलें, अशा स्थितींत कर्णिकार पुष्पें वेंचीत असलेली तिलोत्तमा त्यांचे दृष्टीस पडली. **तपानें किंवा पुण्यसंचयानें मिळविलेल्या सामर्थ्याचा दुरुपयोग केला असतां पुण्यक्षय होतो, एवढेंच नव्हे तर उलट आत्मनाशाचींही बीजें रुजलीं जातात.** सुंदोपसुंदांचीही अशीच स्थिति झाली. वर-प्राप्ति, त्र्यैलोक्याचा विजय, पराक्रम, दुष्ट कत्तलीं, धनरत्नें, विषयोपभोग, सुरापान इत्यादिकांनीं त्यांचा पुण्यक्षय होऊन उलट त्यांचे अंतःकरणांत दुष्ट वासनांचें बीं रुजलें, व तें तिलोत्तमेचे दर्शनानें जोरानें अंकुर फुटून बाहेर आलें. तिलोत्तमेला पाहतांच दोघेही भाऊ एकदम उठून तिजकडे गेले. सुंदानें तिचा उजवा आणि उपसुंदानें डावा हात धरला. **पूर्वींच्या सर्व मदांत सुरामद व काममद याची भर पडून ते एकमेकांविषयींचा पूर्वींचा स्नेह व बंधुप्रेम पूर्णपणें विसरून जाऊन एकमेकांशीं भांडूं लागले.** ‘ ही माझी बायको असून तुझी वडील भावजय आहे ’ असें सुंद म्हणूं लागला; तर ‘ ही माझी भार्या व तुझी सून आहे ’ असें उपसुंद प्रतिपादूं लागला ! अखेर हा तंटा विकोपास जाऊन दोघांनींही आपल्या प्रचंड गदा हातीं घेतल्या; व त्यांचे एक-मेकांवर प्रहार करून वरांतील ब्रह्मदेवांच्या गुप्त शापास अनुसरून





सुंदानें तिलोत्तमेचा उजवा व उपसुंदानें डावा हात धरला.

दोघेही रक्तबंबाळ होऊन भूमीवर मरून पडले! एका स्त्रीमुळें त्रैलोक्यविजयी सुंदोपसुंदांचा असा अंत झालेला पाहून सर्व दैत्य व असुर उद्विग्न व भयभीत होऊन पाताळलोकीं पळून गेले. ब्रह्मदेव सर्वदेव व ऋषि यांसह तेथें आले; आणि तिलोत्तमेची स्तुति करून 'तुझ्या तेजाची कोणीही बरोबरी करणार नाहीं, व तुला आकाशगमन करतां येईल' असा तिला त्यांनीं वर दिला; आणि इंद्राला त्रैलोक्याचें सुंदोपसुंदांनीं हरण केलेलें राज्य पुनः देऊन ब्रह्मदेव ब्रह्मलोकीं गेले. ( आदि० अ० २१४ )

---

## श्वेतकिराजा व अग्निजाड्य.






चीन काळीं प्रख्यात असलेला श्वेतकिराजा मोठा बलाढ्य, पराक्रमी व विचारी होता. यज्ञयागांकडे त्याचें विशेष लक्ष असून पुढें पुढें तर यावांचून त्याचें दुसऱ्या कोणत्याच गोष्टीकडे लक्ष जाईनासें झालें. त्यामुळें त्याच्या ऋत्विजांचे डोळे धुरानें बिघडून जाऊन त्यांस अतिशय त्रास व कष्ट होऊं लागले; तरीही राजाचा यज्ञयागाचा हव्यास कमी होईना. पण यापुढें राजानें दक्षणा वगैरेंची कितीही लालूच दाखविली तरी कोणीही ब्राह्मण त्याचें यज्ञकर्म करण्यास येईना! नेहमींच यज्ञकर्मीत गढून गेलेल्या राजाचा यामुळें निरुपाय होऊन त्यास १०० वर्षेंपर्यंत यज्ञच करतां आले नाहींत. तेव्हां तो रागावून कैलासपर्वतावर जाऊन घोर तपश्चर्या करूं लागला. या तपानें संतुष्ट होऊन शंक-

रानीं त्यास वर देऊं केला. तेव्हां 'स्वतः शंकरानीं येऊन आपलें यज्ञकर्म करावें' असा त्यानें वर मागितला. परंतु ब्राह्मणावांचून दुसऱ्या कोणास यजनाचा अधिकार नसल्यामुळें शंकरानीं हें म्हणणें मान्य केलें नाहीं. पण 'ब्रह्मचर्यपालनपूर्वक एकसारखी बारा-वर्षेंपर्यंत अग्नींत वसोर्धारापात्रानें तुपाची धार चालू ठेवशील तर माझा अंश असलेले दुर्वासऋषि तुझें याजन करतील' असें त्यानीं राजास सांगितलें. शंकराच्या या आज्ञेप्रमाणें श्वेतकिराजानें दुर्वासांचे हातून यज्ञ केला व बारा वर्षें अग्नींत आज्य व इतर हव-नीय द्रव्यें यांची धारा एकसारखी घातली! त्यामुळें अग्नीस जाड्य होऊन त्याचे तोंडास अरुचि आली व तो अगदीं निस्तेज झाला; आणि त्याचें तेज लोपून तो पांढरा फटफटीत दिसूं लागला! पुढें तर रोग जडून त्यास वरचेवर ग्लानि येऊं लागली. त्यास या-पुढें कोणचेंही हविर्द्रव्य घेण्याची इच्छा होईना. ह्या रोगाचा परि-हार होण्यासाठीं अनेक प्राण्यांची चरबी खावयास पाहिजे, असें ब्रह्मदेवानीं सांगितल्यावरून अग्नि खांडववन जाळूं लागला, परंतु तेथें राहणाऱ्या हजारों माणसांनीं व लक्षावधि प्राण्यांनीं त्यास लव-करच विझवून टाकलें. याप्रमाणें सातदां खांडववन जाळण्याचा प्रयत्न अग्नीनें केला, पण सातही वेळां त्यास पूर्ण यश मुळींच आलें नाहीं. ( आदि० अ० २२३ )

---

# शार्ङ्गक–उपाख्यान.





दपाल नांवाचा एक मोठा तपस्वी, विद्वान् व नैष्ठिक ब्रह्मचारी असा महर्षि होता. वेदाध्ययन व तप पूर्ण केल्यानंतर त्यानें आपला देह टाकला. त्याच्या सत्कर्माप्रमाणें त्यास **पितृलोक** प्राप्त झाला खरा; पण तेथें तपाचें फळ मात्र त्यास मिळालें नाहीं. ' माझ्या तपश्चर्येनें **पितृलोक** प्राप्त होऊनही न झाल्यासारखा कां झाला ' असा त्यानें **यमधर्मास** व इतर देवांस प्रश्न केला; तेव्हां त्यास असें कळलें कीं, ' **प्रत्येक मनुष्य जन्मतः तीन प्रकारें ऋणी असतो.** ऋषिऋण, देवऋण व पितृऋण हीं तीं तीन ऋणें असून त्यांची फेड त्यास अनुक्रमें वेदाध्ययन, यज्ञयाग व पुत्रोत्पत्ति यांनीं करावी लागते. आपण तपाचरण व यज्ञयाग केले, परंतु आपणांस पुत्रोत्पत्ति नसल्यामुळें तिसरे ऋणांतून आपण अद्याप मुक्त झालेलों नाहीं; व यासाठीं **पितृलोकाचें** खरें फळ आपणास मिळालें नाहीं; ' असें **मंदपालऋषीस** समजलें. त्वरित व पुष्कळ पुत्र व्हावेत म्हणून शार्ङ्गक पक्ष्यांच्या जरितानामक मादीशीं त्यानें शार्ङ्गक पक्ष्याचा देह धारण करून समागम केला; त्यापासून तिला चार अंडीं झालीं. या चार अंड्यांत चार तेजस्वी पुत्र आहेत, असें जाणून **मंदपाल** तिला वनांतच सोडून देऊन **लपितानामक** दुसऱ्या पक्षिणीसह हिंडू लागला. योग्य कालीं तिला चार पुत्र झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं **अर्जुनानें** परवानगी दिल्यावरून **अग्नि खांडववन** जाळूं लागला.

या अग्निप्रळयांत आपली भार्या जरिता व चार पुत्र मरतील, असें जाणून मंदपालानें अग्नीची भक्तिपूर्वक स्तुति केली. तीमुळें प्रसन्न होऊन, 'वन जाळीत असतां तुझ्या पुत्रांचे जीवास धक्का लावणार नाहीं.' असा अग्नीनें त्यास वर दिला. ( आदि० अ० २३१ )

इकडे अग्नि सर्व वनाची राखरांगोळी करीत खांडववनांत पसरूं लागला असतां वृद्ध जरितेची तारांबळ उडाली; पुत्रांचे प्राण कसे रक्षण करावे हें तिला सुचेना. 'चार पुत्र केवळ मांसाचे गोळे असून त्यांस पंखही फुटलेले नाहींत किंवा पायही आलेले नाहींत! अशा स्थितींत तीं चार पिलें आपल्यामागून कशीं येणार? चारींना एकदम घेऊन जाण्याचें तरी आपल्यास सामर्थ्य कोठें आहे? कांहींना टाकावें व कांहींना वांचवावें हें तरी कसें करावें? जरितारी हा ज्येष्ठ पुत्र असल्यामुळें कुळ व वंश यांचें अस्तित्व त्याजवर अवलंबून आहे; सरीसृक्क हा गृहस्थाश्रम स्वीकारून पितृ-ऋण फेडणार आहे. स्तंबमित्र हा महातपस्वी होणार आहे व द्रोण हा मोठा ब्रह्मज्ञानी निपजणार आहे, एवढेंच सांगून आपला निष्ठुर पति आपणास टाकून निघून गेला आहे. तेव्हां आतां काय करावें, व या पिलांचे प्राण कसे वांचवावे!' अशी चिंता व शोक करीत जरिता बसली. तेव्हां तिचे पुत्र तिला म्हणूं लागले:—'माते, या वेळीं तूं आमच्या प्रेमांत गुंतून येथें राहूं नको; कारण असल्या प्रेमानें आपल्या सर्वांचा नाश होऊन पित्याची पितृलोकप्राप्तीची इच्छाही निष्फळ होईल. अग्नि नसेल अशा स्थळीं तूं त्वरित जा. तूं जगलीस तर तुला आणखी पुत्र होऊन तुझे व पित्याचे मनोरथ पूर्ण होतील. पण आमच्या प्रेमानें जर तूं येथेंच राहशील तर तुझा व आम्हां सर्वांचाच नाश होईल.

यासाठीं तूं त्वरित निघून जा. ' चारी पुत्रांनीं याप्रमाणें सांगितलें तरी जरितेला त्यांना तेथें आगींत सोडून जाववेना. **मृत्युलोकांतील एखाद्या प्रेमास जर दिव्य व पवित्र हें नांव देणें असेल तर तें एका मातेच्याच प्रेमास देतां येईल; कारण हें प्रेम स्वसुखाची किंवा प्राणाचीही परवा न करणारें व म्हणूनच पूर्ण निरपेक्ष असतें.** इतक्यांत जरितेस दुसरीच युक्ति सुचली. ' जवळच्याच एका वृक्षाचे बुंध्यापाशीं उंदराचें बिळ होतें; त्यांत शिरून चारी पुत्रांनीं वसावें, व जरितेनें त्वरित बिळाचे तोंडावर माती घालून दूर उडून जावें; आणि वणवा शांत झाल्यावर पुनः परत येऊन बिळावरील माती काढून टाकून पिलांस वर काढावें' अशी ही युक्ति होती. पण ती मंदपालाच्या मानी पुत्रांस पसंत पडली नाहीं. ' बिळांत शिरलें तरी प्राण वाचण्याचा संभव नाहीं. अग्नींतून बचावल्यास आम्हां चार पिलांचे चार घास बिळांतील उंदीर करून टाकील. **मरण येणें हें जर निश्चितच असेल तर तें मरण चांगलें यावें, येवढा तरी उद्योग प्राण्यानें करावा.** मांसभक्षक उंदराचे भक्ष्यस्थानीं पडण्यापेक्षां अग्नीमध्यें जळून येणारें मरण अधिक पवित्र व श्रेयस्कर होय. ' असा चारी पुत्रांनीं आपला निर्धार जरितेस कळविला. ( आदि०अ० २३२ )

तेव्हां जरिता म्हणाली:—' आपला शत्रु असलेला मोठा उंदीर या बिळांत राहत असे, पण एकेसमयीं तो बाहेर आला असतां एका प्रचंड श्येन पक्ष्यानें त्यास आपल्या गवींत धरून दूर नेलें व मीही त्याचे पाठोपाठ उडालें; कांहीं वेळानें त्यानें जमिनीवर उतरून त्यास भक्षण केलें. हें मीं स्वतः डोळ्यांनीं पाहिलें आहे. तुम्ही बिनदिक्कत व निर्भयपणें या बिळांत शिरा. '

जरितेनें याप्रमाणें अनेक प्रकारें आपल्या पिलांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला; पण त्यांचा निश्चय ढळला नाहीं. ते म्हणाले:—‘ बिळांतील उंदरास श्येन पक्ष्यानें नेलेलें आम्हीं कांहीं पाहिलेलें नाहीं. शिवाय बिळांत आणखीही उंदीर असण्याचा पुष्कळ संभव आहे. वणवा कदाचित् विझेल, वाऱ्याची दिशा बदलेल किंवा तो अजीबात थांबेल; तेव्हां कदाचित् वणव्यामुळें आम्ही मरणारही नाहीं. तुझ्या सांगण्यावरून बिळांत शिरलों तर मात्र आम्ही खास मरूं. निःसंशय मृत्यु येणाऱ्या गोष्टीपेक्षां मृत्यु येण्याचा केवळ संभव असलेली गोष्ट अधिक बरी. ’ आपलीं चारी पिलें आपला निश्चय सोडीत नाहींत असें पाहून जरिता निरुपायानें पिलांस तेथेंच टाकून वणवा नव्हता अशा सुरक्षित स्थळीं उडून गेली. व थोड्याच वेळानें खांडव वन जाळीत जाळीत अग्निही या पिलांचे बाजूकडे वेगानें येऊं लागला. ( आ० अ० २३२ )

हें पाहून त्या सर्वांची प्रथम गाळणच उडाली; ‘ काय करावें, कोठें जावें ’ हें कोणासच कळेना. अखेर त्यांनीं, निरनिराळ्या स्वरूपांनीं सकल जग व्यापून राहिलेल्या अग्नीची करुणा भाकली. ‘ आमचा पिता आम्हांस माहीत नाहीं; आमची आई निघून गेली आहे. आम्हांस अद्याप पंखही फुटलेले नाहींत. अशा दीनवाण्या-स्थितींत आम्हां पिलांस तुजवांचून कोणाचाच आधार नाहीं व दुसरा कोणी त्राताही नाहीं.’ अशा प्रकारें विनवणी करून मंदपालाच्या चारी पुत्रांनीं आपापल्यापरी अग्नीची स्तुति केली. तीमुळें—विशेषतः द्रोणाच्या स्तुतीनें—प्रसन्न होऊन अग्नीनें त्यांस दर्शन दिलें. नंतर अग्नि त्यांस म्हणाला:—‘मंदपालानें पूर्वींच मला प्रसन्न करून घेतलें असून, तुमचे जीव बचावण्याचें वचनही मीं

त्यास मार्गेंच दिलें आहें, तरी निर्भय असावें. द्रोणाचे स्तुतीनें मी संतुष्ट झालों आहें, त्यानें वाटेल तो वर मागावा.' यावर द्रोण बोलला:—'हीं रानमांजरें आमचे शत्रु असून आम्हांस नेहमीं त्रास देतात; यासाठीं यांचे सर्व कुलाचा संहार करा.' द्रोणानें मागितलेल्या या वराप्रमाणें अग्नीनें या चार शार्ङ्गक पक्ष्यांस वगळून सर्व खांडववन दग्ध केलें. (आदि० अ० २३४)

पुत्रांचें संरक्षण करण्याचें वचन अग्नीनें दिलें होतें, तरीही वणवा वाढत चाललेला पाहून मंदपालास चिंता उत्पन्न झाली. '**अतिस्नेहः पापशंकी**' म्हणतात तें कांहीं खोटें नव्हे. 'माझी बिचारी वृद्ध भार्या जरिता व तिचे चार लहान पुत्र यांची वाऱ्याचे योगानें वाढणाऱ्या या वणव्यांत काय अवस्था झाली असेल कळत नाहीं' असें लपितेपाशीं बोलून मंदपाल शोक करूं लागला. तेव्हां त्याचें समाधान करण्याचें सोडून ती **सवतीमत्सरानें ग्रासून गेल्यामुळें** त्यास म्हणाली:—'माझे पुत्र तेजस्वी व बलवान् आहेत, त्यांस अग्नीपासून भय नाहीं; असें तुम्हीं इतर ऋषींपाशीं बोलतांना मीं ऐकिलें आहे. शिवाय अग्नीनंहीं माझ्यासमक्ष तुम्हांस वचन दिलें आहे, तें तो कदापि मोडणार नाहीं. खरें म्हटलें तर तुम्हांला पुत्रांबद्दल काळजी मुळींच वाटत नसून तुमचा हा सर्व शोक माझी सवत जी जरिता तिजबद्दलच आहे. पूर्वीं तिच्यावर तुमचें प्रेम होतें तसें कांहीं मजवर नाहीं. तुम्ही आपले जरितेकडेच जा; मी आपली दुष्ट पुरुषाच्या बायकोप्रमाणें एकटीच राहतें कशी!' यावर मंदपालानें उत्तर केलें:—'तूं म्हणतेस त्या हेतूनें मी मुळींच शोक करीत नाहीं. अपत्यप्राप्तीसाठींच मीं तुम्हांशीं विवाह केला; आणि हीं अपत्यें सांप्रत संक-

टांत पडलीं असल्यामुळें मला काळजी लागली आहे. झालेल्या पुत्रांचा त्याग करून पोटीं होणाऱ्या संततीच्या आशेवर जर मी बसलों तर मजसारखा मूर्ख कोणीच नाहीं. तुझ्या मर्जीस येईल तें करण्याची तुला मुभा आहे.'

इकडे वणवा शांत झाल्यानंतर जरिता आपल्या पुत्रांकडे धांवत आली. अग्नीच्या भडक्यांतून वांचलेल्या व आईसाठीं ओरडणाऱ्या पिलांस पाहून जरितेला व तिला पाहून पिलांस दुःखमिश्रित आनंदाश्रु लोटले! इतक्यांत मंदपालही तेथें आला. जरिता व चार पिलें यांची ही अवस्था पाहून मंदपालही अश्रु ढाळून शोक करूं लागला. पण त्यांपैकीं कोणीही मंदपालाशीं बरावाईट एकही शब्द बोलेना. 'या पुत्रांपैकीं वडील कोणता, दुसरा कोणता, तिसरा कोणता व सर्वांत धाकटा कोणता,' इ० प्रश्न तो जरितेस विचारूं लागला. तेव्हां तिला सर्व त्रिभुवन आठवलें; आणि ती दुःखानें व रागानें त्यास म्हणाली:—'माझ्यासारख्या दीन व अनाथ भार्येचा चार लहान पिलांसह निष्ठुरपणानें त्याग करून तुम्ही गेलांत आतां तुम्हांला वडील पुत्र कोण, मधला कोण व धाकटा कोण ही चौकशी कशाला हवी? तुम्ही आपले तरुण व हास्य-मुखी लपितेकडेच जा कसे!' जरितेचें हें भाषण ऐकून मंद-पाल म्हणाला:—

**न स्त्रीणां विद्यते किंचिदमुत्र पुरुषांतरात्।**
**सापत्नकमृते लोके नान्यदर्थविनाशनम्॥**
**वैराग्निदीपनं चैव भृशमुद्वेगकारि च।**

**व्यभिचार व सवतीमत्सर यांखेरीज स्त्रियांचा वैराग्नि वाढविणारी व त्यांस सदैव उद्वेगांत ठेवणारी अशी दुसरी**

**कोणतीही गोष्ट नाहीं. साध्वी व पतिव्रता स्त्रियांसही या सवतीमत्सरानें सोडलेलें नाहीं.** अरुंधति ही जगद्विख्यात पतिव्रता होती, व वसिष्ठही सप्तर्षींमध्यें श्रेष्ठ, शुद्ध व एकपत्नीव्रताचे असे होते. तरीही तिला त्यांच्या सदाचरणाबद्दल संशय आला. व त्यामुळेंच तिचें रूप धुरासारखें पांढुरकें व कांहींसें तांबूस होऊन ती अगदीं सूक्ष्म दिसते न दिसते अशी झाली ! तर अशा मत्सरास मनांत थारा देऊं नका. तुमचें प्राणसंरक्षण करण्याचें अग्नीनें दिलेलें वचन, तुमच्या मातेची मर्मज्ञता आणि तुमच्या स्वतःचें सामर्थ्य व तेज, हीं सर्व माहीत असल्यामुळेंच मी बेफिकीर होतों; व म्हणून मी आधीं तुमचेकडे आलों नाहीं. तुम्ही याचा मुळींच विषाद मानूं नये.' याप्रमाणें संभाषण झाल्यावर ते चार पुत्र व जरिता हीं मंदपालापाशीं आनंदानें राहूं लागलीं; मंदपालही त्यांस बरोबर घेऊन अन्य देशीं गेला. ( आदि० अ० २३५ )

---

# नीलराजा व अग्नि.





माहिष्मतीच्या नीलराजास एक अत्यंत लावण्यवती कन्या होती. राजा जेव्हां जेव्हां यज्ञशाळेंत जाई, तेव्हां तेव्हां तेथें त्याजबरोबर जाऊन ही कन्या तोंडानें फुंकर घालून आपल्या पित्यास यज्ञकुंडांतील अग्नि प्रज्वलित करून देई. राजकन्येच्या मनोहर मुखांतून व सुंदर ओठांवरून आलेला सुगंधयुक्त वारा घेण्याची अग्नीस इतकी चटक लागली कीं, ती यज्ञशाळेंत आली नाहीं, तर पंखा किंवा इतर कोणत्याही साधनांचा कितीही उपयोग केला तरी तो पेटत नसे ! यामुळें यज्ञशाळेंत जातांना प्रत्येक वेळीं राजास राजकन्या बरोबर घेणें भागच पडूं लागलें ! याप्रमाणें अग्नीचें प्रेम राजकन्येवर बसून तें वाढत गेल्यावर एके दिवशीं अग्नीनें ब्राह्मणरूपानें तिजकडे येऊन तिला आपलें मनोगत कळविलें; तीही त्याचे इच्छेप्रमाणें वागण्यास कबूल झाली. हा ब्राह्मणरूपी अग्नि व नीलराजाची कन्या यांचे हे गुप्त विलास बरेच दिवसांनीं राजास कळून आले; तेव्हां त्यानें त्या ब्राह्मणास यथाशास्त्र शासन केलें. परंतु त्यामुळें अग्नि जास्तच क्रुद्ध होऊन अतिशय भडकून गेला ! तेव्हां नीलराजानें त्यास शरण जाऊन आपली राजकन्या ब्राह्मणरूपी अग्नीस देण्याच कबूल केलें. अग्नीनेंही, ‘ माहिष्मती नगरींत जोंपर्यंत नीलवंश कायम आहे तोंपर्यंत तेथील राजांचें सैन्य निर्भय राखून परशत्रूंचें सैन्य नगरावर आलें कीं तें मी जाळून टाकीन,’ असा नीलराजास वर दिला. ( सभापर्व अ० ३१ )

---

# शाल्व-वध.





र्म राजानें केलेल्या राजसूययज्ञाचे वेळीं श्रीकृष्णानीं शिशुपालाचा वध केल्याचें ऐकून त्याचा वडील भाऊ मार्तिकावत देशाचा शाल्व राजा यास फार संताप आला. आपला धाकटा भाऊ व राजा शिशुपाल यास बेसावध असतां व युद्ध चालू नसतांना कृष्णानीं अचानक मारलें हें कृष्णाचें कृत्य पापाचें व विश्वासघाताचें झालें, असें शाल्वाचे मनानें पक्कें घेतलें; व याच रागांत, श्रौतश्रवास मारल्याचें वृत्त कळल्यामुळें तर जास्तच भर पडून तो प्रचंड व प्रबळ सैन्य घेऊन द्वारकेवर चालून आला. आहुकराजानें व द्वारकावासी यादवांनीं श्रीकृष्ण हस्तिनापुरास नसतांही त्याचे अपरोक्ष शाल्वराजाशीं लढण्याची जय्यत तयारी केली. नट, नर्तक, गवई वगैरे सर्वांस शहराबाहेर घालवून दिलें; खुणेची मुद्रा दाखविल्यावांचून नगराबाहेर कोणास जाऊं द्यावयाचें नाहीं व कोणास आंत येऊं द्यावयाचें नाहीं, असा अंमल सुरू झाला. नगरांत कोणीही दारू पिऊं नये, अशी दंवडी पिटविण्यांत आली. खंदकांत कांटे व खिळे रोंवण्यांत आले; सर्व रस्ते रोंखून शहराबाहेरच्या एक कोसाच्या टापूंतले तलाव व विहिरी यांतही असेच शूल रोंवले; नगराबाहेरची कोसभर जमीन खणून दुर्गम करून ठेविली; स्वभावतःच दुर्गम असलेलीं स्थानें हीं सैन्य ठेवून अधिक मजबूत करण्यांत आली. नगरांतले सर्व रस्ते व चौक यांतही यादव

सेना तळ देऊन राहिली. शाल्वाचे सैन्यानेंही नगराबाहेरचे सर्व मार्ग रोधून टाकले. खुद्द शाल्वराजा सौभ विमानांत बसून युद्धास आला होता. त्याशीं लढण्यासाठीं आरंभीं श्रीकृष्णाचा पुत्र सांब हा सैन्यासह नगराबाहेर आला. त्यानें शाल्वाचा सेनापति क्षेमवृद्धि यास बाणांनीं जर्जर करून पळवून लावलें. त्याचे मागून वेगवान् नांवाचा दानव त्याजवर चाल करून आला, त्यासही सांबानें गदेच्या प्रहारानें ठार केलें. दुसरीकडे श्रीकृष्णांचा दुसरा पुत्र चारुदेष्ण व विविंध्य दानव यांचें तुंबल युद्ध चालू होतें. अखेर त्यांत चारुदेष्णाचे अभिमंत्रित बाणानें गतप्राण होऊन विविंध्य भूमीवर पडला. तीन वीरांचा याप्रमाणें पराभव झालेला पाहून खुद्द शाल्वराजाच सौभाविमानासह नगरावर चाल करून आला. त्यास पाहून यादवसैन्य भयभीत होऊन कचरूं लागलें; परंतु प्रद्युम्नानें त्यास धीर देऊन त्यांच्यामध्यें वीरश्री उत्पन्न केली. मकरध्वजयुक्त अशा आपल्या सुवर्णरथांत बसून प्रद्युम्न शाल्वसेनेवर चाल करून गेला. शाल्वही आपल्या विमानांतून उतरून रथांत बसून त्याशीं युद्ध करूं लागला. बराच वेळ युद्ध झाल्यावर दोघेही वीर एकमेकांच्या बाणांनीं मर्मस्थानीं घायाळ होऊन रथांत मूर्च्छित होऊन पडले. दानवांच्या विस्तीर्ण सैन्यांत एकटा प्रद्युम्न मूर्च्छित होऊन पडल्याचें पाहून त्याचा सारथि जो दारुकपुत्र त्यानें रथ युद्धांतून काढून दूर नेला. सावध झाल्यावर सारथ्याचें हें कृत्य प्रद्युम्नाचे लक्षांत आलें. तो त्यास रागानें म्हणाला:—

‘ यादवकुळांतला वीर रणांतून कधींही परत फिरत नाहीं, हें तुला माहीत नाहीं काय ? माझ्यावर भार टाकून हस्तिनापुरास गेलेले श्रीकृष्ण किंवा बलराम मला काय म्हणतील याचा विचार

हे सर्व पुत्र पाठविले. त्यांनीं पुष्कळ प्रयत्न करून सर्व देश, नद्या, वनें, अरण्यें मुंडाळलीं; परंतु तो अश्व किंवा त्यास नेणारा वीर यांचा त्यांस मुळींच सुगावा लागेना. तेव्हां ते निराश होऊन पुनः पित्याकडे आले. **आपल्या संख्येची व बाहुबलाची नेहमीं प्रौढी मारणारे हे पुत्र फजित होऊन घोडा न सापडतांच परत आलेले पाहून व आपला अश्वमेध अपूर्णच राहणार हें मनांत येऊन सगरास फार राग आला.** " जा. निघा जा. घोडा घेतल्याखेरीज परत येऊं नका; ' अनागमाय गच्छध्वं ' जा निघा, मला पुनः तोंड दाखवूं नका. " याप्रमाणें सगर संतापाचे आवेशांत बोलला. पण हें त्याचें बोलणें शापवाणीसारखें होऊन खरोखरच ते पुनः पित्यास तोंड दाखविण्यास परत आले नाहींत ! जेथें घोडा गुप्त झाला होता तेथील निर्जल समुद्राची जागा खणण्यास त्यांनीं आरंभ केला. याप्रमाणें पुष्कळ दिवस प्रयत्न केल्यानंतर समुद्राचे ईशान्य दिशेस मोठें विवर पाडून ते पातळांत गेले असतां तेथें यज्ञिय अश्व त्यांस दिसला; अश्वाचे जवळच अत्यंत तेजस्वी असे कपिलमहामुनिही होते. अश्व दिसतांच **अतिशय हर्षभरित होऊन व आपल्या बळाचे उन्मत्तपणांतच कपिलांस यःकश्चित् समजून त्यांजकडे न पाहतां** ते घोडा घेऊन जाऊं लागले. पण कपिलांनीं वक्र दृष्टीचा एकच कटाक्ष त्यांजकडे फेंकतांच ते सर्व भस्म होऊन तेथें पडले ! **नारदानीं** ही भयंकर वार्ता सगरास सांगितली; तेव्हां अतिशय दुःख होऊन श्रीशंकरांच्या वरप्रदानाच्या वेळच्या भाषणाचें त्यास स्मरण झालें.

सगराचे साठ हजार पुत्र याप्रमाणें आपल्याच उन्मत्तपणामुळें एकाएकीं नष्ट होऊन त्यांचें आयुष्य निष्फळ होऊन गेलें. दुसऱ्या राणीचा पुत्र असमंज हाही दुसऱ्या एका प्रकारानें आपल्या मातापितरांचे दुःखास कारणीभूत झाला. हा असमंज राजपुत्र अत्यंत क्रूर व दुष्ट होता. राजधानींतल्या लोकांच्या मुलांचे गळे आवळून धरून हा त्यांस नदीमध्यें फेंकून देत असे! नागरिकांनीं राजपुत्राचा हा प्राणघातकी भ्रात्यपणा बरेच दिवस सहन केला; पण तो असह्य होतांच त्यांजबद्दल सगराकडे तक्रार केली. तेव्हां सगरराजास क्षणभर वाईट वाटून तो स्तब्ध झाला. अखेर बराच विचार करून, त्यानें आपला राजधर्म व पौरांचें हित यांचें संरक्षण करण्याकरतां राजपुत्रास हद्दपार करण्याची मंत्र्यास आज्ञा केली; व ती त्यानें तावडतोब अमलांतही आणली! 'भांगेंत तुळस' या न्यायानें या असमंजास अंशुमाननामक पुत्र होता, तो मात्र अत्यंत दयाळू, उदार व विनयशील असा होता. त्यास बोलावून आणून सगरानें त्यास सर्व वृत्त निवेदन केलें; आणि नष्ट झालेला अश्व पुनः परत घेऊन येण्याची व यज्ञांतील विघ्न दूर करून तो पुरा करण्याची त्यांस आज्ञा केली. त्याप्रमाणें अंशुमानानें आपल्या चुलत्यांच्याच मार्गानें जाऊन कपिलमुनींचें दर्शन घेतलें; व त्यास पूज्यभावपूर्वक नमस्कार करून आपल्या येण्याचा हेतु त्यांस कळविला. अंशुमानाचा हा विनय पाहून कपिलमुनि प्रसन्न झाले. तेव्हां अंशुमानानें त्यांस असे वर मागितले कीं, 'यज्ञाचा अश्व माझा मला द्यावा, व आपल्या कोपामुळें भस्म झालेले माझ्या चुलत्यांचे देह पुनीत व्हावेत.' कपिल मुनींनीं घोडा त्याचे स्वाधीन केला; आणि सांगितलें कीं, 'साठ हजार सगरपुत्रांचे

देह इतक्यांतच पवित्र होणार नाहींत; तुझा नातू स्वर्गांतून गंगा खालीं मृत्युलोकीं आणील; व तिच्या उदकानें त्यांचे भस्मीभूत देह पुनीत होतील.' हें ऐकून कपिलमुनींचा निरोप घेऊन अश्वासह अंशुमान परत राजधानीस आला. त्यास पाहून सगरास अतिशय आनंद होऊन त्यानें यज्ञ पूर्ण केला; व तेव्हांपासून तो समुद्रास--सागरास--आपला एक पुत्र असें मानूं लागला! **साठ हजार उन्मत्त पुत्रांच्या पराक्रमानें जें घडून आलें नाहीं तें एकाच्या विनयामुळें घडून आलें.** असो; कांहीं कालानें अंशुमानास राज्यावर बसवून सगर तपोवनांत निघून गेला. अंशुमानानेंही बहुत वर्षें राज्य केलें; व अखेर आपला पुत्र दिलीप यास सिंहासनावर बसवून तो वनांत गेला. दिलीपानें गंगा मृत्युलोकीं आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण त्यांत त्यास यश आलें नाहीं. दिलीप तपश्चर्यार्थ वनांत गेल्यानंतर त्याचा पुत्र भगीरथ इक्ष्वाकूंचें राज्य चालवूं लागला. हा अत्यंत सत्यनिष्ठ, निर्मत्सर, शूर व सर्व प्रजाजनांस आनंद देणारा असा चक्रवर्ति झाला. आपल्या पूर्वजांची सर्व हकीकत त्याला समजली, तेव्हां त्यास फार दुःख झालें. **पूर्वजांनीं केलेला संकल्प सिद्धीस नेऊन त्यांनीं आरंभिलेलें कार्य शेवटास नेणें व त्यांस परलोकीं समाधानाचा लाभ करून देणें, हेंच राजांचें कर्तव्य होय;** हें तत्त्व लक्षांत घेऊन सचिवांवर राज्यकारभार सोंपवून भगीरथ हिमालयपर्वतावर जाऊन गंगावतरणार्थ तपश्चर्या करूं लागला. याप्रमाणें १ हजार वर्षें घोर तप केल्यानंतर, मूर्तिमंत गंगेनें त्यास दर्शन दिलें. 'मृत्युलोकीं येऊन माझ्या ६० हजार पूर्वजांची रक्षा आपल्या पवित्र उदकानें भिजवून त्यांस स्वर्गप्राप्ति करून दे.'

असा भगीरथानें वर मागितला. गंगानदीनें तें म्हणणें मान्य केलें; परंतु ' गगनांतून भूमीवर वेगानें मी पडूं लागलें असतां माझ्या ओघाचा दुर्धर वेग सहन करण्याचें सामर्थ्य श्रीशंकरांवांचून कोणासच नाहीं; याकरतां त्यांस प्रसन्न करून या कार्यास अनुकूल करून घे ' असें तिनें सांगितलें. त्याप्रमाणें भगीरथानें कैलास पर्वतावर जाऊन पुनः घोर तप केलें; व शंकरांची कृपा संपादन करून त्यांची या कार्यास अनुकूलता मिळविली. हिमालयावर येऊन श्रीशंकर उभे राहिले व भगीरथानें गंगेचें स्मरण केलें. तेव्हां आकाशाचा जणू कमरपट्टा, अशी शोभणारी गंगा तेथून भूतलावर येण्यासाठीं श्रीशंकरांचे मस्तकावर अत्यंत जोरानें पडूं लागली; पण ती त्यांनीं एकाद्या मौक्तिक-मालेप्रमाणें लीलेनें आपल्या ललाटावर धारण केली ! भूतलावर येतांच भगीरथानें वाट दाखविली त्या मार्गानें ती त्याच्या मागोमाग समुद्रापर्यंत गेली. व तेथें तिनें साठ हजार सगर-पुत्रांची रक्षा पुनीत करून त्यांस स्वर्गास नेलें; आणि अगस्त्यऋषींनीं शुष्क केलेला समुद्रही पुनः जलपूर्ण करून टाकला ! **प्रत्यक्ष गंगेला स्वर्गातून भूतलावर आणून शुष्क समुद्र पुनः पाण्यानें भरून टाकण्यासारखें महत्कार्य पिढ्यानपिढ्या अत्यंत परिश्रम व ' भगीरथ ' प्रयत्न केल्याखेरीज साध्य होत नाहीं,** हें तत्त्व सगरापासून भगीरथापर्यंतच्या राजांचें चरित्र उत्कृष्ट रीतीनें शिकवितें. ( वन० अ० १०६-१०९ )

---

## ऋष्यशृंग व लोमपाद.



श्यप कुलामध्यें विभांडक नांवाचे एक महातपस्वी, वेद-वेत्ते, तेजस्वी, सदाचारसंपन्न व ब्रह्मचारी असे ऋषि होते. कौशिकीनदीच्या एका महाऱ्हदा-( मोठ्या डोहा-) संन्निध त्यांचा आश्रम असून तेथें ते तपश्चर्या करीत असत. एके दिवशीं या डोहांत स्नान करीत असतां उर्वशी अप्सरा त्यांचे दृष्टीस पडली; त्यामुळें त्यांचें वीर्य पाण्यांत स्खलन झालें व तें अमोघवीर्ययुक्त पाणी एक हरिणी प्याली ! त्यामुळें तिला गर्भ राहून पुढें तिला एक मनुष्यरूपी पण डोक्यावर शिंग असलेला पुत्र झाला. त्याचें ऋष्यशृंग असें नांव ठेवून विभांडकानीं त्यास आपल्या आश्रमांत आणलें, व त्याचें पुत्रवत् पालन केलें. सदरहू हरिणी ही पूर्वजन्मीं देवकन्या असून तिला ब्रह्मदेवाचे शापानें हरिणीचा जन्म प्राप्त झाला होता; त्या शापाप्रमाणें हा मुनिपुत्र होतांच ती शापमुक्त होऊन स्वर्गीं गेली. ऋष्यशृंग हा निर्जन स्थलांतील आपल्या बापाच्या आश्रमांत राहून तपश्चर्या करीत असे. त्यास बरींच वर्षेंपर्यंत स्त्रियांचें दर्शनही झालेलें नव्हतें; येवढेंच नव्हे तर त्यास आपल्या पित्यावांचून अन्य मनुष्य प्राणीही दृष्टीस पडलेला नव्हता. ह्या विभांडकमुनीचे नेत्र सिंहासारखे पिंगट असून त्यांचे सर्व अंगावर लांबलांब केश होते ! अशा स्थितींत ऋष्यशृंगाचें मन तारुण्यांतही लहान बालकासारखें निर्मळ राहिलें यांत नवल नाहीं.

दशरथ राजाचा मित्र लोमपाद हा अंगदेशामध्यें चंपानगरींत राज्य करीत होता. तो एकदां ब्राह्मणांपाशीं जाणूनबुजून खोटें बोलला होता; व राजाच्या या असत्य भाषणाकरतां सर्व सत्यनिष्ठ ब्राह्मण त्याचा त्याग करून दुसरीकडे जाऊन राहिले होते. पुढें राजाच्या पुरोहिताचे हातून सहजगत्या कांहीं अनाचार घडला. अशा अनेक पातकांचा घडा भरून अंगदेशांत अनावृष्टि होऊन मोठा दुष्काळ पडला. पाऊस पडून पुनः राज्यांत सुबत्ता कशी होईल याची, मंत्री व अमात्य यांसह ज्ञानी व तपस्वी ब्राह्मणांकडे जाऊन तो विचारपूस करूं लागला. एका मुनिश्रेष्ठाचे सांगण्यावरून त्यानें असत्य-भाषणाबद्दल प्रायश्चित्त घेतलें; व पर्जन्य पाडण्यासाठीं अति सरळ मनाच्या, स्त्रियांची बिलकूल ओळखही नसलेल्या व वनवासी ऋष्यशृंगास आपल्या देशांत आणविण्याच्याही उद्योगास तो लागला. त्यानें चंपानगरींतल्या सर्व सुंदर, चतुर व तरुण वेश्या आणविल्या; आणि 'ऋष्यशृंगाचे मनांत लोभ उत्पन्न करून, विश्वास दाखवून, किंवा अन्य कोणत्याही उपायानें त्यास माझे राजधानींत आणा' अशी त्यानें त्यांस आज्ञा केली. पण 'हें बिकट काम करण्याचें नाकारावें तर राजा शासन करणार; करावयास जावें तर ऋष्यशृंगाचे शापानें भस्म होऊन जाण्याची कदाचित् पाळी येणार' अशा पेचांत सांपडल्यामुळें त्या वेश्या कांहींच न बोलतां भिऊन स्वस्थ बसल्या. पण अखेर त्यांचेपैकीं एका वृद्ध वेश्येनें हें कार्य आपल्या तरुण मुलीकडून करविण्याचें पत्करलें; व राजानेंही त्यासाठीं तिला जी जी सामुग्री लागेल ती ती पुरविण्याची आपल्या अधिकाऱ्यांस आज्ञा केली. ( वनपर्व, अ० ११० )

नंतर कांहीं दिवसांनीं त्या वृद्ध वेश्येनें एक मोठी नांव तयार केली; व तीवर अनेक पुष्पफलयुक्त वेली व झाडें लावून आश्चर्यकारक, रमणीय व मनोहर असा एक कृत्रिम आश्रमच तयार केला. आणि या नावेंत बसून ती वृद्ध वेश्या मुलीसह नदींतून विभांडकांचे आश्रमाकडे आली. तिनें आधीं गुप्त हेर पाठवून आश्रमांतील खबर आणविली; आणि ऋष्यशृंगाशीं कसें बोलावयाचें व त्याशीं कसें वागावयाचें, हें तिनें आपल्या मुलीस शिकविलें. याप्रमाणें बेत केल्यावर, विभांडकमुनि फळें आणण्यास वनांत गेल्याची संधि साधून ती तरुण वेश्या ऋष्यशृंग तपश्चर्या करीत होता तेथें गेली; आणि पुरुषाप्रमाणें त्याशीं बोलावयास लागून तिनें तेथील तपस्व्यांचें त्यास कुशलवृत्त पुशिलें. आपल्या पित्यावांचून अन्य मनुष्यप्राणी ऋष्यशृंगानें हा पहिलाच पाहिला; तशांत तर ती अशा प्रकारची स्त्री असल्यामुळें त्यास अतिशयच आश्चर्य वाटलें. तिचें तें तारुण्य, रूप व तेज पाहून ऋष्यशृंग भांबावून गेला, तरी हे कोणी आपणासारखेच तपस्वी असावेत असें वाटून तो तिचा अतिथि या नात्यानें सत्कार करूं लागला. आपला आश्रम कोठें आहे, असें विचारून त्यानें तिला वर कृष्णाजिन घातलेलें दर्भासन बसावयास दिलें; व तिजपुढें पाय धुवावयाचें पाणी आणि बिब्या, आंवळे, पिंपळाचीं फळें वगैरे वन्य फळें-मुळें आणून ठेवून तो तिला नमस्कार करूं लागला! पण त्याचें निवारण करून वेश्या त्यास म्हणाली:—‘ हा तीन योजनें अंतरावर जो पर्वत दिसत आहे, त्यापलीकडे माझा आश्रम असून दुसऱ्यानें दिलेल फळें-मुळें किंवा पाद्योदक घ्यावयाचें नाहीं, दुसऱ्याचा नमस्कार घ्यावयाचा नाहीं, येवढेंच नव्हे तर दुसऱ्यासच फळें वगैरे अर्पण करून नम-

स्कार करावयाचा व त्यास आलिंगन द्यावयाचें, असें माझें तपोव्रत आहे.' असें बोलून त्या वेश्येनें ऋष्यशृंगास सुंदर, रसभरित व रुचिकर फळें, अनेक रंगांचीं उत्तम व तेजदार वस्त्रें, सुगंधित पुष्पमाला आणि अनेक भक्ष्यपदार्थ व पेयें अर्पण केलीं; व ऋष्यशृंगानेंही कौतुकयुक्त व बालिश जिज्ञासेनें त्या सर्वांचें सेवन केलें! त्यामुळें त्यास असा अननुभूत हर्ष झाला कीं, तो एकाद्या मुलासारखा हंसूं, खेळूं व उड्याही मारूं लागला! तेव्हां ती वेश्या त्याचे अंगास वरचेवर आलिंगून त्याचें चुंबनही घेऊं लागली. अशोक वृक्षाचीं फुलें तोडून ती पुष्पाचे गुच्छ करी, मध्येंच लाजल्यासारखें करी, मध्येंच त्याचे भोंवतीं चेंडू खेळत नाचे! याप्रमाणें आपल्या लीलांनीं ऋष्यशृंगास मोहिल्यावर अग्निहोत्राचें मिष सांगून ती त्याजकडे पाहत पाहत आपल्या नावेसह निघून गेली.

इकडे बिचारा ऋष्यशृंग विचारशून्य किंबहुना वेड लागल्याप्रमाणें होऊन सुस्कारे टाकीत व आकाशाकडे दृष्टि लावून सचिंत, दीन व उदास होऊन बसला. विभांडकऋषि दोन घटकांनीं वनांतून परत आले; व 'अरे ऋष्यशृंगा, आज समिधा कां तयार केल्या नाहींस! स्रुक् स्रुवा ( यज्ञांतील पळ्या ) धुवून अग्निहोत्र-होम केलास काय? होमधेनूची धार काढलीस काय? अरे आज तुला काय झालें तरी काय?' असे त्यास प्रश्न विचारूं लागले. जवळ जाऊन पाहिल्यावर विभांडकांचे लक्षांत सर्व प्रकार आला, व

' माझे अपरोक्ष आश्रमांत कोणी आलें होतें काय ?' असें त्यानीं ऋश्यशृंगास विचारलें. (वन० अ० १११) तेव्हां तो त्यांस म्हणालाः—" बाबा, काय सांगूं ? तुम्ही गेल्यावर येथें एक जटाधारी ब्रह्मचारी आला होता. त्याच्या जटा काळ्या भोर; व डोक्यास चिकटून दोहोंकडे नेऊन मागें सोन्याच्या दोरीनें बांधलेल्या होत्या. त्याचें तेज विलक्षण असून त्याचा वर्ण सोन्यासारखा होता. त्याच्या कंठांत झाडाच्या आळ्यासारखें व विजेसारखें चकाकणारें कायसेंसें होतें. माझ्यासारखाच त्याचा कटदोरा असून तो फार झळकत होता. त्याचे हातांत व पायांत कसल्याशा रुद्राक्षमाला असून त्या मंजुळ शब्द करीत होत्या. त्याचें बोलणें कोकिळेसारखें होतें. तो उजव्या हातानें एक चमत्कारिक फळ घेऊन जमिनीवर आपटी व तें वर उडालें कीं पुनः हातानें खालीं आपटी, व हें करतांना नाच करी ! त्याचीं वल्कलें फारच सुंदर होतीं. त्यानें माझ्या अंगाशीं बिलगून माझे तोंडासी तोंड लावलें. त्यानें मला अनेक रसभरित फळें दिलीं. त्यानें दिलेलें मधुरजल-प्राशन करतांच मला अत्यानंद झाला; व भूमि हालतेशी वाटूं लागली ! तो म्हणाला, असें करणें हें माझें व्रतच आहे ! तो येथून गेल्यापासून माझे मनास कसेंसेंच होत आहे, व सर्व अंग पेटल्यासारखें वाटत आहे. त्याचे आश्रमांत आपण जावें किंवा त्यासच आपले येथें आणून आम्हीं उभयतांनीं त्याच्यासारखेंच तप करावें, असें मला वाटत आहे ! ' (वन० अ० ११२)

ऋष्यशृंगाचें हें लहान मुलासारखें भाषण ऐकून विभांडक त्याची मुलाप्रमाणेंच समजूत करूं लागले:—' अरे! हे राक्षस असून सुंदर रूपें धारण करून तुझ्यासारख्या ऋषिकुमारांच्या तपांत विघ्न करीत असतात; आणि त्यांस सद्गति व सुख मिळूं देत नाहींत त्यांचें दर्शन सुद्धां आपल्यासारख्यांनीं घेतां कामा नये! त्यांनीं तुला जें मधुर जल दिलें म्हणतोस तें **अपेय व दुष्ट लोकच ज्याचें सेवन करतात, असें पापकारक मद्यच होतें!** ' याप्रमाणें मुलाची समजूत करून विभांडक रागानें त्या स्त्रीचा वनांत शोध करूं लागले. पण तीन दिवस फिरूनही जेव्हां शोध लागला नाहीं, तेव्हां पुनः निर्धास्त होऊन विभांडक वनांत फळें आणण्यास गेले. ही संधि साधून पुनः ती वेश्या तेथें आली. तिला पाहतांच ऋष्यशृंग आनंदानें तिच्याकडे गेला, व ' माझा पिता परत येण्याचे आंतच चल आपण तुझ्या आश्रमांत जाऊं या ' असें म्हणाला! त्याप्रमाणें तिनें ऋष्यशृंगास नावेंत बसवून ती चंपानगरासमीप आणली; व ऋष्यशृंगास राजवाड्यांत आणलें! राजानें त्यास आपल्या अंतःपुरांत ठेवलें; व त्याला पुनः आश्रम म्हणून दाखवितां यावा म्हणून ती शुभ्र नांवही नदीतीरीं तशीच ठेविली. ऋष्यशृंग अंतःपुरांत येतांच अंगदेशांत सर्वत्र पाऊस पडून आबादानी झाली. तीमुळें आनंदित होऊन लोमपादराजानें आपली कन्या शांता ऋष्यशृंगास अर्पण केली. एकुलत्या एका मुलास असें कपटानें फसवून नेल्याबद्दल रागावून विभांडक आपल्या राजधानीस येईल, हें राजा जाणून होता. म्हणून त्याचे आश्रमापासून राजधानीपर्यंतच्या वाटेंत अनेक शेतें, गौळवाडे व गाईचीं खिल्लारें त्यानें तयार करून ठेविलीं. आणि तेथील गवळ्यांनीं व गुराख्यांनीं

विभांडकाचा उत्तम सत्कार करून, 'हीं शेतें, गौळवाडे व खिल्लारें ऋष्यशृंगाचींच आहेत' असें त्यास सांगावें, अशीही तजवीज केली. इकडे विभांडक वनांतून फळें घेऊन आश्रमांत परत येतात, तों ऋष्यशृंग नाहींसा झाल्याचें त्यांस दिसून आलें. त्यास कोणीं कोठें नेलें, हें लक्षांत येऊन ते संतापानें लोमपादाचें राष्ट्र व नगर शापानें जाळून टाकण्यासाठीं, चंपानगराकडे निघाले. परंतु वाटेंत ठिकठिकाणीं असलेलीं शेतें, खिल्लारें व गौळवाडे पाहून, तेथील सत्कार अनुभवून व हीं सर्व आपल्या मुलास मिळाल्याचें ऐकून विभांडकांचा बहुतेक राग निघून गेला. राजवाड्यांत आल्यावर तर राजानें केलेला सत्कार, आपल्या पुत्राचा थाट व सुनेचें रूप पाहून विभांडकांचा राग पूर्णपणें नाहींसा होऊन त्यानीं राजास उलट आशीर्वादच दिले! आणि 'शांतेचे पोटीं पुत्र होईपर्यंत राजवाड्यातच राहून, मग पत्नीसह आश्रमांत परत ये' अशीही त्यानीं आपल्या पुत्रास आज्ञा केली. तीप्रमाणें कांहीं काळानें शांतेला पुत्र झाल्यावर तो राजाचे हवालीं करून ऋष्यशृंग शांतेसह कौशिकीनदीचे तीरावरील आश्रमास पुनः परत आला. तेथें अरुंधती, लोपामुद्रा यांनीं ज्याप्रमाणें वसिष्ठ अगस्त्यांची एकनिष्ठेनें सेवा केली. तशी शांताही ऋष्यशृंगाची सेवा करीत राहिली. (वन० अ० ११३)

---

# जामदग्न्य-चरित्र.

—:०:—



हैहयनामक क्षत्रिय-कुलांचा कार्तवीर्य नांवाचा अधिपति असून तो अनूप देशाचा राजा होता. त्यास एक हजार हात असून तो अतिबलाढ्य होता, यावरून त्याचें सहस्रार्जुन असेंही नांव पडलें होतें. दत्तात्रेयांच्या प्रसादानें त्यास एक सुवर्ण-विमान प्राप्त झालें असून त्याच्या रथाची गति पृथ्वीवर सर्वत्र अव्याहत चालत असे. **तामस प्रकृतीचे पुरुषास वैभव व बळ यांचा लाभ झाला कीं ते लवकरच उन्मत्त व क्रूर बनतात.** या न्यायानें या साधनांचे जोरावर कार्तवीर्य देव, यक्ष, ऋषि व इतर प्राणिमात्र यांस त्रास देऊं लागला; किंबहुना त्यानें देवांचा राजा इंद्र याचाही तो शचीसह क्रीडा करीत असतां तिचे देखत-उपमर्द केला. तेव्हां सर्व प्राणिमात्रांचे रक्षणाकरतां व हिताकरतां कार्तवीर्याच्या वधाचा उपाय श्रीविष्णु यांस योजावा लागला. इकडे कान्यकुब्ज देशाचा बलाढ्य राजा गाधि हा वार्धक्य आल्यावर राजर्षींचे रीतिप्रमाणें पत्नीसह वनांत राहूं लागला. त्या वनांत त्यास अप्सरेसारखी एक कन्या झाली. भृगुपुत्र ऋचीक भार्गव यानें तेथें येऊन त्या सत्यवती कन्येस मागणी घातली. तेव्हां गाधीनें सांगितलें कीं, ‘ सर्व अंग पांढरें शुभ्र पण कान तेवढे काळे असलेले असे १ हजार एकजात घोडे शुल्क म्हणून जो देईल त्यासच कन्या द्यावयाची, असें आमचें कुलव्रत आहे.’ हें ऐकून भार्गवानें वरुणाची प्रार्थना करून त्याजपासून असे १ हजार श्यामकर्ण अश्व संपादन केले. हे घोडे जेथें उत्पन्न झाले, त्या स्थलास ‘ अश्वतीर्थ ’

असें नांव प्राप्त झालें. एक हजार श्यामकर्णांचें शुल्क मिळतांच गाधीनें गंगातीरीं सत्यवती भृगुपुत्र ऋचीकास दिली. यथाविधि विवाह होऊन भार्येसह ऋचीक पित्याचे आश्रमास परत आला; व पत्नीसह भृगुऋषींस नमस्कार करून हात जोडून नम्रपणानें उभा राहिला. तेव्हां भृगुऋषींनीं संतुष्ट होऊन सुनेस वर मागण्याची आज्ञा केली. तीप्रमाणें तिनें स्वतःस व आपल्या मातेस पुत्र व्हावा, असा वर मागितला. तेव्हां भृगुऋषि म्हणाले:—" ऋतुकालीं स्नान झाल्यानंतर तूं औदुंबर वृक्षास व तुझ्या मातेनें अश्वत्थ वृक्षास आलिंगन देऊन मीं मोठ्या प्रयत्नानें तयार केलेले हे चरु प्राशन करावे. म्हणजे तुम्हां दोघींसही पुत्र होऊन तुमचे मनोरथ पूर्ण होतील. " भृगुऋषींच्या ह्या वरप्रदानाप्रमाणें करीत असतां वृक्षालिंगन व चरुप्राशन करण्याचे वेळीं ह्या मायलेकींच्या हातून चुकून उलटापालट झाली. हिचा चरु ती प्याली व तिचा ही प्याली; आणि सत्यवतीनें औदुंबराचे ऐवजीं अश्वत्थवृक्षास आलिंगन दिलें व तिचे मातेनें औदुंबर वृक्षास आलिंगिलें. हें सर्व अंतर्ज्ञानानें कळून आल्यावर भृगुऋषि सुनेस म्हणाले:—" तुझ्या आईनें तुला खासें फसवून चरु-प्राशन व वृक्षालिंगन यांत उलटापालट केली आहे; यामुळें तिचे पोटीं ब्राह्मणवृत्तीचा क्षत्रिय व तुझे पोटीं क्षत्रियवृत्तीचा ब्राह्मण पुत्र उत्पन्न होणार. " हें ऐकून सत्यवती म्हणाली कीं, 'असें व्हावयाचेंच असेल तर माझ्या पुत्राचे ऐवजीं माझा नातू क्षत्रियवृत्तीचा ब्राह्मण होवो. ' सुनेची हीही मनीषा पूर्ण होईल, असा भृगूंनीं आशीर्वाद दिला. त्याप्रमाणें योग्य कालीं तिला जमदग्नि हा पुत्र झाला. हा पुढें अत्यंत तेजस्वी, वेदवेत्ता व तपस्वी असा निपजून त्यास चार अस्त्रें व सर्व धनुर्वेद

यांचें ज्ञान स्फुरलें. यानें प्रसेनजिताची कन्या रेणुका इजशीं विवाह केला, व तिजसह तो तपोवनांत पुनः तपाचरण करूं लागला. जमदग्नि व रेणुका यांस एकंदर पांच पुत्र झाले. रुमण्वान्, सुषेण, वसु, विश्वावसु व राम अशीं त्यांचीं नांवें होतीं. राम सर्वांत लहान असूनही तेज, पराक्रम, वेदज्ञान वगैरे गुणांत सर्वांहून श्रेष्ठ होता.

एके दिवशीं हे पांचही पुत्र फळें आणण्यासाठीं वनांत गेले असतां रेणुका एकटीच नदीवर स्नानास आली होती. तेथें भार्यासह मार्तिकावत देशाचा चित्ररथराजा जलक्रीडा करीत होता, तो तिच्या दृष्टीस पडला. गळ्यांत कमलमाला घालून स्वच्छंदपणें क्रीडा करणाऱ्या त्या राजाचें वैभव पाहून रेणुकेचें चित्त चंचल झालें, व त्याच्या समागमाची इच्छा क्षणमात्र तिचे मनांत उद्भवली. या मनोमय व्यभिचाराचे पाप-विकारानें पीडित होऊन भांबावलेली रेणुका आश्रमांत येतांच जमदग्निऋषींस सर्व प्रकार कळून आला. तिच्या मनाची स्थिरता ढळून तिचें ब्रह्मतेज नष्ट झालें, याबद्दल तिचा धिःकार करून तिला शासन करण्याचें त्यांनीं ठरविलें. हें घोर कृत्य करण्याची त्यानीं आपल्या पुत्रास आज्ञा केली. पण पहिले चार पुत्र हा सर्व प्रकार पाहून गोंधळून गेल्यामुळें त्यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. आपल्या आज्ञेचा असा अपमान झालेला पाहतांच जमदग्नींनीं शाप देऊन चारी पुत्रांस गतप्राण केलें. सगळ्यांचे मागून परशुराम आश्रमास आला; तेव्हां जमदग्नींनीं त्यासही तीच आज्ञा केली. तेव्हां रामानें हातांत परशु घेऊन मातेचें तत्काळ शिर उडविलें! आपली आज्ञा शिरसा वंद्य करून परशुरामानें हें दुर्घट कृत्य केल्याचें पाहून जमदग्नींस परम संतोष झाला, व त्यांनीं आपल्या

त्या आज्ञाधारक व बाणेदार पुत्रास वर देऊं केले. तेव्हां त्यानें **पितृभक्तीइतकीच जाज्वल्य असलेली आपली मातृभक्ति व बंधुप्रीति प्रगट केली.** त्यानें पित्यापाशीं असा वर मागितला कीं, 'माझी माता पुनः जिवंत व्हावी; तिला या मनोमय व्यभिचाराचें पातक लागूं नये; व मीं केलेल्या वधाचीही तिला आठवण राहूं नये, आणि माझे सर्व वडील भाऊ जिवंत व्हावे !' असे वर मागून शिवाय आपणास युद्धांत जिंकणारा दुसरा योद्धा कोणी असूं नये व आपण चिरंजीव असावें, अशीही त्यानें जमदग्नीस प्रार्थना केली. जमदग्नीनेंही संतुष्ट होऊन हे सर्व वर रामास दिले.

इकडे आरंभीं सांगितलेला अनूप देशचा राजा कार्तवीर्य जमदग्नीचे पुत्र वनांत गेले असतां आश्रमास आला. तेथें रेणुकेनें मन्मान्य अतिथीस योग्य असा त्याचा आदरसत्कार केला. परंतु वैभवाच्या व बलाच्या मदानें उन्मत्त झालेल्या राजानें त्या सत्काराचा स्वीकार केला नाहीं, एवढेंच नव्हे तर उलट आश्रमांतील सर्व वृक्ष उध्वस्त केले, व ऋषीच्या होमधेनूच्या हंबरड्याकडे लक्ष न देतां तिचें वासरूं धरून नेलें. वनांतून परत आलेल्या रामास जमदग्नीनें घडलेली सर्व हकीकत सांगितली. ती व गाईचे हंबरडे ऐकून परशुरामास फार क्रोध आला. त्यानें कार्तवीर्याचा पाठलाग करून त्याशीं युद्ध केलें; व त्यांत त्याचा पराजय करून त्याचे हजार हात परशूनें, भाल्यानें व बाणांनीं छेदून टाकले ! कार्तवीर्याच्या भाईबंदांनीं योग्य संधि साधून याचा चांगलाच सूड उगविला. परशुराम आश्रमांत नाहीं असें पाहून त्यांनीं निःशस्त्र व तपोमग्न असलेल्या जमदग्नीचा अमानुषपणें वध केला ! आश्रमांत परत आल्यावर हा भयंकर प्रकार पाहून जामदग्न्याच्या क्रोधास

सीमाच राहिली नाहीं. धर्मज्ञ, सदाचारी, व कोणाचाही द्रोह न करणारा असा आपला पिता युद्ध न करितां तपाचरणांत निमग्न असतां, त्यास एकट्यास गांठून कार्तवीर्याच्या क्षुद्र व नीच दायादांनीं त्याचा असा वध केला, हें पाहून रामाचें हृदय दुःख व संताप यांनीं भरून आलें. तपस्वी, मुनि, ऋषि, ब्राह्मण इत्यादिकांचें शत्रूंपासून संरक्षण करून त्यांचा योगक्षेम चालविणें, व त्यांच्या पुण्याचे वांटेकरी होणें हें ज्या क्षत्रियांचें कर्तव्य, तेच ब्राह्मणांचा छल किंबहुना वध करूं लागलेले पाहून परशुरामाचा क्रोधाग्नि भडकला; आणि त्यांत ह्या सर्व अधम क्षत्रियांची आहुति देण्याची त्यानें प्रतिज्ञा केली. तीप्रमाणें एकट्या शस्त्रधारी परशुरामानें कार्तवीर्याचे सर्व पुत्र व भाऊबंद ठार केले, एवढेंच नव्हे तर एकवीस वेळां दिग्विजय करून क्षत्रियांचा संहार केला! व त्यांच्या रक्तानें समंत-पंचकामध्यें झालेल्या पांच सरोवरांच्या रक्तोदकानें त्यानें आपल्या पितरांचें तर्पण केलें! तसेंच अनेक यज्ञयाग करून क्षत्रियांपासून जिंकलेली सर्व पृथ्वी कश्यपऋषींस अर्पण केली, आणि मिळविलेल्या धनापासून दहा वाव लांब-रुंद व नऊ वाव उंच अशी सोन्याची यज्ञवेदी तयार करून तीही कश्यपांस दान केली. ही पृथ्वी व वेदी कश्यपांच्या अनुयायी ब्राह्मणांनीं खंडशः करून आपसांत वांटून घेतली, म्हणून त्यांस त्यापुढें 'खांडवायन' ही संज्ञा प्राप्त झाली. याप्रमाणें उन्मत्त क्षत्रियांचा निःपात करून व जिंकलेल्या पृथ्वीचें राज्यही इतरांस अर्पण करून स्वतः अलिप्त असा परशुराम कृतकृत्य होत्साता महेंद्रपर्वतावर जाऊन तपश्चर्या करूं लागला! (वन० अ० ११५–११७)

---

# च्यवन-चरित्र.





महर्षि भृगु यांस च्यवननामक एक महातपस्वी पुत्र होता. भृगूंच्या आश्रमानजीक रम्य सरोवराचे तीरीं वीरासन घालून ह्यानें घोर तपश्चर्या आरंभिली. असें दीर्घकाल तपाचरण करीत असतां च्यवनाचें शरीर मातीच्या ढिगाप्रमाणें किंवा लांकडाच्या मोठ्या खांबाप्रमाणें दिसूं लागलें; कांहीं दिवसांनीं त्यावर मुंग्यांचें वारूळ वाढून तें वेलींनीं अगदीं आच्छादून गेलें! याप्रमाणें पुष्कळ काल लोटल्यानंतर एके समयीं शर्यातिनामक राजा आपल्या चार हजार स्त्रिया व सुकन्या नांवाची कन्या यांसह त्या सरोवराचे कांठीं क्रीडा व जलविहार करण्यासाठीं आला. सुकन्या आपल्या मैत्रिणींसह त्या वनांत फल-पुष्पें वेंचीत इकडे तिकडे हिंडत होती; तसेंच रूप, तारुण्य व विलास यांच्यामुळें अंगीं उन्मत्तता आल्याकारणानें ती फुलझाडांच्या फांद्याही तोडीत होती. याप्रमाणें फिरत असतां ती वरील वारुळाजवळ आली. विजेप्रमाणें चमकत तेथें इतःस्ततः फिरणारी ही तरुण राजकन्या पाहून च्यवनास अत्यंत आनंद झाला; व ते तिजशीं बोलूं लागले. परंतु दीर्घ व घोर तपामुळें त्यांचा कंठ सुकून गेला असल्याकारणानें त्यांचें बोलणें तिला ऐकूं आलें नाहीं. वारुळाचे भोंकांतून च्यवनांचे डोळे तेवढे लुकलुकत होते. ते पाहून 'वारुळांत कायग बाई नरी आहे हें!' असें म्हणून बालिश जिज्ञासेनें

मोहित होऊन त्या भोंकांतून तिनें कांटा आंत टोंचला! त्यामुळें च्यवनांचे डोळे फुटून ते आंधळे झाले. राजकन्येनें केलेला हा अपमान व ही इजा त्या तपोनिष्ठमुनींस सहन करवली नाहीं. त्यानीं आपल्या तपःसामर्थ्यानें शर्यातीच्या बरोबर आलेल्या सैन्यांतील सर्व लोकांचें हगणें-मुतणेंच बंद करून टाकलें! यामुळें त्या सैन्यांतील सैनिक फार हैराण झाले. राजाचे कानावर ही वार्ता गेली; तेव्हां आपणांपैकीं कोणीतरी कोणा तपस्व्याचा अपराध केल्यामुळें आपल्या सैन्यास त्याचें हें प्रायश्चित्त मिळत आहे, हें त्याच्या लक्षांत आलें. याबद्दल त्यानें पुष्कळ चौकशीही केली, पण शोध लागेना. अखेर सुकन्येनेंच पित्यापाशीं येऊन सांगितलें कीं, ' वारुळाचे भोंकांत काजव्यासारख्या तेजस्वी वस्तु दिसल्या म्हणून मीं सहज त्यांस काट्यानें टोंचलें आहे. ' हें ऐकून शर्यातीनें वारुळाजवळ येऊन च्यवनांची प्रार्थना केली कीं ' माझ्या मुलीनें अज्ञानानें व पोरपणामुळें हें कृत्य केलें आहे, त्याची क्षमा असावी. ' तेव्हां ' तुझी ही रूपवान् व तरुण पण गर्विष्ठ कन्या मजला अर्पण करशील तरच या अपराधाची क्षमा करीन ' असें च्यवनानीं त्यास उत्तर केलें. शर्यातीनेंही जास्त विचार न करतां सुकन्या त्यांस अर्पण करून तिचा त्यांशीं यथाविधि विवाह करून दिला. शर्यातिराजा च्यवनांचा आशीर्वाद घेऊन राजधानीस परत आला, व सुकन्या पतिव्रताधर्मानें पतीची सेवा आणि त्याच्या यज्ञक्रियेस व तपाचरणास साहाय्य करीत त्याच्याच जवळ आनंदानें राहूं लागली.

पुढें एके दिवशीं सुकन्या त्या सरोवरावर स्नान करून आश्रमांत परत जात असतां ती अश्विनीकुमारांचे दृष्टीस पडली. तिचें लावण्य व तारुण्य पाहून त्यांस मोह उत्पन्न झाला; व त्यांनीं ती

कोणाची कोण वगैरे चौकशी केली. ' मी शर्यातिराजाची कन्या व च्यवनांची पत्नी आहें ' असें तिनें विनयपूर्वक व मर्यादेनें उत्तर दिलें. परंतु **काममोहित झालेल्या पुरुषांस विनय, मर्यादा किंवा लज्जा यांचें बंधन मुळींच राहत नाहीं**; या न्यायास अनुसरून अश्विनीकुमार तिला म्हणाले:—' उत्तम वस्त्रभूषणें कांहींच अंगावर नसून तूं उलट धुळीनें मलीन झालेली असतांही जर इतकी सुंदर दिसत आहेस, तर दिव्य वस्त्रभूषणें घातल्यावर देवकन्यांसही लाजविशील. तुझें संरक्षण किंवा पोषण करण्यास व विषयसुखसेवनास सर्वथैव असमर्थ अशा च्यवनासारख्या वृद्ध पतीची सेवा करून तूं आपलें यौवन व लावण्य कां निष्फळ करीत आहेस? आम्हांपैकीं एकास वरून तूं कृतकृत्य हो. ' हें फाजिल भाषण ऐकून, ' मी पतिव्रता आहें; मजशीं असलें भाषण करूं नका, ' एवढेंच उत्तर सुकन्येनें दिलें. तेव्हां दुसरी कपटाची युक्ति योजून अश्विनीकुमार म्हणाले कीं, ' आम्ही देवांचे वैद्य असून तुझ्या पतीस आम्हांप्रमाणेंच पुनः तरुण व रूपसंपन्न करतों; व मग आम्हां तिघांपैकीं जो तुला आवडेल त्यास तूं वर. ' आपल्या पतीस अश्विनीकुमारांसारख्या अक्षय्य रूप–तारुण्याच्या सौख्याचा लाभ करून देण्याची ही संधि दवडूं नये, असें त्या साध्वीच्या मनांत आलें. अश्विनीकुमारांचें हें म्हणणें पतीस कळवून त्यास तिनें त्याची संमति मिळविली. अश्विनीकुमारांनीं सांगितल्यावरून त्यांचेसह च्यवन त्या सरोवराचे पाण्यांत बुडून राहिले. दोन घटकांनीं तिघेही वर येतांच ते एकसारखेच दिव्य रूपयौवनसंपन्न व सारख्याच वेशाचे दिसूं लागले ! पण अशा रीतीनें सुकन्येला फसविण्याचा अश्विनीकुमारांनीं केलेला प्रयत्नच उलट फसून

त्यांचेच गळ्यांत आला! कारण पातिव्रत्याचरणानें निर्मळ, सतेज, शुद्ध व पवित्र झालेल्या मनाच्या व बुद्धीच्या साह्यानें तिनें त्या तिघांतून आपलाच पति नेमका शोधून त्यासच पुनः वरिलें! पत्नीच्या पातिव्रत्यामुळें आपणास पुन: भार्याच केवळ नव्हे तर तारुण्य व सौंदर्यही प्राप्त झालेलें पाहून च्यवन-भार्गवांस संतोष झाला; व इंद्राचे समक्ष मी तुम्हांस यज्ञांत आवाहन करून सोमपान करवितों, असें त्यानीं अश्विनीकुमारांस अभिवचन दिलें.

आपल्या कन्येच्या पातिव्रत्यप्रभावानें आपल्या जांवयास पुन: सौंदर्य व तारुण्य प्राप्त झाल्याचें वर्तमान कळतांच त्याचे भेटीस शर्यातिराजा पत्नीसह आला. तेथें च्यवनाचे प्रोत्साहनानें राजानें एका मोठ्या सोमयज्ञाची तयारी केली. यज्ञ सुरू होऊन देवांस सोम अर्पण करण्याचा समय येतांच च्यवनानें अश्विनीकुमारांचें आवाहन करून त्यांस सोम अर्पण करण्याचे हेतूनें सोमपात्र हातीं घेतलें. तों इंद्रानें मध्यें पडून यास हरकत घेतली. 'आश्विनीकुमार हे देवांचे केवळ सेवक—चिकित्सक—असल्यामुळें त्यांस सोमप्राशनाचा अधिकार नाहीं' असें इंद्राचें म्हणणें होतें. परंतु 'इंद्राप्रमाणें अश्विनीकुमारही देव असल्यामुळें त्यांसही सोम-प्राशनाचा अधिकार आहे' असें च्यवनांचें मत होतें. याप्रमाणें उभयतांचा वाद चालला असतां इंद्रानें त्यांस धाक घातला कीं, 'अश्विनीकुमांरास सोम अर्पण करण्यासाठीं सोमपात्र हातीं घ्याल तर मीं आपल्या घोर वज्राचा प्रहार करीन!' परंतु स्वतःच्या तप:-सामर्थ्याचा विश्वास दृढ असल्यामुळें, अश्विनीकुमारांस दिलेलें वचन कदापि निष्फळ होऊं द्यावयाचें नाहीं, असा त्यांचा दृढ निश्चय होता.

च्यवनानीं इंद्राच्या ह्या धमकीस भीक न घालतां सोमपात्र हातीं घेऊन अश्विनीकुमारांस सोमप्राशन करविलें. हें पाहून त्यांजवर टाकण्यासाठीं इंद्रानें वज्र उचललें, तों च्यवनानीं त्याचा तो वज्र-धारी हातच स्तंभित करून टाकला ! आणि इंद्रशासनार्थ एक महाअसुर निर्माण करण्याकरतां अग्नींत आहुति दिली. त्यासरशीं च्यवनांचे तपोबलानें ‘ मद ’ नामक प्रचंड देहधारी, महाभयंकर व अक्राळ विक्राळ राक्षस अग्नींतून उत्पन्न झाला ! हा असुर आपला कालरूपी जबडा पसरून इंद्रास खाण्यासाठीं त्याजकडे धांवून आला. तेव्हां इंद्र च्यवनांस म्हणाला:—‘ आज तुम्हीं केलें त्याप्रमाणें अश्विनीकुमार यांस खरोखरच सोमपान करण्याची पात्रता आहे, हें मी कबूल करतों. तुमचा, तुमच्या पत्नीचा व शर्या-तीचा प्रताप व सामर्थ्य सर्व जगास विदित व्हावें, म्हणूनच मीं असें वर्तन केलें; मला क्षमा असावी. ’ हें ऐकून च्यवनानीं इंद्राची ‘ मदासुरा ’ पासून मुक्तता केली; आणि स्वकीय तपोबलानें निर्माण केलेल्या ‘ मदाचा ’ उच्छेद करून त्याचे विभाग स्त्रिया, मद्य, द्यूत व मृगया यांमध्यें वांटून टाकले. ज्या सरोवरा-नजीक ही कथा घडली त्याचें ‘ च्यवनतीर्थ ’ हें नांव तेव्हां-पासून प्रचलित झालें. ( वनपर्व, अध्याय १२२–१२५ )

---

# सोमक-चरित्र.





प्राचीन काळीं सोमक नांवाचा एक धर्मनिष्ठ राजा होता. पुष्कळ पुत्रसंतति व्हावी, या हेतूनें त्यानें एकीसारख्या एक अशा शंभर भार्या केल्या होत्या. परंतु हा हेतु बराच काळ सफल न होतां राजा व त्याच्या शंभर राण्या यांस वार्धक्य येऊं लागलें. अखेर तशा वृद्धपणांत एका राणीस गर्भ राहून तिला 'जंतु' नांवाचा एक पुत्र झाला. वृद्धपणीं झालेला व एकुलता एक अशा त्या पुत्रावर सर्व राण्या सारखें प्रेम करीत असून इतर सर्व व्यवसाय सोडून त्या त्याच्या भोंवतींच जमून बसत असत. एके वेळीं जंतूच्या बरगडीस एक मुंगी चावल्याबरोबर तें कोमल बालक मोठ्यानें ओरडलें; तें ऐकतांच त्याच्या शंभर मातांनींही दुःखानें किंकाळी फोडली! अंतःपुरांतील हा आक्रोश, मंत्रिसभेंत राजा बसला होता तेथें त्यास ऐकूं आला. द्वारपालास पाठवून चौकशी करतां त्यास या आक्रोशाचें कारण कळून आलें. **निपुत्रिकपणापेक्षांही एकपुत्रत्व हें जास्त दुःखदायक असतें**, हें या वेळीं राजाचे प्रत्ययास आलें. 'आपणास शंभर पुत्र होतील, असा कांहीं धार्मिक उपाय आहे काय' असें राजानें पुरोहितास विचारलें. पुरोहितानें एक अत्यंत कठिण असा उपाय त्यास सांगितला. पण शंभर स्त्रियांचे पोटीं आपणास शंभर पुत्र व्हावे, अशी त्यास अत्यंत उत्कंठा लागल्यामुळें त्यानें तो निष्ठुर उपायही करण्याचें मान्य केलें. योग्य वेळीं उपाध्याय सोमकराजाकडून यज्ञ करवूं लागला. या यज्ञांत खुद्द जंतूसच

मारून त्याच्या वपे-( चरबी-) च्या आहुति यज्ञकुंडांत द्यावयाच्या होत्या ! वध करण्यासाठीं उपाध्याय जंतूचा डावा हात धरून त्यास ओढीत होता; व दुसरीकडून त्याच्या शंभर माता दुःखानें व्याकुल होऊन रडत ओरडत त्यास ओढीत होत्या ! अखेर उपाध्यायानें जुलमानें जंतूस हिसकून घेऊन त्यास मारलें, व त्याच्या वपेच्या आहुति अग्नींत दिल्या. अग्नींतून वपेचा जो धूर निघाला त्याचा वास येतांच राजाच्या शंभरही राण्या मूर्छित होऊन पडल्या; व तशा स्थितींतच त्या सर्वांस गर्भ राहिले. पुरे दिवस भरल्यानंतर सगळ्या राण्यांस एकसारखे शंभर पुत्र झाले. जंतूही आपल्या मातेच्या पोटीं पुनः जन्मास आला, व पुरोहितानें आगाऊ सांगितल्याप्रमाणें त्याचे बरगडीवर एक सुवर्ण चिन्हही उमटलेलें होतें. जंतु हाच वयानें व गुणानें आपल्या शंभर भावांत श्रेष्ठ असून त्याचेवर त्या शंभर राण्यांचें आपल्या पुत्रांहूनही ज्यास्त प्रेम होतें. पुढें आयुष्य सरल्यावर सोमकराजा व त्याचा उपाध्याय हे दोघेही मृत्यु पावले. उपाध्याय नरकांत पडून आगीमध्यें शिजत आहे, असें सोमकास दिसून आलें. त्याजकडून उपाध्यायानें जो **नरयज्ञ करविला त्या पापाचें प्रायश्चित्त** म्हणून त्यास **हा नरकवास घडत होता**, हें त्याचेच तोंडून राजास कळलें. ' नरयज्ञाचे पातकाबद्दल एकट्या उपाध्यायासच शासन होणें योग्य नाहीं, त्या पातकाचा मी सारखाच वांटेकरी आहें। करतां माझ्या गुरुबरोबर मलाही नरकवास घडला पाहिजे ' असें सोमकराजा म्हणूं लागला. पण **कर्मफलाचा उपभोग कर्त्यावांचून दुसऱ्यास घेतां येत नाहीं**, असें यमधर्मानें राजास परोपरीनें सांगितलें. पण **त्या गुरुभक्त व न्यायी राजानें** आपला **निश्चय ढळूं** दिला

नाहीं. सोमकराजानें उपाध्यायाबरोबर नरकवास करून पापनिष्कृति केल्यानंतर त्यांच्या पुण्यकर्माप्रमाणें त्यांस उत्तम लोक प्राप्त झाले. ( वन० अ० १२७–१२८ )

---

## शिबिराजाची कथा





वितस्तानदीचे तीरीं उशीनर शिबिराजानें अनेक यज्ञ करून इंद्राहूनही अधिक लौकिक व पुण्य संपादन केलें. ह्यांपैकीं एका यज्ञाचे वेळीं भयंकर श्येन (बहिरीससाणा) पक्षी पाठीस लागल्यामुळें भयभीत झालेला एक कपोत ( पारवा ) जिवाचे आशेनें शिबिराजाकडे उडत येऊन त्याचे मांडीवर लपून बसला. श्येनपक्षीही लागलीच तेथें आला. कपोतपक्ष्यास राजानें आश्रय दिल्यामुळें आपल्या तोंडचा घांसच राजानें काढून घेतला, असें श्येनपक्ष्यास वाटलें. त्यानंतर श्येन व शिबिराजा यांचा पुढीलप्रमाणें संवाद झाला:—श्येन:—‘ मला फार क्षुधा लागली असून कपोत हें माझें शास्त्र-विहित भक्ष्य आहे; तें मजपासून हिरावून घेण्यानें तुला पुण्यप्राप्ति होणार नाहीं. ’ राजा:—‘ तुझ्या भीतीनें हा कपोत अगदीं घाबरून प्राणरक्षणार्थ मला शरण आला आहे. त्याला मी अभय न देईन तर शरणागताचा त्याग केल्याचें पातक मला लागणार नाहीं काय ?

यो हि कश्चिद्द्विजान् हन्याद्गां वा लोकस्य मातरम्।
शरणागतं च त्यजते तुल्यं तेषां हि पातकम् ॥

जे कोणी द्विजास ठार मारतात, किंवा सर्व लोकांची जननी अशी जी गाय तिची हत्या करतात, अगर शरणागताचा त्याग करतात, ते सर्व सारखेच पातकी होत.' श्येन—' भक्ष्य—आहार—सर्व प्राणिमात्रांस अत्यंत आवश्यक आहे. इतर सर्व वस्तूंचा त्याग करतां येईल; पण आहाराचा त्याग करणें शक्य नाहीं. राजा, तूं कपोतास अभय दिलेंस तर फार तर एकच प्राणी बचावेल. पण क्षुधेनें मीं व माझीं बायकामुलें प्राण सोडतील. दोन कर्तव्यांत विरोध आला तर त्यांचें गुरुलाघव-तारतम्य-पाहून ज्यास्त महत्त्वाचें व श्रेष्ठ कर्तव्य असेल तें करावें, हें तुला सांगावें असें नाहीं.' राजा—' तुझें म्हणणें सर्वस्वीं योग्य आहे. परंतु तुझ्या आहाराकरितां मीं शरणागताचा त्याग कसा करावा? तुला भक्ष्यच पाहिजे असेल तर मी तुजसाठीं एकादा बैल, डुक्कर, मृग किंवा रेडा विकत घेऊन खाण्यासाठीं तुला देतों. यानें कपोताचे प्राण वांचतील, एवढेंच नव्हे तर तुला मांसही पोटभर मिळेल.' श्येन—' तूं सांगितलेस हे प्राणी माझें भक्ष्य नव्हेत. कपोत हें श्येनांचें भक्ष्य म्हणून देवानेंच योजलेलें आहे। तें टाकून मीं इतरांचें मांस कां खावें?' राजा—' शिबींचें हें सर्व समृद्ध राज्य किंबहुना कपोताखेरीज इतर मागशील ती वस्तु मीं तुला देईन। पण मला शरण आलेला हा पक्षी मी तुला कालत्रयींही देणार नाहीं.' आपलें सर्व राज्य द्यावयास तयार झालेल्या शिबिराजाची कर्तव्यनिष्ठा किती दृढ आहे, याची कसोटी पाहण्याचा निश्चय करून श्येन म्हणाला:—' तुला

शरण आलेल्या या कपोताची जर तुला खरोखरच दया येत असेल तर त्याचे भारंभार स्वतःचें मांस कापून तूं तें मला अर्पण कर; त्यांत माझें समाधान आहे.' श्येन पक्ष्याचें हें भाषण ऐकून राजास आनंद झाला; व शरणागत-रक्षणाचें व्रत आपल्या हातून शेवटास जाईल अशा प्रकारचा मोबदला घेण्यास श्येनपक्षी तयार झाला. हा त्याचा अनुग्रहच आहे, असेंही त्यास वाटलें. ठरल्याप्रमाणें आपल्या शरीराचें मांस तोडून काढून तें कपोताच्या समोरच्या पारड्यांत तो राजा घालूं लागला. परंतु कांहीं केल्या कपोताचें पारडें वर येईना! असें करतां करतां राजाचे शरीरांत मांस मुळींच राहिलें नाहीं, तरी आपलें कपोताचें पारडें खालींच! मांस संपल्यावर खुद्द शिबिराजाच अस्थिमय शरीरानें दुसऱ्या पारड्यांत बसला! **शरणागताचे प्राणसंरक्षण करण्याचा आपला निश्चय शिबिराजानें आपल्या स्वतःच्या प्राणदानापर्यंतही पाळला,** हें पाहून ते श्येन-कपोत पक्षी इंद्र व अग्नि यारूपानें प्रगट झाले! व म्हणाले कीं 'तुझें सत्व व धर्मबुद्धि पाहण्यासाठींच आम्ही हीं पक्षिरूपें धारण करून तुझ्या यज्ञमंडपांत आलों होतों. तुझी ही अलोट धर्मबुद्धि आमच्या कसोटीस उतरली आहे.' असें म्हणून इंद्र व अग्नि स्वर्गी गेले. शिबिराजाही पूर्ववत् सुंदर काया प्राप्त होऊन देवलोकीं गेला! (वन० अ०१३०-१३१)

---

# अष्टावक्र-चरित्र.





उद्दालकऋषींपाशीं कहोड नांवाचा एक नियमनिष्ठ शिष्य होता. त्यानें आपल्या गुरूची बरेच दिवस एकनिष्ठेनें सेवा करून त्यांजपासून सर्व विद्या संपादिल्या. उद्दालकानींही कहोडाची विद्वत्ता व सदाचरण हीं लक्षांत घेऊन त्यास आपली सुजातानामक कन्या अर्पण करून त्यास जांवई केला. पुढें कांहीं दिवसांनीं सुजातेचे पोटीं गर्भ राहिला. गर्भ अग्नीप्रमाणें तेजस्वी असून आश्रमांत बापाचें जें वेदाध्ययन चाले तें पोटांतूनच ऐकून तो जन्मापूर्वींच वेदवेत्ता झाला. एकेसमयीं कहोड वेद पठण करीत असतां सुजातेचे पोटांतूनच गर्भ त्यास म्हणाला कीं, ‘ बाबा, आपण रात्रभर अध्ययन करतां; पण आपले हातून वेदपठण नीट होत नाहीं.’ शिष्यांसमक्ष आपल्या गर्भस्थ पुत्रानें आपला असा उपमर्द करावा, हें अर्थातच कहोडास रुचलें नाहीं. ‘ जन्मापासून तुझें शरीर आठ ठिकाणीं वांकडें होऊन राहील ’ असा त्यांनीं त्यास शाप दिला! सुजाता प्रसूत होण्यापूर्वीं तिच्या बाळंतपणास व संसारास लागणारें द्रव्य मिळवावें या हेतूनें कहोडऋषि जनकराजाकडे गेले होते. परंतु तेथें द्रव्यप्राप्ति होण्याऐवजीं जनकाचे दरबारांतील बंदी नांवाच्या सूतानें त्यास वादांत जिंकून पाण्यांत बुडविलें! इकडे नऊ महिने भरल्यावर सुजाता प्रसूत होऊन तिला कहोडाचे शापाप्रमाणें आठ ठिकाणीं शरीर वांकडें असलेला असा

पुत्र झाला व म्हणूनच त्याचें नांव त्याचे आजानें 'अष्टावक्र' असें ठेवलें. याच वेळीं उद्दालकऋषींसही श्वेतकेतुनामक पुत्र झाला. हे मामेभाचे असलेले पण सारखे वयाचे उभयतां ऋषिकुमार उद्दालक हाच आपला पिता आहे, असें समजून भावाभावांप्रमाणें वागत असत. उद्दालकाचे आज्ञेप्रमाणें सुजातेनेंही कहोडाची हकीकत अष्टावक्रास कळूं दिली नाहीं. याप्रमाणें दोघे ऋषिकुमार १०।१२ वर्षांचे झाले. पुढें एके दिवशीं अष्टावक्र हा उद्दालकाचे मांडीवर निजला असतां श्वेतकेतूस त्याचा हिसाळा येऊन त्यानें अष्टावक्राचा हात धरून त्याला मांडीवरून खालीं ओढलें, तेव्हां अष्टावक्र रडूं लागला. 'हा तुझा पिता नव्हे, व या मांडीवर तुझा मुळींच हक्क नाहीं.' असें श्वेतकेतु आपल्या भाच्यास खोंचून बोलला. हें मर्मभेदक भाषण मुकाट्यानें ऐकून घेऊन अष्टावक्र आपल्या मातेकडे आला; व 'माझा पिता कोण व तो कोठें आहे' असें त्यानें तिला निकरावर येऊन विचारलें. तेव्हां निरुपाय होऊन व शापाचे भीतीनें तिनें त्यास कहोडाची सर्व हकीकत निवेदन केली. आपल्या बापास पाण्यांत बुडविणाऱ्या निर्दय व क्रूर बंद्यास वादांत जिंकून व त्यासच उलट पाण्यांत बुडवून पितृऋण फेडावयाचें, असा अष्टावक्रानें मनाशीं पक्का निर्धार केला. व त्याप्रमाणें अष्टावक्र व श्वेतकेतू हे दहा बारा वर्षांचे ऋषिकुमार जनकराजाचा यज्ञ चालू होता, तिकडे निघाले. वाटेंत खुद्द जनकराजाची गांठ पडली; तेव्हां राजाचे सेवक या दोघां ऋषिकुमारांस मार्गांतून दूर होण्यास सांगूं लागले. तेव्हां अष्टावक्रानें उत्तर दिलें कीं "ब्राह्मणाखेरीज इतरांस वाटेंत राजा भेटला तर त्यांनीं राजास वाट दिली पाहिजे। पण ब्राह्मण भेटला

असतां राजानेंच उलट त्यांस वाट सोडली पाहिजे. पण आंधळे, **बहिरे, स्त्रिया व डोक्यावर ओझें असलेला मनुष्य, हे कोणत्याही जातीचे असले तरी त्यांस सर्वांनीं—ब्राह्मणांनीं सुद्धां—वाट सोडली पाहिजे.** " अष्टावक्राचें हें बाणेदार व धर्मज्ञान दर्शविणारें उत्तर जनकराजास पटलें; व तो त्या ऋषिकुमारांस वाट देऊन बाजूनें निघून गेला. राजवाड्याचे महाद्वारापाशीं हे ऋषिकुमार आले व आंत यज्ञमंडपाकडे जाऊं लागले. तेव्हां द्वारपाळानें त्यांस प्रतिबंध केला; व ' **ब्राह्मण नसूनही जे वृद्ध व चतुर असतील अशांसही आंत येऊं द्यावें।** पण ब्राह्मण असून वयानें लहान असतील त्यांस आंत सोडूं नये; अशी आपणास जनकराजाची समतेची आज्ञा असल्याचेंही त्यानें त्यांस कळविलें. तेव्हां अष्टावक्र म्हणालाः—" **केवळ लहान म्हणून कोणाचाही अपमान करणें योग्य नाहीं.** शेंवरीच्या झाडाप्रमाणें उगीच कोणी वाढला, म्हणजे तो वृद्ध झाला असें नव्हे. **जो ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध असेल तोच खरा वृद्ध होय.**—

> **न तेन स्थविरो भवति येनास्य पलितं शिरः ।**
> **न हायनैर्न पलितैर्न वित्तेन न बंधुभिः ॥**
> **ऋषयश्चक्रिरे धर्मं योऽनूचानः स नो महान् ॥**

**मोठेपणा हा वयावर, पिकलेल्या केंसांवर, द्रव्यावर किंवा बंधुसमुदायावर अवलंबून नाहीं.** आमचें वय लहान असलें तरी आम्ही वेदवेत्ते व ब्रह्मज्ञानी आहों. बंद्याशीं आम्हीं वादविवाद करूं तेव्हां तुला याचा प्रत्यक्ष प्रत्यय येईल. आम्हांस आंत जाऊं दे. " इतक्यांत जनकराजाही तेथें आला. तेव्हां त्या ऋषिकुमारांनीं आपला हेतु राजास कळवून आंत येऊं देण्याबद्दल त्यास विनंती केली. 'अनेक

विद्वान् व वेदवेत्त्या ब्राह्मणांस वादांत जिंकून व त्यांस बांधून बंद्यानें पाण्यांत बुडविलें आहे; त्याचा पराजय हे दोन कुमार कसा करणार ? हेही इतरांप्रमाणेंच वादांत पराजित होऊन बिचारे नाहक प्राणांस मुकतील ' असें जनकराजास वाटलें; म्हणून तो त्यांस सामोपचाराच्या गोष्टी सांगून वादापासून परावृत्त करूं लागला. पण त्यांचा निश्चय ढळत नाहीं, असें पाहून त्यांस प्रश्न करून त्यांच्या विद्वत्तेची कसोटी स्वतः राजाच पाहूं लागला. ' झोंपीं गेल्यानंतर कोणाचे डोळे मिटत नाहींत? जन्म पावल्यानंतरही चलन वलन न करणारें कोण? हृदय कोणाला नसतें? वेगानें काय वाढतें? ' असे प्रश्न जनकानें विचारले असतां, अष्टावक्रानें त्यास उत्तर केलें:– 'झोपेंत मत्स्याचे डोळे मिटत नाहींत, अंड्यांत जन्मानंतरही हालचाल नसते, पाषाणाला हृदय नसतें व नदी वेगानें वाढते.' या प्रश्नांचीं व संवत्सर चक्र, विद्युत् व अशनि या संबंधाच्या कूटप्रश्नांचीही समर्पक उत्तरें १२ वर्षांच्या अष्टावक्रानें दिलेलीं पाहून जनकास साश्चर्य आनंद झाला व त्यानें त्यांस यज्ञमंडपांत येऊं दिलें. तेथें बसलेल्या सूतजातीच्या बंद्यास पाहतांच अष्टावक्रास आवेश चढला; व त्यानें त्यास वादास आव्हान केलें. तेव्हां बंद्यानें वादास प्रथम सुरुवात केली. तो म्हणालाः—' अग्नि, सूर्य, देवराज इंद्र व यम हे एकेकच आहेत.' त्यावर अष्टावक्रानें प्रत्युत्तर दिलें कीं, ' इंद्र व अग्नि, नारद व पर्वत, अश्विनीकुमार, जायापती ह्या जोड्या जोड्या परमेश्वरानें जगांत निर्माण केल्या आहेत. ' याप्रमाणें तीन, चार वगैरे संख्यांवरून उभयतांचा वाद होत असतां अखेर बंदी तेराव्या आंकड्यावर येऊन म्हणालाः—' त्रयोदशी ही तिथि प्रशस्त आहे, पृथ्वीचीं द्वीपें तेरा आहेत.....' याप्रमाणें

अर्धाच श्लोक म्हणून बंद्याला पुढें कांहींच सुचेना व तो गोंधळून गेला. तेव्हां अष्टावक्रानें श्लोक पुरा करून उत्तर दिलें कीं, 'देव-दैत्यांचे युद्धांत कशी दैत्य तेरा दिवस लढला, व अतिजगती, छंदाचीं अक्षरें तेरा असतात.' जनकाच्या राजसभेंत याप्रमाणें १०।१२ वर्षांच्या मुलानें आपणास फजीत केल्याचें पाहून बंदी खालीं मान घालून बसला. तेव्हां अष्टावक्र म्हणाला:—'ह्या बंद्यानें अनेक ब्राह्मणांस वादांत जिंकून पाण्यांत बुडविलें आहे, त्या अर्थी तोही आतां जिवंत राहून उपयोगी नाहीं; त्यासही पाण्यांतच बुडविलें पाहिजे.' वादकुशल बंद्यास लहान मुलानें पराजित केल्याचें पाहून जनकराजा इतका विस्मित झाला होता कीं, त्याचें लक्ष अष्टावक्राचे भाषणाकडे गेलें नाहीं. तेव्हां तो बाणेदार ऋषि-कुमार राजास म्हणाला:—'मदोन्मत्त हत्ती अंकुशासही जुमानीत नाहीं; तसा तूं लोकांच्या स्तुतीला भुलून माझ्या भाषणाकडे लक्ष देत नाहींस काय? भोंकरीचीं फळें खाऊन तुझी बुद्धि मंद तर झाली नाहींना?' अष्टावक्राचें हें भाषण ऐकून जनकानें नम्रपणें त्याची क्षमा मागितली; व त्यानें बंद्यास अष्टावक्राचे स्वाधीन केलें. 'त्यास पाण्यांतच बुडवून टाकावें' अशी अष्टावक्रानें पुनः आज्ञा केली. तेव्हां बंदी म्हणाला:—'मला पाण्यांत बुडविलें तरी मजला कांहीं होणार नाहीं; मी वरुणपुत्र असून माझ्या पित्याचे द्वादशवार्षिक यज्ञासाठींच वादांत जिंकलेले ब्राह्मण व कहोड वगैरे ऋषि पाण्यांत बुडवून मी तिकडे पाठविले होते. तिकडील यज्ञ संपवून ते पहा आतांच येथें येतील.' असें बंद्यानें म्हणतांच त्यानें बुडविलेले सर्व ब्राह्मण व कहोडऋषि तेथें एकदम प्रगट झाले! कहोडास हा सर्व प्रकार कळतांच त्यास मोठा संतोष झाला. 'मला करण्यास

अशक्य अशी गोष्ट माझ्या पुत्रानें केली आहे. पुत्र-प्राप्तीची इच्छा लोक यासाठींच करीत असतात. कारण कधीं कधीं निर्बल पुरुषासही बलवान्, मुर्खालाही चतुर व अविद्वानासही विद्वान् मुलगा होऊन कुलोद्धार करीत असतो.' याप्रमाणें बोलून कहोडानें आपल्या पुत्राचें कौतुक केलें. बंदीही अष्टावक्राचे व जनकाचे आज्ञेप्रमाणें पाण्यांत शिरून वरुणाकडे गेला; व कहोड हाही श्वेतकेतु व अष्टावक्र यांसह आपल्या आश्रमास परत आला. तेथें कहोडाचे आज्ञेवरून अष्टावक्रानें 'समंगा' नदींत स्नान केलें, तों त्याचे सर्व वांकडे अवयव सरळ झाले व ती नदीही पवित्र झाली. ( वन० अ० १३२–१३४ )

## यवक्रीत–चरित्र.

—:०:—



भरद्वाज व रैभ्य हे दोन ऋषी अत्यंत मित्रभावानें गंगातीरीं जवळ जवळ आश्रम बांधून राहिले होते. भरद्वाजांस यवक्रीत नांवाचा एक पुत्र असून रैभ्यांस अर्वावसु व परावसु असे दोन पुत्र होते. रैभ्य व त्यांचे दोनही पुत्र मोठे विद्वान् व वेदवेत्ते असल्यामुळें त्यांचा सर्व लोकांत मोठा आदर व मानमान्यता होत असे. परंतु भरद्वाज व यवक्रीत हे त्या काळच्या इतर अनेक ब्राह्मणांप्रमाणें वेद–ज्ञानशून्य असे निव्वळ तपस्वी असल्यामुळें त्यांच्यासंबंधानें लोकांत कोठेंच ख्याती नव्हती. ही गोष्ट यवक्रीताचे मनास फारच लागली. 'गुरूपासून वेदज्ञान संपादण्यास अतिशय काळ लागतो; याकरतां गुरूची गरज न लागतां सर्व ब्राह्मणांस सगळे वेद एकदम स्फुरावेत.' ह्या श्रेष्ठ महत्त्वाकांक्षेनें यवक्रीतानें घोर तपास प्रारंभ

केला. परंतु ह्या त्याच्या महत्त्वाकांक्षेत मैत्रीस घातक अशा मत्सराचें बीज असल्यामुळें याचें प्रायश्चित्त त्यास पुढें भोगावें लागलें. ' गुरूकडे न जातां स्वतःच बलात्कारानें वेदज्ञान संपादणें हा अमार्ग आहे ' असें सांगून इंद्रानें त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु यवक्रीतानें आपला निश्चय ढळूं दिला नाहीं. उलट त्यानें त्यास असें सांगितलें कीं, ' माझा हेतु पूर्ण झाला नाहीं, तर मी आपला देहच अग्नीमध्यें होमीन ! ' यवक्रीत आपला निर्धार सोडीत नाहीं, असें पाहून इंद्रानें निराळीच युक्ति योजली. एका वृद्ध ब्राह्मणाचें रूप घेऊन तो गंगानदीचे ओघांत एकेक मूठ वाळू आणून टाकूं लागला ! यवक्रीतानें विचारतां त्यानें सांगितलें कीं, ' लोकांना वरचेवर नावेंतून ही नदी उतरून जण्याचे फार कष्ट पडतात, ते वांचविण्यासाठीं मी तिचे पात्रांत हा वाळूचा पूल बांधीत आहें ! ' तेव्हां यवक्रीत हंसून म्हणालाः—' गंगेचा ओघ फार जोराचा आहे; त्यांत वाळूचा बांध बसणें अशक्य आहे. ' वृद्धब्राह्मणः—' केवळ तपानें वेदज्ञान प्राप्त करून घेण्याचा तुझा प्रयत्न जितका शक्य आहे तितकाच माझाही हा प्रयत्न शक्य आहे. ' हें भाषण ऐकतांच यवक्रीतानें त्यास इंद्र म्हणून ओळखलें; व तो त्यास म्हणालाः—' तपानें हें ज्ञान मिळणें शक्य नसेल तर तूं मला व माझ्या पित्याला वेदज्ञान-स्फुरणाचा वर दे. तपानें जें होत नाहीं तें समर्थांच्या वरप्रसादानें होऊं शकतें. ' यवक्रीताचा दृढ निश्चय पाहून इंद्रानें त्यास इष्ट वर देऊन कृतार्थ केलें. यवक्रीतानें पित्याकडे येऊन आनंदानें त्यास सर्व वृत्त निवेदन केलें. परंतु सात्विक व दूरदृष्टि भरद्वाज ऋषींस आनंदाचे ऐवजीं विषाद व दुःखच वाटलें. ते म्हणाले:—" इष्टवरप्राप्तिमुळें तुला गर्व

होईल. व **गर्वानें मनुष्यास एकदां पछाडलें म्हणजे त्याचा विनाशकाल समीप आला, असें समजावें.** प्राचीनकालीं बालधी-नामक ऋषीस पुत्रशोक होऊन त्यांनीं तप केलें व राहिलेला पुत्र—हे पर्वत ज्याप्रमाणें शाश्वत टिकणारे आहेत त्या प्रमाणें अमर-होवो, असा वर देवांपासून संपादन केला. ह्या वरामुळें त्याचा पुत्र मेधावी गर्वानें फुगून गेला; व भेटेल त्या ऋषी-मुनीचा, तपस्वाचा व ब्राह्मणाचा उपमर्द करूं लागला! धनुषाक्ष ऋषींचा त्यानें असा अपमान करतांच, त्यांनीं त्यास 'तुझा देह भस्म होवो' असा शाप दिला; तरीही त्याचें शरीर भस्म झालें नाहीं. तेव्हां त्यांनीं महिषा-कडून पर्वतास प्रहार करविले, तों मेधावी इकडे गतप्राण होऊन पडला! त्याचेप्रमाणें तुला गर्व होऊन तूं ऋषींचा—विशेषतः रैभ्य व त्यांचे पुत्र यांचा—अपमान करशील, तर तुझाही असाच घात होईल. ते महातपस्वी व तामसी आहेत; तूं अतःपर त्यांचे वाऱ्यासही उभा राहूं नको." बापाचें हें बोलणें ऐकून यवक्रीत म्हणालाः—'तुम्हीं याबद्दल काळजी करूं नका; तुम्हांइतकेंच मी रैभ्यांसही पूज्य मानीत आहें.'

यवक्रीतानें जरी आपल्या पित्यास वरील प्रकारें वचन दिलें, तरी **त्याचा मूळचा मत्सर वरप्रदानामुळें गर्वांतच नव्हे तर कामविकारांतही परिणत झाला!** ब्राह्मण, ऋषि, मुनि, तपस्वी यांचा उपमर्द करीत फिरत असतां यवक्रीत रैभ्याचे आश्रमानजीक आला. तेथें त्याची सून—म्हणजे परावसूची पत्नी—त्याचे दृष्टीस पडली. तिचें तारुण्य व लावण्य पाहून यवक्रीतास भान राहिलें नाहीं. 'माझे मनोरथ पूर्ण कर' असें त्यानें तिला स्पष्टपणें व निर्लज्जपणें म्हटलें. एकीकडे यवक्रीताचा स्वभाव व

दुसरीकडे रैभ्यांची तेजस्विता हीं मनांत येऊन व यवक्रीत शाप देईल कीं काय, अशी भीति पडून ती अतिशय गोंधळली. आणि घाबरून ' होय ' असें उत्तर देऊन ती एकांतस्थळीं गेली. इतक्यांत रैभ्य तेथें आले असतां आपली सून रडत बसली आहे, असें त्यांचे दृष्टीस पडलें. परावसूच्या भार्येनें सर्व हकीकत आपल्या सासऱ्यास सांगितली. यवक्रीताच्या उन्मत्तपणाची ही काहणी ऐकत असतां रैभ्यांचा क्रोधाग्नि भडकत चालला. त्यांनीं आपल्या दोन जटा उपटून काढून त्यांची समंत्रक अग्नींत आहुति देतांच परावसूच्या पत्नीसारखीच दुसरी एक सुंदर स्त्री व एक राक्षस निर्माण झाला; व रैभ्यांनीं यवक्रीताचा वध करण्याची त्या दोघांस आज्ञा केली. त्याप्रमाणें ती यवक्रीताकडे गेलीं; स्त्रीनें त्यास भुलवून त्याचे हातांतील पाण्याचा कमंडलु हिरावून घेतला; व लागलीच राक्षस हातांत शूल घेऊन त्याचे प्राण घेण्यासाठीं त्याचे अंगावर धावला. **पापाचा घडा भरला म्हणजे पुण्यकृत्यामुळें आलेलें सामर्थ्यही निरुपयोगी ठरतें.** या न्यायानें अभिमंत्रित केलेल्या शापोदकानें त्यास भस्म करण्याचें साधन जो कमंडलु, तो त्याचे जवळ न राहिल्यामुळें तो सरोवर व नदी यांकडे धांवत सुटला व राक्षस त्याचे मागें लागला ! पण सरोवर नदी हीं सर्व शुष्क असून तेथें पाण्याचा लवलेशही नाहीं, असें पाहून तो पित्याच्या अग्निशाळेकडे धांवत येऊन आंत शिरण्याचा प्रयत्न करूं लागला. अग्निशाळेचे दारांत पाहरा करण्यास भरद्वाजांनीं एक अंध शूद्र ठेवला होता; त्यानें यवक्रीतास न ओळखतां त्यास भुजांनीं आवळून धरलें व त्यास प्रतिबंध केला. राक्षसानें तावडतोब त्यास तेथें गांठून शूलाचा प्रचंड प्रहार केला. त्या सरशीं यवक्रीत छातीं

फुटून अग्निशाळेचे द्वारांतच गतप्राण होऊन पडला! राक्षसानें परत येऊन रैभ्यांस सर्व वृत्त निवेदन केलें. त्यांनीं संतुष्ट होऊन अग्नींतून निर्माण केलेली स्त्री त्यास अर्पण केली.

कांहीं वेळानें भरद्वाज तेथें आले, तों अग्निशाळेचे दारांत यवक्रीत मरून पडलेला त्यांचे दृष्टीस पडला! आपणास पूर्वीं दुष्ट स्वप्न पडलें होतें, त्याप्रमाणेंच यवक्रीताची रैभ्यांच्या क्रोधाग्नींतच आहुति पडली असावी, असें त्यांनीं तेव्हांच ताडलें. अग्निशाळेचा अंधळा शूद्र द्वारपाल यानेंही सर्व हकीकत त्यांस निवेदन केली. तेव्हां भरद्वाजांस अत्यंत दुःख होऊन ते पुत्राचें प्रेत जवळ घेऊन विलाप करूं लागले! " वेदाध्ययनशून्य ब्राह्मणांवर केवल उपकार करण्यासाठींच तूं तप केलेंस, तूं कोणाचा द्रोहही केला नाहींस; तरी तुला असा मृत्यु यावा ना? रैभ्याश्रमाकडे जाऊं नकोस असें मीं तुला बजावलें असता तूं तिकडे काळानें ओढून नेल्याप्रमाणें गेलास! यवक्रीत हा मज वृद्धाचा एकुलता एकच मुलगा आहे, हें माहीत असूनही रैभ्यानें ज्या अर्थी मजसाठीं सुद्धां आपला क्रोध न आवरतां मला पुत्रशोकाचें दारुण दुःख दिलें आहे, त्या अर्थीं त्याचा ज्येष्ठ पुत्र कांहीं अपराध नसतांही लवकरच त्याचा प्राण घेईल" याप्रमाणें शोक करीत असतां आपल्या जिवलग मित्रास आपण शोकभरांत शाप दिला, याचें त्यांस कांहीं वेळानें फार वाईट वाटूं लागलें. ते म्हणाले:—' जे निपुत्रिक असतात तेच खरोखर सुखी होत. त्यांना संतानशून्यतेचेंच तेवढें दुःख असतें. परंतु त्यांस असह्य पुत्रशोकाचें दुःख तरी भोगावें लागत नाहीं. माझा मुलगा गतप्राण झाला तो झालाच, पण त्या शोकभरांत मी आपल्या जिवलग मित्रासही शाप देऊन

बसलों ! माझ्यासारखा पातकी कोण आहे ? ' याप्रमाणें अनेक प्रकारें शोक करून अखेर भरद्वाजानीं यवक्रीताचें दहन केलें, व त्याचे मागोमाग त्यांनींही चिता-प्रवेश केला !

थोड्याच दिवसांनीं रैभ्यांचा यजमान बृहद्युम्नराजा यानें यज्ञ करण्याचा निश्चय केला; व तत्प्रीत्यर्थ रैभ्यांपासून त्याचे दोनही पुत्र मागून घेतले. रैभ्याश्रमांतून राजधानीस जात असतां वाटेंत एके रात्रीं गर्द अरण्यांत कृष्णाजिन परिधान केलेला एक ऋषि परावसूचे दृष्टीस पडला. हें कोणी रानटी श्वापद आहे, असें वाटून स्वसंरक्षणार्थ परावसूनें त्यास ठार केलें. जवळ जाऊन पाहतां हा आपला पिताच आहे, असें त्यास दिसून आलें ! त्याचें तेथें अरण्यांतच यथाविधि दहन करून परावसु बृहद्युम्नाचे यज्ञमंडपांत आला. त्यानें अर्वावसूस सर्व हकीकत एकांतात सांगितली; व एकट्या परावसूनें यज्ञकर्म चालवावें, व अर्वावसूनें तपोवनात जाऊन तप करून भावाची ब्रह्महत्या व पितृहत्या यांचें पातक दूर करावें, असें परावसूनें सुचविलें; व तें अर्वावसूनेंही मान्य केलें. याप्रमाणें ठरल्यावर परावसु यज्ञ चालवूं लागला, आणि अर्वावसु वनांत जाऊन तपश्चर्या करूं लागला ! भावाची ब्रह्महत्या दूर करून अर्वावसु पुनः यज्ञमंडपांत येऊं लागला, तेव्हां त्या कृतघ्न परावसूनें राजास सांगितलें कीं ' हा अर्वावसु ब्रह्मघातकी व पितृघातकी आहे, त्यास मंडपांत येऊं देऊं नका; येऊं द्याल तर त्याच्या नुसत्या दृष्टीनेंच तुम्हांस पातक लागेल ! ' परावसूचे सांगण्याप्रमाणें राजानें यज्ञमंडपाचे द्वारपालांस आज्ञा करून अर्वावसूस प्रतिबंध केला. " मीं ब्रह्महत्या किंवा पितृहत्या मुळींच केलेली नाहीं; ती माझ्या भावानेंच केली होती.

परंतु मींच तप करून त्याची तिच्या पातकांतून मुक्तता केली आहे " असें तो वरचेवर म्हणूं लागला; पण तिकडे कोणींच लक्ष दिलें नाहीं व दारावरील पाहेरकऱ्यांनीं त्यास अरण्यांत हांकून दिलें. अर्वावसूचा वडील भाऊ इतका दुष्ट व कृतघ्न झाला; तरी त्याच्या अपकराची फेड उपकारानेंच करण्याचा त्यानें निश्चय केला. वनांत जाऊन त्यानें एकनिष्ठेनें कडक सूर्योपासना केली, व सूर्याचा रहस्य-वेद ( सौर ) केला. त्यामुळें संतुष्ट होऊन सूर्यानें व इतर देवांनीं प्रत्यक्ष दर्शन देऊन त्यास वर देऊं केले. तेव्हां अर्वावसूनें असे वर मागितले कीं, ' आमचा पिता, भरद्वाज व यवक्रीत हे पुनः जीवंत व्हावे; माझ्या भावास हत्येचें पातक लागूं नये, पित्या-सही वधाची आठवण राहूं नये; आणि मीं केलेला सौरवेद लोकांत मान्य व प्रतिष्ठित व्हावा. ' सूर्यानें व इतर देवांनीं त्यास हे सर्व वर दिले व त्याप्रमाणें वरील सर्व ऋषि पुनः जिवंत झाले ! यवक्रीत देवांस म्हणाला:–' मलाही रैभ्याप्रमाणेंच वेद येत आहेत, व त्याच्या प्रमाणेंच मीं तपाचरण व व्रताचरण केलें आहे. असें असतां त्यानें असें कोणतें श्रेष्ठ पुण्य केलें कीं, त्यामुळें त्यास माझा वध करतां आला ? ' देवांनीं उत्तर दिलें कीं, ' गुरूजवळ अध्ययन न करतां केवळ वरप्रसादानें तुला सहज वेद लाभले परंतु रैभ्यानीं अनेक प्रकारें खडतर गुरुसेवा करून त्यास प्रसन्न करून घेऊन स्वकर्माचे बलावर पुष्कळ दिवस वेदाध्ययन केलेलें आहे; म्हणून त्याची योग्यता व पुण्य तुजहून श्रेष्ठ आहे. यवक्रीत व परावसु हे दोघे पुत्र गर्विष्ठ व कृतघ्न निघाल्यामुळें जरी भरद्वाज व रैभ्यकुलावर दारुण प्रसंग आला होता, तरी अर्वावसूसारखा सात्विक, एकनिष्ठ आणि धर्मात्मा पुत्र

असल्यामुळें त्या दोनही कुलांची त्यांतून मुक्तता झाली ! ( वन० अ० १३५–१३८ )

## निवातकवच-वध.





इंद्रलोकीं अर्जुनाचा वास होऊन त्यास इंद्राकडून पंधरा प्रकारचीं दिव्य अस्त्रें व पांच प्रकारच्या अस्त्रविद्या प्राप्त झाल्या. तेव्हां इंद्रानें अर्जुनापाशीं अशी गुरुदक्षिणा मागितली कीं, ' समुद्राच्या पोटांतील दुर्गम प्रदेशांत निवातकवच नामक ३ कोटी दैत्य राहत असून ते माझे शत्रु आहेत. त्यांचा तेवढा तूं संहार कर व मग मृत्युलोकीं जा. ' इंद्राची ही आज्ञा शिरसावंद्य मानून, इंद्रानें ज्या रथांत बसून बली, शंबर, नमुची, वृत्र वगैरे दैत्याधिपतींचा पराजय केला होता, त्यांत अर्जुन मातलीसारथ्यासह बसला; त्यानें गांडीव धनुष्यास अक्षय्य अशी प्रत्यंचा लावली व अंगावर अभेद्य पण सुंदर व मऊ असें कवच चढविलें. सर्व देवांनीं तेथें जमून अर्जुनास जलापासून उत्पन्न झालेला देवदत्त शंख दिला, व त्यांचे आशीर्वाद होत असतांनाच हा रथ चालूं लागला. हा इंद्राचा रथ समुद्राजवळ येतांच मातलीनें सपाट असें समुद्रतीर पाहून तेथें नेऊन तो उभा केला. तेव्हां फेंसाळ, एकमेकांत मिसळून उडणाऱ्या, पसरलेल्या, विस्तीर्ण व पर्वतप्राय लाटा उसळत असलेला व भयंकर वादळ चालू असलेला समुद्र अर्जुनाचे दृष्टीस पडला. त्या समुद्रावर रत्नांनीं भरलेल्या अनेक

दैत्यनौकाही इतस्ततः फिरत होत्या. समुद्रांतील हें सुवर्णनगर पूर्वी इंद्राचेंच होतें. पण तेथून दैत्यांनीं देवास हांकून दिलें; व देवांकडून आपला येथें पराभव होऊं नये, असा त्यांनीं ब्रह्मदेवापासून वरही मिळविला. अर्जुनाच्या रथाचा व शंखाचा ध्वनि ऐकतांच निवातकवच दैत्यांनीं आपल्या दुर्गम नगराच्या वेशी बंद केल्या; आणि आपलीं भेसूर आवाजाचीं अनेक वाद्यें वाजवीत हातांत अनेक शस्त्रें घेऊन ते अर्जुनावर चाल करून आले. त्यांनीं लवकरच अर्जुनाचा रथ सर्व बाजूंनीं वेढून त्याजवर एकदम शस्त्रास्त्रवृष्टि सुरू केली. पण अर्जुनानें त्यांचीं हीं सर्व शस्त्रें तोडून फोडून उडवून दिलीं; एवढेंच नव्हे तर त्यानें ब्रह्मास्त्र व माघवास्त्र यांनीं अभिमंत्रित केलेले हजारों बाण सोडून हजारों निवातकवच दैत्यांचा संहार केला. नंतर सरळ व उघड केलेल्या युद्धांत अर्जुनापुढें आपलें कांहीं चालत नाहीं, असें पाहून ते दैत्य मायायुद्ध करूं लागले. स्वतः आकाशांत किंवा भूमीमध्यें अदृश्य राहून ते पाषाण, मुसळधार पाऊस, अग्नि, वायु वगैरेंची अर्जुनाचे रथावर मायामय वृष्टि करूं लागले. तेव्हां अर्जुनानेंही अनुक्रमें महेंद्रास्त्र, विशोषण, सलिलास्त्र, शैलास्त्र वगैरे सोडून ती नाहींशीं केली. अखेर दैत्यांनीं मायामय असा गर्द अंधःकार उत्पन्न करून अर्जुनावर पर्वतांची वृष्टि सुरू केली. तेव्हां अर्जुनानेंही उलट दिव्य अस्त्रांचा उपयोग करून तो अंधःकार नाहींसा केला; व वज्रास्त्र सोडून सर्व पर्वत चूर्ण केले, एवढेंच नव्हे तर गुप्त झालेल्या बहुतेक सर्व दैत्यांचा संहार केला. राहिलेले थोडे दैत्य भयभीत होऊन नगरांत शिरले, त्यांचे पाठोपाठ अर्जुनाचा रथही त्या दैत्य—नगरांत घुसला. दैत्यांचा हा भयंकर संहार व अर्जुनाच्या रथाचा भयंकर ध्वनि ऐकून दैत्य-

स्त्रिया दुःखानें आक्रोश करीत व भयभीत होऊन आपापल्या सुवर्णमंदिरांत लपून बसल्या. याप्रमाणें निवातकवच दैत्यांचा संहार करून अर्जुन परत देवलोकाकडे येत असतां वाटेंत एक अत्यंत देदीप्यमान व प्रचंड असें ' हिरण्यपुर ' नामक दैत्यनगर लागलें. पुलोमा व कालका नांवाच्या दैत्यस्त्रियांनीं हजार वर्षें उग्र-तपश्चर्या करून ब्रह्मदेवापासून असा वर संपादिला होता कीं, आपल्या पुत्रांस कसेंलही दुःख होऊं नये; त्यांचा देव, राक्षस किंवा दैत्य यांजकडून वध होऊंनये; व त्यांस एक अतितेजस्वी असें नगर असावें.' ब्रह्मदेवाच्या या वराप्रमाणें हें नगर प्राप्त झाल्यावर त्या दैत्य-स्त्रियांचे पुत्र पौलोम व कालकेय हे तेथें निर्भयपणें राहूं लागले. देव-द्रेष्ट्या दैत्यांचें हें नगर पाहतांच त्याचाही विध्वंस करून देवराज इंद्राचें कार्य- त्यानें सांगितलें नसलें तरी—करावें, असें अर्जुनाचे मनांत आलें; व त्याचे सांगण्यावरून मातलीनें तो रथ त्या नगराजवळ नेऊन उभा केला. दैत्यांचें हें नगर क्षणांत आकाशांत, क्षणांत भूमीवर, तर क्षणांत पाण्यावर संचार करीत असे; तसेंच तें क्षणांत दृश्य व अदृश्यही होई ! अशा नगराचा आश्रय करून हे पौलोम व कालकेय दैत्य अर्जुनाशीं अस्त्रयुद्ध व मायायुद्ध करूं लागले. त्यांस पराभूत करण्यासाठीं अर्जुनानें पराक्रमाची शिकस्त केली, पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. दैत्यांची विशेष सरशी होत आहे असें पाहून अर्जुनानें अखेरचें निर्वाणीचें श्रीशंकराचें रौद्रास्त्र अभिमंत्रून सोडलें. तों दाही दिशांस लक्षावधि सशस्त्र रुद्रगण उत्पन्न होऊन ते दैत्यांचा विध्वस करूं लागले. त्या अस्त्रापासून रुद्रगणांशिवाय हजारों लोखंडी बाण निघाले. त्यांचे योगानें ते सर्व दैत्य ठार होऊन त्यांचे तें स्वैरसंचारी हिरण्य-

नगरही विद्ध होऊन भूमीवर पडलें. याप्रमाणें निवातकवच, पौलोम व कालकेय दैत्यांचा आणि त्यांच्या नगरांचा विध्वंस करून विजयी अर्जुन परत आल्याचें पाहतांच इंद्रास अत्यंत आनंद झाला. अर्जुनाच्या अंगावरील जखमा बऱ्या होईपर्यंत इंद्रानें त्यास तेथेंच ठेवून घेतलें; आणि शेवटीं दिव्य व अभेद्य कवच, सुवर्णमाला, देवदत्त शंख व किरीट हीं देऊन त्यास प्रेमानें निरोप दिला. ( वनपर्व अ० १६९–१७४ )

## वैवस्वतमनु–चरित्र.



महर्षि मनु हे विवस्वानाचे पुत्र असून ओज, तेज, कांति विशेषतः तप-या गोष्टींत ते आपल्या पितामहाहूनही श्रेष्ठ होते. एका पायावर उभे राहून, हात वर व मान खालीं करून आणि डोळे न मिटतां त्यांनीं हजारों वर्षें घोर व तीव्र तप केलें. चीरिणी नदीचे तीरीं एके समयीं ते ओल्या वस्त्रानें तप करीत असतां एक लहान मत्स्य त्यांजकडे येऊन म्हणाला:—‘ मोठ्या माशांनीं लहान माशांस खावें, अशी आमची रीत आहे. तर मोठ्या माशांपासून माझे प्राण वांचवा. मी तुमच्या ह्या उपकाराची फेड केव्हां तरी करीन. ’ मत्स्याचें हें दीन भाषण ऐकून मनूंस दया आली; व त्यांनीं त्यास तेथून काढून पाण्यानें भरलेल्या रांजणांत सोडून दिलें. मनूंनीं तेथें त्याचें बराच काळ पुत्रवत् परिपालन केल्यावर तो इतका मोठा झाला कीं त्यास तो रांजण पुरेना; तेव्हां त्यानीं त्यास एका मोठ्या विहिरींत आणून सोडलें. याप्रमाणें वाढत

असतां त्यास विहिरींतून गंगेंत व गंगेंतून समुद्रांत नेऊन सोडणें मनु महर्षींस भाग पडलें. मत्स्य इतका मोठा झाला होता तरी मनूनीं पाण्यांतून काढतांच तो त्यांस नेतां येईल इतका हलका होत असे! मत्स्यास समुद्रांत टाकल्यावर तो त्यांस म्हणालाः—' लवकरच सर्व पृथ्वीवर महाजलप्रलय होणार आहे, त्या वेळीं जमिनीवर कोणताही प्राणी जीवंत राहणार नाहीं याकरतां तुम्हीं, एक मजबूत नाव तयार करून तिला एक बळकट दोरी बांधा. जलप्रलय होऊं लागतांच सप्तर्षींसह तुम्ही त्या नावेंत बसा; बरोबर निरनिराळ्या धान्यांचीं बीजेंही घ्या. आणि माझें स्मरण करा, म्हणजे मी तुमचे साहाय्यास येईन. मला एक शिंग असलेलें तुम्हांस दिसेल, त्यावरून तुम्हीं मला ओळखा. " याप्रमाणें सांगून मत्स्य निघून गेला. कांहीं कालानें जलप्रलयास प्रारंभ होतांच मनूंनीं मत्स्यानें सांगितल्याप्रमाणें बीजांसह नावेंत बसून मत्स्याचें स्मरण केलें; तोंच तो प्रचंड मत्स्य तेथें आला. नावेवरील दोरीचा फांस मनूंनीं मत्स्याचे शृंगांत अडकवून दिल्यावर मत्स्य वेगानें ती नांव ओढीत झपाट्यानें समुद्रांतून चालला. जलप्रलय वाढत जाऊन अखेर सर्व पृथ्वी पाण्यांत बुडून वर आकाश व खालीं पाणी याखेरीज कांहींच दिसेनासें झालें, व दिशाही कळेनाशा झाल्या! याप्रमाणें अनेक वर्षें ही नाव समुद्रांत ओढून नेल्यावर मत्स्य तीसह हिमालय पर्वताचे एका शिखराकडे आला. ऋषींनीं त्याचे सांगण्यावरून त्या शिखरासच नांव बांधून खुंटविली. तेव्हांपासून त्या शिखरास ' नौबंधन ' असें नांव पडलें. नांव खुंटविल्यावर मत्स्य त्यांस म्हणालाः—' मी ब्रह्मदेव असून मींच मत्स्यरूपानें मनूचें व सप्तर्षींचें प्रलयांतून संरक्षण केलें आहे. मनूनें आतां येथें

राहून आपल्या तपःसामर्थ्यानें नवीन प्रजा वगैरे निर्माण करावी.' असें सांगून मत्स्य गुप्त झाला. ब्रह्मदेवाचे आज्ञेप्रमाणें हिमालयाच्या शिखरावर राहून मनूंनीं तप केलें व निरनिराळ्या प्रजा व लोक निर्माण केले. ( वन० अ० १८७ )

## परिक्षित व वामदेव.



क्ष्वाकु वंशांतील परिक्षित राजा अयोध्येमध्यें राज्य करीत होता. घोड्यावर बसून मृगया करीत असतां मृगाचा पाठलाग करीत तो बराच दूर गेला. मृगयेच्या श्रमानें व तहान-भुकेनें व्याकुळ होऊन तो निबिड अरण्यांत हिंडत असतां त्यास एक रमणीय सरोवर दिसलें. त्यांत स्नान वगैरे करून व पाणी पिऊन राजा व त्याचा घोडा हे ताजेतवाने झाले. घोड्यापुढें कमलांचे कोवळे देंठ टाकून राजा सरोवराचे तीरीं विश्रांति घेत बसला असतां अत्यंत मधुर असा गीतध्वनि त्याचे कानीं आला. कांहीं वेळ इकडे तिकडे पाहिल्यावर एक अत्यंत सुस्वरूप कन्या गाणें गात गात फुलें वेंचीत आहे, असें त्याचे दृष्टीस पडलें. फुलें वेंचीत वेंचीत तीराजवळ आल्यावर उभयतां यांचें बोलणें होऊन, आपली भार्या होण्याविषयीं अखेर त्यानें तिला विनंति केली; ती तिनें मान्य केली. परंतु ' आपणास केव्हांही कोणीही पाण्याचें दर्शनसुद्धां करतां उपयोगी नाहीं. ' एवढी एकच अट तिनें घातली. राजानें ती शर्त मान्य करतांच उभयतांचा गांधर्व विधीनें विवाह झाला; राजाचा शोध करीत त्याचें सैन्यही कांहीं वेळानें तेथें आलें. कन्येला झांकलेल्या पालखींत बसवून तिजसह राजा राजधानीस

परत आला. तिचें अंतःपुर वगैरे वेगळें करवून तेथें राजानें अत्यंत कडक बंदोबस्त केला. ह्या बंदोबस्ताचें गूढ लोकांस व प्रधान-अमात्यांस बरेच दिवस उकलतां आलें नाहीं. राजाचे राणीस पाण्याचें दर्शनही घ्यावयाचें नाहीं व त्या करतां हा सर्व बंदोबस्त आहे, असें पुढें तिच्या दासीकडून मुख्य अमात्यास कळलें. त्यानें एक उत्तम उपवन तयार करून तेथील वृक्ष-वेलींस पाणी पुरविण्यासाठीं एक मोठी विहीरही बांधली, आणि ती सर्व बाजूंनीं चुन्या दगडांनीं पक्की बांधून काढून तिचें तोंडही दाट अतिमुक्त लतांनीं अगदीं झांकून टाकलें. प्रधान-अमात्याचे विनंतीवरून त्यानंतर राणीसह राजा ह्याच उपवनांत राहूं लागला. एके समयीं तृषार्त होऊन राजा एकटाच ह्या लताकुंजांत आला; व त्या विहिरीचें अमृत-तुल्य पाणी प्याला. **पत्नीशीं केलेल्या करारांचें दुर्दैववशात् विस्मरण होऊन** राजानें तिला विहिरींत उतरून तें सुधातुल्य-उदक प्राशन करण्यास सांगितलें. राजाच्या आज्ञेप्रमाणें राणी जी विहिरींत उतरली ती पुनः वरच आली नाहीं! बराच वेळ वाट पाहून राजा विहिरींत जाऊन पाहूं लागला तों त्यास तेथें राणी कोठेंच दिसली नाहीं! राजानें त्या विहिरीचें सर्व पाणी उपसविलें, तरी तिचा कोठेंही थांग लागेना. विहिरीच्या तळाशीं एका बिळांत मात्र त्यास एक मोठा बेडूक दिसला! यानेंच आपली बायको खाल्ली असावी, असें दुःखावेगाचे भरांत वाटून त्यानें त्या बेडकास ठार केलें, एवढेंच नव्हे तर राज्यांत बेडूक जेथें जेथें सांपडेल तेथें तेथें तो प्रत्येकानें ठार मारावा, अशीही त्यानें सर्वांस आज्ञा केली! यामुळें अयोध्येचे राज्यांत मंडूक--कुलांचा सर्वत्र संहार होऊं लागला! आपल्या ज्ञातीचे रक्षणार्थ मंडुकराजा तापस वेषानें राजा-

कडे आला; व निरपराधी मंडूकांचा वध थांबविण्याविषयीं त्याची विनवणी करूं लागला. ' माझी पत्नी बेडकांनीं खाऊन टाकली आहे, तेव्हां त्या सर्वांचा मी नाश करणार ' असें राजानें त्यास उत्तर दिलें. तेव्हां तो तापसी म्हणालाः—"मी आयुनामक मंडूक-राजा असून तुमची राणी ती माझी सुशोभना नांवाची मुलगी आहे. तिचा स्वभाव फार दुष्ट असून तुम्हांप्रमाणें तिनें आजपर्यंत अनेक राजांस फसविलें आहे." मंडूकराजाचें हें भाषण ऐकूनही, कामोपभोगामुळें तिजवर जडलेली त्याची तामसी प्रीति कमी झाली नाहीं. त्यानें पुनः त्याजजवळ तिलाच मागणी घातली. मंडूकराजानें ती कन्या पुनः राजास दिली; आणि तिला बजावलें कीं, ' या राजाशीं इतःपर तरी एकनिष्ठेनें वाग. तथापि आजपर्यंत ज्या अर्थीं तूं अनेक राजांस फसविलें आहेस, त्या अर्थीं **ह्या असत्याचरणाचें प्रायश्चित्त म्हणून ह्या राजापासून होणारी तुझी संतति अब्रह्मण्य ( ब्रह्मद्वेष्टी ) निपजेल.** सत्याची किंवा ब्राह्मण्याची अथवा पवित्रतेची किंमत परिक्षितराजास केवळ रति-सुखापुढें तुच्छ वाटत असल्यामुळें ह्या शापाकडे त्याचें लक्ष गेलें-नाहीं. उलट आपली स्त्री आपणास पुनः लाभली याचाच त्यास फार आनंद झाला !

पुढें परिक्षितराजास सुशोभनेचे पोटीं तीन पुत्र झाले; त्यांचीं नांवें शल, दल व बल अशीं होतीं. ज्येष्ठ राजपुत्र शल यास सिंहासनावर बसवून परिक्षितराजा तपोवनांत गेल्यानंतर एके दिवशीं शलराजा रथांत बसून मृगयेस गेला. एका मृगाचे मागें रथ लावला असतां मृग कांहीं केल्या राजाचे आटोक्यांत येईना. तेव्हां रथ मृगाचे पाठोपाट जलदीनें हांकून लगट करण्याची त्यानें सार-

थ्यास आज्ञा केली. तेव्हां सारथि म्हणालाः—‘ हा मृग फार चपल आहे; तो आपल्या आटोक्यांत येणार नाहीं. तुमच्या रथास ‘ वामी ’ जरी जोडल्या तरी या मृगाचा पाठपुरावा होणार नाहीं.’ हें ऐकून ‘ वामी ’ म्हणजे काय तें सांग, नाहीं तर तुझा वध करीन ’ अशी राजानें क्रुद्ध होऊन त्यास धमकी घातली. ऋषीच्या शापाची भीति राजाच्या धमकीपेक्षां सारथ्यास आरंभीं जास्त वाटल्यामुळें तो कांहींच बोलला नाहीं. पण राजा तरवारच उपसून त्याचे अंगावर आला तेव्हां त्यानें प्राणरक्षणार्थ, ‘ वामी ’ म्हणजे ‘ वामदेवऋषीच्या घोड्या ’ होत, असें सांगितलें. हें ऐकून राजानें आपला रथ वामदेवाश्रमाकडे नेला; आणि ऋषींचें दर्शन घेऊन त्यांस विनंति केली कीं, ‘ माझे बाणानें जखमी झालेला मृग पळून जात आहे; त्यास गांठण्यासाठीं तुमच्या घोड्या तेवढ्या मला द्या. ’ वामदेवानीं घोड्या त्याचे स्वाधीन करून, काम झाल्या-बरोबर त्या परत आणून दे, असें त्यास बजावलें. राजा ‘ होय ’ म्हणून घोड्या रथास जोडून घेऊन गेला. मृगाचा पाठलाग करून व त्यास ठार मारून घोड्या परत न करतांच शलराजा अयोध्येस निघून गेला ! नवीन राजपुत्राचे जन्मोत्सवाचे आनंदांत मग्न असल्या-मुळें घोड्या परत करण्याचें राजास विस्मरण झालें असेल, असें वाटून वामदेवानीं एक महिनाभर वाट पाहिली; तरी राजानें घोड्या परत केल्या नाहींत. तेव्हां त्यानीं राजाकडे आपला शिष्य पाठवून घोड्या परत मागितल्या. परंतु ह्या कृतघ्न व दुष्टबुद्धि राजानें घोड्या परत दिल्या नाहींत; एवढेंच नव्हे तर उलट वाम-देवांस व त्या शिष्यास धिःकारून तो म्हणालाः—“ हें वाहन राजांचें आहे; अशा प्रकारच्या रत्नांचा उपभोग घेण्यास ब्राह्मण

अपात्र आहेत. ब्राह्मणांना असले अश्व घेऊन काय करावयाचें आहे? बऱ्या बोलानें आलां तसे निघून जा." राजाचें हें बोलणें शिष्यानें आपल्या गुरूस येऊन सांगितलें. **सिंहासनावर बसलेल्या व प्रजांचें वात्सल्यपूर्वक पालन करूं पाहणाऱ्या राजाचा हा अधमपणा** पाहून वामदेवांस अतिशय संताप आला. त्यांनीं स्वतः राजाकडे जाऊन सामोपचारानें आपल्या घोड्या परत मागितल्या. तरी त्या परत करण्यास शलराजा राजी होईना. 'ब्राह्मणांना असले पशु काय करावयाचे आहेत? त्यांना मृगया विहित नाहीं. पशु हवेच असतील तर इतर अश्व, बैल, गाढवें, व उंट आहेत; त्यांवर त्यांनीं आपलें काम भागवून घ्यावें' वगैरे तो बोलूं लागला. **राजानें असलें निंद्य अधर्माचरण करून आपले प्राण धोक्यांत घालूं नयेत.** असेंही वामदेवानीं सांगून पाहिलें; पण राजा आपला हट्ट सोडीना. तेव्हां वामदेवानीं आपल्या तपोबलानें चार शूलधारी राक्षस निर्माण केले; व त्यांनीं शलराजावर शूलांचे एकसारखे प्रहार करून त्याचा भर राजसभेंत प्राण घेतला! शलाचे मागून इक्ष्वाकूंनीं दलास राज्याभिषेक केला; तेव्हां त्याजकडेही जाऊन वामदेवानीं पुनः आपल्या घोड्या परत मागितल्या. तेव्हां दलराजानें विषांत बुडविलेला एक बाण हातीं घेऊन वामदेवांचे अंगावर सोडला. तेव्हां वामदेवानीं, 'तुझा दहा वर्षांचा श्येनजित् राजपुत्र आहे तोच या बाणानें गतप्राण होवो' असें म्हणतांच अंतःपुरांत या राजपुत्रानें प्राण सोडले! येवढ्यानेंही शुद्धीवर न येतां दलराजानें दुसरा विषारी बाण हातीं घेतला. परंतु 'हा बाण धनुष्यास लावून मजवर टाकण्याची तुझे हातीं शक्तिच राहिलेली नाहीं' असें वामदेवानीं

म्हणतांच राजाची तशीच स्थिति झाली ! पण **दुष्ट ब्रह्मद्वेष्ट्याचा पुरता सूड उगविण्याची संधी आली असतांही वामदेवांनीं आपलें ब्राह्मण्य स्मरून उलट त्याजवर उपकारच केला.** हातीं घेतलेल्या बाणानें राणीचे अंगास स्पर्श करशील तर तुझा सर्व दोष दूर होईल, असें वामदेवानीं त्यास सांगितलें. राजानेंही मुकाट्यानें त्याप्रमाणें केलें. राजाच्या **दुष्ट कर्मापासून अलिप्त राहून सद्धर्मानें वागणाऱ्या राणीसही त्यांनीं आशीर्वाद देऊन कृतार्थ केलें.** माझ्या पतीस ब्रह्मद्वेषाचें पातक लागूं नये, व आमच्या कुलावर कृपादृष्टि असावी, असे दोन वरही तिनें वामदेवांपासून मिळविले; याप्रमाणें विलासी **परिक्षित व पापी सुशोभिनी यांजपासून उत्पन्न झालेल्या आपल्या ब्रह्मद्वेष्ट्या पतीचाही राणीनें आपल्या सत्कर्मानें उद्धार केला.** नंतर दलराजानेंही संतुष्ट होऊन वामदेवांच्या घोड्या त्यांस परत दिल्या. ( वनपर्व, अध्याय १९२ )

## धुंधुमार-कुवलाश्व.



सूर्य वंशांतील इक्ष्वाकुराजा वनांत तपश्चर्येस निघून गेल्यानंतर त्याचे मागून शशाद हा सिंहासनावर बसला. त्याचे पश्चात् क्रमानें ककुत्स्थ, अनेन, पृथु, विश्वगश्व, अद्रि, युवनाश्व, श्राव, श्रावस्तक, ( यानें श्रावस्ती नगरी वसविली ) बृहदश्व व कुवलाश्व असे अयोध्येचे राजे झाले. कुवलाश्वाचे एकवीस हजार पराक्रमी राजपुत्र असून तो सर्व प्रका-

रच्या राजगुणांनीं पित्याहूनही श्रेष्ठ होता. योग्य काळीं पुत्रास राज्यावर बसवून बृहदश्व हा तपोवनांत जाण्यास निघाला. हें वृत्त ऐकून उत्तंकऋषींनीं त्याजकडे येऊन, इतक्यांतच तपोवनांत न जाण्याबद्दल त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. तो म्हणाला:— " माझा आश्रम सपाट अशा मरुप्रदेशां- ( मारवडां ) त आहे; त्याचे जवळच उज्जालक नांवाचा वालुकामय विस्तीर्ण समुद्र आहे. त्या ठिकाणीं मधुकैटभ दैत्याचा धुंधुनामक पुत्र वालुकामय भूमीचे खालीं राहून वारंवार लोकांचा संहार करीत असतो. देव, दैत्य, नाग, यक्ष, गंधर्व यांपैकीं कोणाचेही हातून आपला वध होऊं नये, असा वर घोर तपश्चर्या करून त्यानें ब्रह्मदेवापासून संपादिला आहे; व त्याचे योगानें त्रैलोक्याचा विध्वंस करण्यास तो प्रवृत्त झाला आहे. जेव्हां जेव्हां वाळूंत लपलेल्या ह्या दैत्याचे भयंकर निःश्वास वर्षाचे अखेरीस सुरू होतात, तेव्हां तेव्हां ह्या निःश्वासाच्या वायूचे योगानें वर धुळीचे लोट उठून सूर्यमंडळ व्यापून टाकतात; व त्या योगें सात सात दिवसपर्यंत भूकंप होऊन दैत्याचे मुखांतून धूर, ज्वाळा व निखारे बाहेर पडतात. धुंधु दैत्याच्या ह्या दारुण कर्मांमुळें सर्व लोक उद्विग्न व भयभीत झाले असून माझ्यासारख्या ऋषींस निर्वेधपणें तपही होईनासें झालें आहे. याकरतां ह्या भयानक दैत्याचा नायनाट केल्यावांचून तूं वनांत जाऊं नको **प्रजेचें पालन करून त्यांची सर्व विपत्तींतून मुक्तता करणें हा राजांचा मुख्य व श्रेष्ठ धर्म आहे. या धर्माचरणानें त्यांस जितकें पुण्य लाभेल तितकें अरण्यांत जाऊन तपश्चर्या केल्यानेंही मिळणार नाहीं.** "
उत्तंकऋषींचें हें भाषण ऐकून बृहदश्वराजा म्हणाला:—' तुम्ही मजकडे येऊन ही जी आज्ञा केली आहे ती निष्फळ होणार नाहीं.

पण तपाचरणासाठीं मीं सांप्रत शस्त्र खालीं ठेवलें आहे, तें पुन: मला हातीं घेतां येत नाहीं. माझा पुत्र कुवलाश्व हा धैर्यशाली व शूर असून तो व त्याचे २१ हजार पराक्रमी पुत्र मिळून धुंधु दैत्याचा वध करून तुमचे मनोरथ पूर्ण करतील.' राजाचें हें अभिवचन ऐकून उत्तंकानें त्यास तपोवनांत जाण्याची अनुज्ञा दिली; आणि बृहदश्वही पुत्राकडे धुंधुवधाचें महत्कार्य सोंपवून अरण्यांत निघून गेला.

कांहीं काळ लोटल्यावर मरुप्रदेशाचे भूमींत लपलेल्या ह्या दैत्याचे नि:श्वास जेव्हां पुन: सुरू झाले, तेव्हां कुवलाश्व बरोबर आपले २१ हजार राजपुत्र घेऊन त्या दैत्यवर चाल करून गेला. **लोकहितार्थ दैत्यनाश करण्यासाठीं निघालेल्या या राजाचे शरीरांत उत्तंकऋषींनीं आपलें योगबल व प्रत्यक्ष श्रीविष्णूनीं आपलें तेज व सामर्थ्य घातलें.** उज्जालक नांवाच्या वालुकामय विस्तीर्ण अरण्यांत पोंचल्यावर सर्वांनीं तेथें खणण्यास सुरवात केली. याप्रमाणें सहा दिवस वालुकाभूमि खणल्यावर सातवे दिवशीं त्यांस धुंधु दैत्याचें अत्यंत दैदीप्यमान व अग्नितुल्य शरीर दिसलें. त्यास वेढून त्यांनीं त्याजवर पुष्कळ शस्त्रवर्षाव केला; परंतु तीं सर्व शस्त्रें त्यानें गिळून टाकलीं. कुंभकर्णाप्रमाणें जागृत व क्रुद्ध होऊन गेल्यामुळें धुंधु दैत्याचे मुखांतून आगीचे लोळ व निखारे बाहेर पडूं लागले; ह्या अग्निवृष्टीमुळें कुवलाश्व व त्याचे तीन पुत्र खेरीज करून इतर सर्व राजपुत्र—कपिल मुनींच्या तेजानें जसे ६० हजार सगरपुत्र तसे—भस्म होऊन गेले; प्रत्यक्ष कुवलाश्व व दैत्य हे एकमेकांस भिडले तेव्हां दैत्याचें तेज त्याचे शरीरांतून पाण्याचे रूपानें वाहूं लागलें. तें आपल्या योग-

बलानें प्राशन करून टाकून कुबलाश्वराजानें त्याचे तोंडांतून निघालेला अग्निही निस्तेज व शांत करून टाकला; आणि ब्रह्मास्त्र सोडून त्या भयानक असुरासही त्यानें जाळून टाकलें! धुंधु दैत्याचा याप्रमाणें त्रैलोक्यहितार्थ नाश केल्याकारणानें त्यास धुंधुमार ही संज्ञा व पदवी प्राप्त झाली. सर्व लोकांनीं त्याचा जयजयकार केला; ऋषीमुनींनीं आशीर्वाद दिले; व देवांनीं वर देऊं केले. तेव्हां इतर कोणताही वर न मागत कुबलाश्वराजा म्हणाला:—' ब्राह्मणांस माझे हातून दान व्हावें, शत्रूंस मीं अजिंक्य असावें, तसेंच श्रीविष्णूशीं सख्य, प्राणिमात्रांचा अद्रोह, धर्माची आवड व अक्षय्य स्वर्गवास यांचा मला लाभ व्हावा देवांनीं त्यास हा वर दिल्यावर धुंधुवध पाहण्यास जमलेले सर्वजण आपापल्या स्थानीं निघून गेले. कुबलाश्वाचे जे तीन पुत्र राहिले त्यांचीं नांवें दृढाश्व, कपिलाश्व, व चंद्राश्व अशीं होतीं. पुढें इक्ष्वाकूचा वंश या राजांच्या संततीमुळेंच चालू राहिला. लोकहितार्थ आपल्या २१ हजार पुत्रांपैकीं तीन खेरीज इतर सर्वांचे प्राण अर्पण करून धुंधराक्षसाचा नाश केल्यामुळें प्राप्त होणारें पुण्य व समाधान आणि त्यांचेंच अखेरचें फळ जें स्वर्गसुख यांचा कुबलाश्व राजास मरणोत्तर लाभ झाला. ( वनपर्व अध्याय २००–२०३ )*

* या कथेचें मर्म काय आहे ? मरुभूमींतील हा धुंधुराक्षस म्हणजे ज्वालामुखीच कसा ? याचें सविस्तर विवेचन चित्रमयजगताच्या फेब्रुआरीचे ( सन १९१३ ) अंकांत केलें आहे, तें जिज्ञासूंनीं पाहावें.

# कार्तिकेय-चरित्र.

—:०:—



पूर्वयुगीं देव व दैत्य हे परस्परांपासून स्वतंत्र राहून एकमेकांशीं युद्ध करूं लागले. या युद्धांत बहुधां दैत्यांचाच जय होऊन देव पराभूत होत. देवसेनेचें संरक्षण करून देवांस विजय प्राप्त करून देईल, असा कोणीतरी बलाढ्य पुरुष देवांचा सेनापति झाल्यावांचून त्यांस यश येणार नाहीं। हें जाणून इंद्र अशा पुरुषाचा शोध करीत मानस पर्वतावर आला. त्याचा हा विचार चालू आहे तोंच, 'कोणी तरी पुरुषानें येऊन माझें रक्षण करावें। व मला माझा पति द्यावा' अशा प्रकारचा एका स्त्रीचा दुःखाचा मोठा आक्रोश त्याचे कानीं आला. 'भिऊं नको' असें मोठ्यानें अश्वासन देऊन इंद्र त्या स्त्रीकडे जाऊन पाहतो, तों तेथें त्यास केशीनामक महादैत्य दिसला. त्याचें शरीर तांबूस रंगाचें व धिप्पाड असून त्याचे मस्तकावर किरीट व हातांत गदा होती; व तो त्या कन्येला बलात्कारानें हरण करून नेत होता. इंद्रानें तेथें जाऊन कन्येचा हात धरतांच केशीनें त्यावर गदा फेंकली;पण इंद्रानें वज्रानें तिचे तुकडे तुकडे केले. यानंतर केशीनें त्याजवर पर्वतशिखर फेंकलें, त्याचीही इंद्रवज्रानें तीच वाट लावली. इंद्राच्या ह्या वज्रानें तुटलेल्या पर्वतशिखराचा केशीला तडाखा बसतांच तो त्या कन्येला सोडून पळून गेला. नंतर इंद्रानें विचारल्यावरून त्या कन्येनें त्यास आपलें वृत्त निवेदन केलें. ( वनपर्व अ० २२३ ) ती म्हणाली:—"प्रजापतीच्या आम्ही दोघी कन्या

असून देवसेना व दैत्यसेना हीं आमचीं नांवें आहेत. आपल्या पित्याची आज्ञा घेऊन रोज आम्ही दोघी मानसपर्वतावर क्रीडा करण्यास येत असतां केशी दैत्य रोज तेथें येऊन आम्हांस मोह पाडण्याचा प्रयत्न करी. माझें मन त्याजवर मुळींच बसलें नाहीं; पण शेवटीं दैत्यसेनेचें मन मोहित होऊन ती केशी दैत्याबरोबर निघून गेली. त्यानंतर पुनः केशी दैत्य येऊन माझें बलात्कारानें हरण करीत असतां तुम्हीं माझी मुक्तता केली. माझ्या पित्यानें मला वर दिला असून त्याचे प्रभावानें मला देव-दैत्यांस पूज्य आणि देव-दानव, यक्ष-किन्नर, राक्षस-दैत्य व पन्नग या सर्वांचा किंबहुना सर्व प्राण्यांचा—प्रत्यक्ष तुमचाही—पराजय करणारा असा मला पति मिळणार आहे.' याप्रमाणें भाषण होत आहे तों उदयगिरीवर सूर्य उदयास येत असून त्याच वेळीं चंद्र व अग्नि हे त्याचे मंडळांत प्रवेश करीत आहेत, असें इंद्रानें पाहिलें. ती वर्ष अखेरची अमावास्या असून सूर्यकिरणांमुळें पूर्व दिशा व समुद्राचें पाणीही आरक्तवर्ण झालें होतें, व सूर्य-चंद्रांस खळें पडलें होतें, इतरही अनेक अमंगल अपशकुन होत होते. त्यांवरून देव-दैत्यांचें पुनः लवकरच भयंकर युद्ध होणार असें लक्षांत येऊन इंद्र देवसेनेसह ब्रह्मलोकीं गेला. या कन्येस लवकरच इष्ट वरप्राप्ति होईल व तोच देवाचा सेनापति होईल, असें ब्रह्मदेवानीं तिला व इंद्राला आश्वासन दिलें.

इकडे वसिष्ठादि सप्तर्षींनीं सोमयज्ञाची तयारी केली असतां त्या यज्ञासाठीं अग्नि मौन धारण करून सूर्यमंडळांतून निघून तेथें आला, व यज्ञांत अर्पण केलेलीं सर्व हविर्द्रव्यें त्यानें ज्या त्या देवांस पोंचविलीं. यज्ञकार्य संपवून परत जात असतां त्या सप्तर्षींच्या

भार्या अग्नीस दिसल्या. त्या सोन्याच्या वेदिकेप्रमाणें मनोहर, चंद्रप्रकाशाप्रमाणें निर्मळ, अग्निज्वाळांप्रमाणें तेजस्वी आणि चांदण्यांप्रमाणें चकाकणाऱ्या अशा असून आपापल्या आसनावर झोंप घेत होत्या. त्यांचें तें रूप पाहून अग्नीचें मन क्षुब्ध झालें व तो कामवासनेनें त्रस्त झाला. तेव्हां त्यांचें सदोदित दर्शन व कधींमधीं स्पर्श व्हावा, म्हणून गार्हपत्यामध्यें प्रवेश करून अग्नि चिरकाल सप्तर्षींचे आश्रमांतच राहूं लागला. **परंतु त्या साध्वी व निरिच्छ ऋषिपत्न्यांची त्यास प्राप्ति झाली नाहीं.** त्यामुळें उद्विग्न होऊन देहत्याग करण्याचे उद्देशानें अग्नि वनांत निघून गेला. दक्षकन्या स्वाहा हिचें मन अग्नीवर बरेच दिवस बसलें होतें व ती त्याची एकांतीं गांठ घेण्याचा प्रयत्न करीत होती. ही संधी योग्य आहे असें जाणून तिनें वनांत जाऊन अग्नीची प्राप्ति करून घेण्याचा निश्चय केला. अग्नीचे मनांत कोणाबद्दल वासना उत्पन्न झाली आहे, हें माहीत असल्यामुळें स्वाहादेवीनें सप्तर्षींच्या स्त्रियांचींच रूपें धारण करून वनांत अग्नीकडे जाण्याचें ठरविलें. ( वन० अ० २२४ )

या बेताप्रमाणें स्वाहा प्रथमतः अंगिरामुनींच्या सुशील, गुणवती व सुंदर अशा शिवानामक भार्येचें रूप घेऊन अग्नीकडे गेली; व ती खरी ऋषिपत्नीच आहे, असें वाटून अग्नि मोठ्या प्रेमानें व आनंदानें तिजशीं रममाण झाला. वनांतून आपण याच रूपानें परत गेलों तर खऱ्या ऋषिपत्नीनेंच अग्नीशीं समागम केला, असें वाटून लोक तिजवर विनाकारण व्यभिचाराचा आरोप करतील; असें वाटून स्वाहादेवी तें रूप टाकून गरुडपक्षिणीचें रूप घेऊन तेथून निघून गेली; व तिनें शर नांवाच्या तृणानें भरलेल्या श्वेत

पर्वतावरील एका दुर्गम पठारावरच्या सुवर्ण—कुंडांत **अग्नीचें वीर्य** टाकलें. याप्रमाणें शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं सहा ऋषिपत्न्यांचीं रूपें घेऊन **स्वाहानें अग्नीशीं** समागम केला; व प्रत्येक वेळीं **गरुड**-पक्षिणीचे रूपानें **अग्निवीर्य श्वेतपर्वतावर** आणून टाकलें. **वसिष्ठ-पत्नी अरुंधति हिची पतिसेवा, पातिव्रत्य, व तपः-प्रभाव अप्रतिम व दिव्य असल्यामुळें** तिचें मात्र रूप **स्वाहेला** धारण करतां आलें नाहीं. असो; श्वेतपर्वतावरील त्या सुवर्णकुंडांत अग्निवीर्य ' स्कंदत्व ' पावून त्यापासून जो तेजस्वी पुत्र झाला त्याचें ' स्कंद ' असेंच नांव ठेवण्यांत आलें. याला सहा मस्तकें व बारा बाहु पण एकच कंठ व एकच उदर होतें. चतुर्थीपर्यंत तो सर्वांगपरिपूर्ण व बलाढ्य असा होऊन विद्युल्लतेनें युक्त व तांबड्यालाल मेघानें आच्छादलेल्या आरक्त बाल-सूर्याप्रमाणें शोभूं लागला. त्यानें हातांनीं शंकरांचें धनुष्य हातीं घेऊन त्याचा टण-त्कार केला. दुसऱ्या दोन हातांनीं दोन दिग्गज आणि एका हातांत मयूर व एका हातांत मोठा कुक्कुट घेऊन आणि दोन हात भूमीवर आपटीत, हंसत व गर्जना करीत तो क्रीडा करूं लागला. कुमाराची ही भयानक क्रीडा अवलोकन करून त्रैलोक्य भयभीत झालें. त्या प्रसंगीं त्याचा ज्यांनीं आश्रय केला त्यांस ' **पारिषद** ' असें नांव प्राप्त झालें. त्यानें बाण मारून **हिमालय-पुत्र क्रौंच** याचा भेद केला; त्यामुळें त्या पर्वतांत पडलेल्या भोंकांतून—बोगद्यांतून-हंस व गृध्र पक्षी **मेरुपर्वतास** जाऊं लागले. **श्वेतपर्वतावर** त्यानें सोडलेल्या बाणानें विव्हल व चूर होऊन तो पर्वत **आक्रोश करूं** लागला; इतर पर्वतही तसेच ओरडूं लागले. **तेव्हां कुमारानें** चक-चकित शक्ति हातीं घेऊन ती फेंकली. तिचे प्रहारानें **श्वेतपर्वताचें**

शिखर भिन्न झालें; व तो इतर पर्वतांसह पृथ्वीचा त्याग करून आकाशांत उडून गेला! ह्यामुळें पृथ्वीही जर्जर होऊन चूर होऊन गेली. पण अखेर कुमाराचा आश्रय मिळाल्यावर ती दृढ व बलिष्ठ झाली; आणि पर्वतही पुनरपि पृथ्वीवर येऊन राहिले. यानंतर पुढील म्हणजे पंचमीचे दिवशीं लोक स्कंदाची सेवा करूं लागले. ( वन० अ० २२५ )

कुमार स्कंदाचा जन्म होतांच सर्वत्र भयंकर उत्पात होऊन धरित्री आक्रोश करूं लागली; आणि दशदिशा, आकाश व ग्रह पेटल्यासारखे लाल दिसूं लागले. सप्तर्षींच्या सहा भार्यांशीं व्यभिचार करून अग्नीनेंच हें संकट आमचेवर आणलें, असें कांहीं लोक म्हणूं लागले; तर कांहीं, गरुडस्त्रीसच दोष देऊं लागले. अग्नीपासून आपल्या स्त्रियांस पुत्र झाल्याची वदंता लोकांचे तोंडून ऐकल्यानंतर सहा ऋषींनीं आपापल्या पत्नीचा त्याग केला. 'हा पुत्र माझाच आहे, तुमचे स्त्रियांकडे कांहीं दोष नाहीं' असें स्वाहा देवीनें ऋषींस सांगितलें. अग्नीचे पाठोपाठ गुप्त रूपानें फिरत असलेल्या महामुनि विश्वामित्रांस सर्व खरा प्रकार माहीत होता. त्यानींही ऋषींस ' तुमच्या स्त्रिया शुद्ध आहेत ' असें सांगितलें. तरी लोकापवादभयानें त्यांनीं त्यांचा पुनः स्वीकार केला नाहीं. स्कंदाचें बल फारच दुःसह होऊन तो पुढें मागें इंद्रासही जिंकून त्यास पदभ्रष्ट करील, अशी भीति देवांस पडली, व त्याचा वध करून टाकण्याची त्यांनीं इंद्रास सल्ला दिली! पण त्यास मारण्यास इंद्राचें मन घेईना. स्कंदाचा वध करण्याची इंद्रास इच्छा नाहीं असें नसून त्यास सामर्थ्यच नाहीं; असें वाटून देवांनीं स्कंदास मारण्याचें काम ब्राह्मीप्रभृति लोकमातांवर सोंपविलें. परंतु

त्या लोकमाता स्कंदाजवळ येतांच त्यांचा क्रोध नष्ट होऊन उलट त्यांस पाहतांच त्याचें हृदय वात्सल्यरसानें भरून आलें व त्यांस पान्हा फुटला ! येवढेंच नव्हे तर त्यांच्या क्रोधापासून निर्माण झालेली स्त्रीही हातांत शूल घेऊन दाईप्रमाणें स्कंदाचें संरक्षण करूं लागली. किंबहुना स्कंदानें लोकमातांचे विनंतीवरून त्यांचा पुत्र होण्याचें कबूल केलें व स्तनपानही करून त्यांचे मनोरथ पूर्ण केले ! ( वन० अ० २२६ ) लोकमातांची ही स्थिति पाहून इंद्र स्वतःच हातीं वज्र घेऊन व ऐरावतावर बसून देवसैन्यासह स्कंदावर चाल करून आला. समीप येतांच त्यानें व देवांनीं मोठा सिंहनाद केला. त्यास प्रत्युत्तर म्हणून स्कंदानें समुद्राप्रमाणें, भयानक गर्जना करूनच कांहीं देवसैन्य दशदिशा पळावयास लावलें, तोंडांतून अग्नीच्या ज्वाळा उत्पन्न करून कांहीं सैन्य जाळून टाकलें, व बाकीचें स्कंदास शरण आलें ! तेव्हां इंद्रानें स्वतःच पुढें सरसावून स्कंदावर आपलें वज्र फेंकलें. त्या वज्रप्रहारानें स्कंद मृत्यु पावण्याचेऐवजीं त्याची उजवी बाजू तुटून निघून त्यापासून विशाख नांवाचा प्रळयकालीन अग्नीप्रमाणें भयानक असा दुसरा स्कंदच निर्माण झाला; येवढेंच नव्हे तर असे शेंकडों पारिषदही उत्पन्न झाले. हें पाहून भयभीत होऊन इंद्र स्कंदास शरण गेला. ( वन० अ० २२७ ) सदरहू विशाखानें आपलें मुख बोकडासारखें केलें. तो इतर कुमार-परिषदांस बरोबर घेऊन कोसल देशास गेला; व तेथें भद्रशाखा या नांवानें प्रसिद्ध झाला. भद्रशाखानें याच छागवक्त्रांचे योगानें दिव्यशक्ति निर्माण केली. ( वन० अ० २२८ ) स्कंदाचा अतुल पराक्रम व तेज याप्रमाणें पूर्ण प्रत्ययास आल्यानंतर देव, ऋषि किंबहुना खुद्द इंद्रही

त्यास इंद्रपदाचा स्वीकार करण्याविषयीं आग्रह करूं लागले. परंतु **खरे पराक्रमी व तेजस्वी असून जे सात्विक असतात ते महत्पदाची आशा बिलकुल न धरतां आपल्या पराक्रमाचा व तेजाचा दुसऱ्यास उपयोग करूं देतात.** या न्यायानें स्कंदानें इंद्रपद न स्वीकारतां तें इंद्राकडेच ठेवलें; व त्याचे विनंती-वरून तो त्यांचा सेनापति होण्यास मात्र कबूल झाला. तेव्हां देवांनीं त्याला सुवर्णमय कवच, माला, तुरा व किरीट घालावयास दिला; त्याला दोन तांबडीं वस्त्रें दिलीं; व त्याजवर सुवर्णमय छत्र धरलें. विश्वकर्म्यानें निर्माण केलेली सुवर्णमय दिव्य माला प्रत्यक्ष शंकरपार्वतींनीं येऊन कुमाराचे गळ्यांत घातली; व अग्नीनें त्यास एक मोठा आरक्तवर्ण कुक्कुटांकित ध्वज अर्पण केला. याप्रमाणें शृंगारलेल्या स्कंदास देवांनीं अभिषेक केल्यानंतर शक्ति, धर्म, बल, तेज, सौंदर्य, सत्य, उन्नति, शत्रुनाश, लोकपालन, इ० त्याचे जन्मसिद्ध गुण फारच शोभून दिसूं लागले. अभिषेकानंतर स्कंदा-भोंवतीं वेदघोष, वाद्य ध्वनि व नृत्यगायन सुरू झालें. नंतर इंद्रानें केशी दैत्याचे तडाक्यांतून वांचविलेल्या देवसेनेस तेथें आणून ती स्कंदास अर्पण केली. उभयतांचें पाणिग्रहण होऊन देव-सेना ही स्कंदाची पट्टराणी झाली. ( वन० अ० २२९ )

अग्नीशीं व्यभिचार करून पुत्रोत्पत्ति केल्याचा लोकापवाद आल्या-वरून सप्तर्षींपैकीं सहांनीं आपापल्या साध्वी पत्नीचा त्याग केल्या-वर, त्यांनीं स्कंदाकडे येऊन विनंति केली कीं ‘ आमच्या पत्नींचीं मनें आम्हांविषयीं पूर्ववत् निर्दोष तरी कर किंवा आमचा माता या नात्यानें स्वीकार तरी कर.’ पहिली विनंति मान्य केली तरी ती सफळ होणें अशक्य वाटल्यावरून स्कंदानें सहा ऋषिपत्न्यांस

आपल्या माता मानण्याचें कबूल केलें. ' रोहिणीची कनिष्ठ भगिनी अभिजित्‌ही चंद्राची प्रीति व ज्येष्ठता प्राप्त व्हावी, म्हणून वनांत तपश्चर्यार्थ निघून गेली; तेव्हां एक नक्षत्र कमी पडल्यामुळें ब्रह्मदेवानें युगादिकाल रोहिणीपासून होता तो धनिष्ठांपासून सुरू केला. ' असें इंद्रानें स्कंदास सांगितलें. तेव्हां नक्षत्रसंख्या पूर्ण होण्याकरितां सहा ऋषिपत्न्या आकाशांत गेल्या; व तेथें कृत्तिकारूपानें राहूं लागल्या. तेव्हांपासून स्कंदासही कार्तिकेय हें नांव प्राप्त झालें; गरुड पक्षीण व ब्राह्मी आदिकरून लोकमाता यांचे विनंतीवरून स्कंदानें त्यांचेंही मातृत्वाचें नातें मान्य केलें. स्वाहा देवी व अग्नी यांचेंही मातृपितृत्व त्यानें स्वीकारून ' स्वाहा व अग्नि यांचा कधींही वियोग होणार नाहीं ' असा त्यांस वरही दिला. शिवाय महादेव हेच अग्निस्वरूपी व उमा हीच स्वाहा देवी असल्या मुळें त्यांचाही स्कंद अर्थात्‌च पुत्र झाला. ( वन० अ० २३०

स्कंदास देव-सेनापति-पदाचा अभिषेक झाल्यानंतर दैत्यांशीं युद्ध करण्यासाठीं त्याजवर चालून जाण्याची देवांनीं तयारी केली. इंद्रानें आपल्या ऐरावताच्या दोन ' वैजयंती ' नामक घंटा स्कंदास व विशाखास आणून दिल्या. उभयतांनीं आरक्तवर्ण वस्त्रें परिधान केलीं; तसेंच तांबड्या फुलांच्या माळा व अलंकार घातले, व रथांसही तांबडे घोडे जोडले. रथावर पताकाही तांबड्या रंगाच्याच उभारल्या. शुभ्रवर्णाचे १००० सिंह जोडलेल्या रथांत श्रीशंकर पार्वतीसह बसले. त्याचप्रमाणें कुबेर पुष्पक विमानांत व इंद्र ऐरावतावर बसला. इतर देव, यक्ष, गंधर्व वगैरेही आपापल्या परिवारासह निघाले. सोमानें शुभ्रवर्ण छत्र, अग्नि व वायु यांनीं चवऱ्या, व पिंगल यक्षानें पताका हातीं घेतल्या होत्या. याप्रमाणें

श्वेतपर्वतावर देवसेना सज्ज होऊन दैत्यांवर चालून जाऊं लागली. तोंच सर्व पृथ्वी डळमळवीत व जगांत सर्वत्र अंधःकार पाडीत दैत्यसैन्य त्यांजवर एकदम येऊन पडलें. त्यासरशीं प्रथमारंभीं देवांचे सैन्याचा पराभव होऊन तें चोहोंकडे पळूं लागलें व रणांत ठार होऊं लागलें. इतक्यांत इंद्रानें आवेशयुक्त भाषण करून सर्वांस धीर दिला व त्यांस स्फुरण चढविलें. तेव्हां देव पुनः एकवटून विशेष शौर्यानें लढूं लागले. यामुळें दैत्यसेना बरीच कच खाऊं लागली. इतक्यांत महिष नांवाचा महा-बलाढ्य दैत्य हातांत एक प्रचंड पर्वत घेऊन देवांवर धांवून आला. तेव्हां पुनः देव भयभीत होऊन पळूं लागले. या दैत्यानें तें पर्वतशिखर देवांवर टाकतांच त्यांचे दहा हजार सैनिक गतप्राण झाले! याप्रमाणें पराक्रम करून महिष दैत्य शंकराचे रथाजवळ येऊन भिडला, व त्यानें त्यांच्या रथाची दांडी धरली, अशा प्रकारें आणीबाणीचा प्रसंग येतांच दैत्यांनीं आनंदानें मोठे सिंहनाद व वाद्यध्वनि केले. पण इतक्यांत कार्तिकेयानें त्वरेनें तेथें येऊन आपली जाज्वल्य व प्रचंड शक्ति त्या दैत्यावर सोडली; तिनें तात्काळ महिषासुराचें जें शिर उडविलें त्यानें उत्तरकुरु देशांत जाण्याच्या मार्गावरचें १६ योजनें लांबीचें द्वार बंद झालें; ( ह्या द्वारानें उत्तरकुरुदेशांत जाण्यास पांडव–कालींही बरेंच आयास पडत असत. ) महिषाचा वध करून ती शक्ति पुनः स्कंदाचे हातीं आली, व ती पुनः त्यानें दैत्यसेनेवर सोडली याप्रमाणें स्कंदानें व त्याच्या पारिषदांनीं थोडक्याच काळांत सर्व दैत्यसेना ठार केली. त्यांच्या प्रेतांनीं भरून गेलेली रणभूमी काळ्या मेघ खडांनीं आच्छादल्याप्रमाणें दिसूं लागली! ब्रह्मदेवाच्या वरामुळें उन्मत्त होऊन देवांस तृणप्राय मान-

णारा व त्यांस छळणारा हा दैत्य याप्रमाणें सर्व सेनेसह नष्ट केल्याबद्दल इंद्रानें मोठ्या आनंदानें स्कंदास आलिंगून त्याचें अभिनंदन केलें. नंतर श्रीशंकर स्कंदास प्रेमानें निरोप देऊन पार्वतीसह भद्रवटाकडे व देव आपापल्या स्थानीं गेले. (वन० अ० २३१)*

* स्कंदाच्या उत्पत्तीची व अभिषेकाची ही कथा शल्यपर्वांत ( अ० ४४–४६ ) निराळ्या रीतीनें दिली आहे. " एकेसमयीं महादेवांचें तेज स्खलित होऊन अग्नींत पडलें; पण तें जाळण्याचें किंवा धारण करण्याचें सामर्थ्य त्याचे मध्यें नसल्यामुळें त्यानें तो गर्भ गंगेमध्यें ठेवला. तिलाही तो सहन न झाल्यामुळें तिनें तो हिमालयपर्वतावरील एका दर्भाचे बेटांत टाकला. तेथें कृत्तिका आल्या, तेव्हां तो कुमार सहा मुखांनीं एकदम त्यांचें स्तनपान करूं लागला. गंगेनें जेथें त्या कुमारास टाकलें तो पर्वत सोन्याचा होऊन भोंवतालींही सोन्याच्या खाणी निर्माण झाल्या. गंगेवरून त्यास गांगेय असें नांव पडलें. देवसमुदाय कुमाराकडे येत असतां शंकर, पार्वती, गंगा व अग्नि यांस हा आपणाकडेच आधीं यावा, असें वाटूं लागलें. तेव्हां त्यांचा हा अभिप्राय जाणून कुमारानें एकसारखीं चार रूपें धारण केलीं. आणि तो स्कंदरूपानें रुद्राकडे, विशाखारूपानें पार्वतीकडे, शाखरूपानें अग्निकडे व नैगमेयरूपानें गंगेकडे गेला! सर्व देवांनीं त्यास हिमालय पर्वतावर सरस्वतीचे तीरीं सेनापति-पदाचा अभिषेक केला. नंतर त्यास इंद्रानें शक्ति, अस्त्र, घंटा व तांबूस रंगाची पताका दिली. शंकरानीं धनंजयानामक भूतसेना विष्णूनें वैजयंती माळा,उमेनें दोनस्वच्छ वस्त्रें, गंगेनें अमृत-कमंडलु, बृहस्पतीनें एक दंड, गरुडानें मयूर, व ब्रह्मदेवानें कृष्णाजिन त्यास अर्पण केलें. याप्रमाणें अभिषेक होऊन सर्व देवसेना दैत्यांवर चालून गेली. स्कंदानें आपल्या अग्निदत्त शक्तीचे योगानें तारक, महिष, त्रिपाद, हृदोदर, असे अनेक बलाढ्य दैत्य त्यांच्या कोट्यावधि अनुयायांसह ठार केले. बलिपुत्र बाण हा क्रौंचपर्वताचे उदरांत लपून बसला होता; म्हणून तो पर्वतही स्कंदानें शक्तीनें भग्न केला; व त्याचे तुकडे तुकडे उडविले. आणि आंत लपलेले दैत्यही ठार केले! " अशा आशयाची शल्यपर्वांतही ही कथा आहे.

# मुद्गल-चरित्र.





मुद्गल नांवाचा एक धर्मात्मा, सत्यनिष्ठ व सात्विक ब्राह्मण गृहस्थाश्रम करून पत्नी व पुत्र यांसह कुरुक्षेत्रांत राहत असे. कपोत पक्ष्याप्रमाणें शेतें वगैरेंतून पडलेले धान्याचे कण एकेक वेंचून घ्यावयाचे व त्यांवरच उपजीविका करावयाची, अशी त्याची ‘ उञ्छ ’ ऊर्फ ‘ कपोती ’ वृत्ति असे. नवरा, बायको व मुलगा यांनीं याप्रमाणें धान्यकण वेंचून पंधरवड्यांत सुमारें १ द्रोण* तांदूळ वगैरे धान्य जमत असे. इष्टकृतनामक सत्र तो नेहमीं करीत असे. शिवाय दर्श व पौर्णमास हे यज्ञ व अतिथी-भोजन हाही त्याचा नित्य-नियम असे. हें सर्व करून जें धान्य उरेल तेवढें पंधरवड्यानें एकदां खाण्याचा या कुटुंबाचा सांप्रदाय असे. अशा प्रकारच्या दुर्घट व परम पवित्र दानाच्या पुण्यामुळें शेष राहिलेलें धान्य इतकें वाढत असे कीं, तेवढ्यांत शंभर ब्राह्मणांचाही निर्वाह व्हावा! याप्रमाणें त्याचा क्रम चालला असतां दुर्वासनामक ऋषींनीं त्याचें सत्व पाहण्याचा निश्चय केला. पंधरवड्याचीं सर्व धर्मकर्में संपून शिल्लक राहिलेल्या धान्याचें अन्न तयार झाल्यावर त्यांच्या भोजनाचा समय येतांच दुर्वासऋषींनें दिगंबर व उन्मत्त वृत्तीनें यावें, व त्याशीं कठोर भाषण करून अन्न मागावें; मुद्गलानेंही त्यांच्या त्या वृत्तीकडे लक्ष न देतां पूज्य व क्षुधित अतिथि या

* ८ मुष्टी= १ कुंचि; ८ कुंचि= १ पुष्कल; ४ पुष्कल= १ आढक; व ४ आढक= १ द्रोण.

भावनेनें व निर्मल मनानें त्यांचा आदरसत्कार करावा व त्यांस भोजन घालावें, दुर्वासानीं सर्वच अन्न भक्षण करून राहिलेलें उच्छिष्टही आपल्या अंगास माखून आल्यावाटेनें निघून जावें; हेतु हा कीं मुद्गलास खाण्यास एक शीतही शिलक राहूं नये! दुर्वासानीं या प्रमाणें सहा पंधरवडे येऊन मुद्गलाचें सर्व अन्न खाऊन टाकल्यामुळें त्यास व त्याचे कुटुंबांस तीन महिने खडखडीत उपास पडला! तरीही पोटांत पेटलेल्या क्षुधेमुळें त्यांचे मनांत कसलाही विकार उद्भवला नाहीं, अगर अतिथीबद्दल मत्सर अथवा तिरस्कार वैताग अथवा क्रोधही वाटला नाहीं! दुर्वास भोजन करून गेले कीं, निर्मळ मनानें आपली उंच्छवृत्ति पुनः स्वीकारावी; असा त्याचा क्रम चालला होता. सहाव्या खेपेस दुर्वासऋषींस मुद्गलाची ही निर्धाराची वृत्ति पाहून अत्यंत संतोष झाला. व 'या तुझ्या उच्च दातृत्वाबद्दल तुला सदेह स्वर्गप्राप्ति होईल' असा त्यानीं त्यास आशीर्वाद दिला. इतकें सांगून व्यास म्हणतातः—'या जगांत **दानासारखें दुष्कर व म्हणून पुण्यकारक दुसरें कांहीं नाहीं.** कारण धनधान्य संपादन करण्यास फार कष्ट पडतात, म्हणून त्यांचे ठिकाणीं मनुष्याची आसक्तीही विशेष असते. धनाकरतां मनुष्य आपले प्रिय प्राणही धोक्यांत घालून अरण्यांत व समुद्रांत प्रवेश करतो; शेतकी, गोरक्षण किंबहुना हीन चाकरीही करण्यास तयार होतो. अर्थात् अशा परिश्रमानें मिळणाऱ्या धनाचा त्याग करणें माणसास फार कठिण वाटतें. विशेषतः **न्यायानें मिळविलेल्या धनाचें सत्पात्र अशा सज्जनांस योग्यस्थळीं योग्यकाळीं दान केल्यास त्याचें पुण्य फार आहे.**

अन्यायात्समुपात्तेन दानधर्मो धनेन यः ।
क्रियते न सकर्तारं त्रायते महतो भयात् ॥
पात्रे दानं स्वल्पमपि काले दत्तं युधिष्ठिर ।
मनसा हि विशुद्धेन प्रेत्यानंतफलं स्मृतम् ॥

**अन्यायानें मिळविलेल्या धनाचा कितीही दान-धर्म केला तरी तो दात्याची त्या पातकांतून मुक्तता करूं शकत नाहीं. न्यायानें मिळविलेल्या धनधान्याचें सत्पात्रीं, योग्यकाळीं व शुद्धमनानें स्वल्प जरी दान केलें, तरी त्याचें अनंत पट फळ परलोकीं मिळतें.**

दानाचें अशा प्रकारचें महात्म्य असल्यामुळें **मुद्गल** मुनींस सदेह स्वर्गी नेण्यास एक देवदूत विमान घेऊन आला, यांत कांहींच नवल नाहीं. एकदम **स्वर्गसुख भोगण्याची संधी आली तरी मुद्गल त्यास भुलला नाहीं.** स्वर्गांत सुख-दुःख कोणतें असतें? त्याचे गुणदोष काय आहेत? असे प्रश्न त्यानें देवदूतास विचारले. तेव्हां तो म्हणाला:—" तेथील मंदिरें सोन्याचीं व अत्यंत तेजस्वी आहेत; व विहारासाठीं नंदानादिक उपवनें आहेत. तेथें बीभत्स किंवा अशुभ असं कांहींच नाहीं. तेथें सदोदित उत्तम सुगंध सुटलेले असतात व कर्णमनोहर असें गायन ऐकूं येत असतें. क्षुधा, तृषा, शीत, उष्ण किंवा ग्लानि यांची कोणासही बाधा होत नाहीं. तेथें कोणास जरेची, शोकाची किंवा श्रमाची अथवा मोह-मत्सरादि दुर्गुणांची पीडा होत नाहीं. तेथील शरीरें केवळ पूर्व कर्मापासून निर्माण होत असून तीं तेजोमय असतात. पण या **स्वर्ग सुखांत एक मोठा दोष आहे.**

कृतस्य कर्मणस्तत्र भुज्यते यत्फलं दिवि ।
न चान्यत्क्रियते कर्म मूलच्छेदेन भुज्यते ।।

स्वर्गांत हें जें सुख मिळत असतें तें पुण्यकारक पूर्वकर्मांचें फळ म्हणून मिळत असतें; व या सुखांत गुंग झालेला जीव नवीं पुण्यकारक कर्में मुळींच करीत नाहीं. यामुळें हा स्वर्गसुखभोग म्हणजे मूळच्या पुण्यकर्माचा निवळ क्षय करणें होय. पूर्वपुण्याचा हा सांठा संपला म्हणजे प्राणी पुनः पतन पावून मृत्युलोकीं जन्मास येतो. मृत्युलोक ही कर्मभूमि आहे व स्वर्ग ही निव्वळ फलभूमि आहे. मृत्युलोकीं त्यास चांगला मनुष्यजन्म प्राप्त होतो खरा; पण तेथें जर तो सावध न होतां पापकर्मी किंवा सत्कर्महीनच राहिला तर त्याचा एकसारखा अधःपातच होतो." देवदूताचे तोंडून हें सर्व ऐकून घेतल्यावर मुद्गल त्यास म्हणालाः—"देवदूता ! तूं आलास तसाच विमानासह परत जा; शेवटीं पतनरूपी महत्दुःख देणारें तें स्वर्गसुख मला मुळींच नको.

यत्र गत्वा न शोचंति न व्यथंति चलंति च ।
तदहं स्थानमत्यंतं मार्गयिष्यामि केवलम् ।।

जेथें गेलें असतां पुनः केव्हांही शोक, दुःख अगर चलन यांचा वारा सुद्धां लागत नाहीं, तेंच अक्षय्य व शाश्वत स्थान मला पाहिजे आहे." ( वन० अ० २५८–२६० )

# श्रीसीताराम-चरित्र.





सृष्टिकर्ते ब्रह्मदेव यांचा पुलस्त्यनामक अत्यंत प्रिय असा मानसपुत्र होता; त्याला एका गाईपासून कुबेर हा पुत्र प्राप्त झाला. हा पित्याचा त्याग करून आपल्या आजोबांचेच संनिध राहत असे. यामुळें ब्रह्मदेवांचें प्रेम त्याचे ठिकाणीं जरी जडलें, तरी पुत्राचें हें वर्तन पाहून पुलस्त्यांचें मन त्याजवरून उडून गेलें. त्यांनीं एका यज्ञामध्यें स्वतःच्या क्रोधापासून विश्रवा नांवाचा आपलाच अर्धदेहधारी पुरुष कुबेराचा प्रतिकार करण्यासाठीं निर्माण केला. **याप्रमाणें प्रत्यक्ष बापानेंच कलहाचें जें बीज पेरलें, त्याची पुढें मोठी वाढ होऊन राक्षस-कुलांचा संहार झाला.** ब्रह्मदेवानीं प्रसन्न होऊन कुबेरास अमरत्व व धनेशत्व देऊन त्यास एक लोकपाल केलें. शिवाय श्रीशंकरांचें सख्य व नलकूबर पुत्र यांचाही त्यास लाभ झाला. याप्रमाणें यक्षांचें आधिपत्य, लंकेचें राज्य आणि पुष्पकनामक कामगति विमान यांचीही प्राप्ति ब्रह्मदेवांचे वरप्रसादानें त्यास झाली. कुबेराचें हें वैभव पाहून व जन्मकाळाच्या संस्कारास अनुसरून विश्रवामुनि त्याजवर राग करूं लागले. त्यांची मर्जी प्रसन्न करण्यासाठीं कुबेरानें तीन सुंदर व नृत्यगीत-कुशल अशा राक्षसी त्यांच्या सेवेस दिल्या. त्यांनीं आपल्या वर्तनानें, कलाकौशल्यानें व सेवेनें विश्रवा मुनींस, एकमेकांच्या स्पर्धेनें प्रेरित होऊन प्रसन्न करून घेतलें; व त्यांज-

पासून पुत्रप्राप्तीचे वर मिळविले. त्याप्रमाणें पुष्पोत्कटेस कुंभकर्ण व रावण, मालिनीला बिभीषण व राकेला खर आणि शूर्पणखा हें जुळें झालें. उत्साह, वीर्य व पराक्रम या गुणांत रावण सर्व भावांत श्रेष्ठ असून कुंभकर्णाचें सामर्थ्य, क्रूरता, मायावीपणा व युद्धकौशल्य हीं विशेष होतीं. बिभीषणाचें सौंदर्य, धार्मिकता व सदाचार हीं सर्वांहून अधिक असून खराचें धनुर्धरत्व, व ब्रह्मद्वेष आणि शूर्पणखेचें सिद्धांचे मार्गांत विघ्न करण्याचें चातुर्य हीं अप्रतिम होतीं. हे सर्व भाऊ व बहीण आपल्या पित्यासह गंधमादन पर्वतावर राहत असत. तेथें कधीं कधीं येणाऱ्या कुबेराचें वैभव व संपत्ति पाहून यांचे मनांत हेवा व महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली; व त्यांनीं वैभवसंपादनार्थ घोर व तीव्र तपश्चर्या आरंभिली. वायुभक्षण करून व एका पायावर उभें राहून रावण पंचाग्निसाधन करूं लागला; कुंभकर्ण आहारादिकांचें संयमन करून खालीं पडून तप करूं लागला; बिभीषण एकेक पिकलेलें पान खाऊन उपवास व जप ह्यांत काल घालवूं लागला; आणि खर व शूर्पणखा हीं तप करणाऱ्या ह्या भावांचें संरक्षण व सेवा करूं लागलीं. याप्रमाणें एकहजार वर्षें तपाचरण झाल्यानंतर रावण आपलें एकेक शिर कापून त्याची अग्नींत आहुति देऊं लागला! **इष्टकार्य-सिद्धीसाठीं आपलीं शिरकमलेंही अर्पण करण्याइतका त्याचा हा भयंकर निर्धार व निष्ठा हीं लवकरच सफळ झालीं.** ब्रह्मदेवानीं प्रसन्न होऊन अमरत्वाखेरीज कोणताही वर मागून घेण्याची त्या तिघांस अनुज्ञा दिली. तेव्हां, ‘ देव, गंधर्व, यक्ष, राक्षस, सर्प, किन्नर व पिशाच यांपासून मला भीति किंवा माझा पराजय होऊं नये ’ असा रावणानें वर मागितला. राक्षसांचें केवळ भक्ष्य असलेल्या मनुष्यांचें तें काय भय

बाळगावयाचें, असें मनांत आणून रावणानें आपल्याकडून मोठ्या धूर्ततेनें वरांतून मनुष्यें वगळलीं होतीं. पण **मानवांबद्दलची ही त्याची तुच्छबुद्धिच अखेर त्याच्या नाशास कारण झाली.** कुंभकर्णामध्यें तमोगुणाचा अतिरेक झालेला असल्यामुळें ' मला गाढ निद्रा येवो ' हाच वर त्यानें मागून घेतला! सत्त्वगुणी बिभीषणानें ' आपणास शिक्षणावांचून ब्रह्मास्त्र स्फुरण पावो ' असें मागणें मागून

**परमापद्गतस्यापि नाधर्मे मे मतिर्भवेत् ।**

**' अत्यंत कठिण व दुर्धर विपत्तींतही अधर्म करण्याची बुद्धि मला न होवो '** असा वर मागितला. तिघां भावास हे तीनही वर देऊन शिवाय, राक्षसकुळांत उत्पन्न होऊनही बिभीषणानें जी धर्मप्रीति दाखविली ती पाहून ब्रह्मदेवानीं दुसऱ्या दोघां भावांसही दुर्लभ असें अमरत्व त्यास दिलें. अर्थात् **सत्य व धर्म आणि अमरत्व यांचें अक्षय्य साहचर्य असतें.** हा सिद्धांत खरा ठरला. ब्रह्मदेवांचे प्रसादानें, रावणानें अग्नींत अर्पण केलेलीं शिरें पुनः त्याचे शरीरास पूर्वस्थळीं चिकटलीं, व त्याचे शरीराची कुरूपताही नाहींशी झाली. रावणानें ह्या वरप्राप्तीचे योगानें कुबेरास युद्धांत पराभूत करून लंकेचें राज्य बळकावलें; व त्यास यक्ष-गंधर्वांसह गंधमादनाकडे पिटाळून लावलें. शिवाय त्याचें पुष्पक विमानही जबरदस्तीनें हिरावून घेतलें. ' **अधर्मानें संपादिलेल्या ह्या विमानाचा तुला केव्हांही उपयोग न होतां तें तुझ्या शत्रूसच उपयोगी पडेल;** आणि ज्या अर्थी तूं माझा व आपल्या पित्याचा असा उपमर्द केला आहेस, त्या अर्थी याचें प्रायश्चित्त लवकरच तुला मिळून तुझा नाश होईल ' असा कुबेरानें रावणास शाप

दिला. बिभीषण सत्यपक्षाचा अभिमान धरून कुबेराकडे गेला. त्यानें त्यास आपल्या यक्ष-राक्षस सैन्याचा सेनापति केलें. नर-मांस—भक्षक असे राक्षस, दैत्य व पिशाच यांनीं लंकेमध्यें जमून रावणास राज्याभिषेक केला. रावण आपल्या पराक्रमाच्या, मायेच्या व सामर्थ्याचे जोरावर देव-दैत्यांस जिंकून त्यांजजवळच्या सर्व अमूल्य वस्तु लुटून आणूं लागला. आपल्या ह्या क्रूर कर्मांनीं लोकांना तो ( रावयामास ) रडावयास लावी म्हणून त्याचें ‘ रावण ’ हें नांव गाजून राहिलें ! रावणाच्या घोर कृत्यांबद्दल सर्व देवांनीं रावणास वरप्रदान करणाऱ्या ब्रह्मदेवांकडे गाऱ्हाणें केलें. त्यानीं त्यांस सांगितलें कीं ‘ मनुष्यावांचून या राक्षसाचा नाश होणें शक्य नाहीं. त्याचा नायनाट करण्यासाठीं श्रीविष्णु लवकरच मनुष्ययोनींत अवतार धारण करणार आहेत. त्यांचे साहाय्यार्थ तुम्हीं सर्व देवांनीं वानरांत व ऋक्षांत जन्म घ्यावे. ’ याप्रमाणें आश्वासून सर्व देवांस ब्रह्मदेवांनीं निरोप दिला. दुंदुभिनामक गंधर्वासही मंथरा-रूपानें अवतरून कलह उत्पन्न करण्याचें काम त्यानीं सांगितलें. त्याप्रमाणें देवांनीं ऋक्ष व वानर यांचेमध्यें जन्म घेतले. हे साल व तालवृक्ष आणि शिळा यांनीं युद्ध करीत; यांचें शरीर वज्रासारखें कठिण असून ते मोठे बलिष्ठ व वायूसारखे चपल होते. इकडे इक्ष्वाकुवंशांतील अजपुत्र दशरथ यासही कौसल्ये-पासून राम, कैकेयीपासून भरत आणि सुमित्रेपासून लक्ष्मण व शत्रुघ्न असे चार पुत्र झाले. रामाची प्रिय पत्नी होणारी सीता ही विदेह देशाचा राजा जनक यास झाली. ( वन० अ० २७३–२७५ )

दशरथाचे पुत्र जसजसे वाढूं लागले तसतसा त्याचा आनंद व पुत्रप्रेम हीं वृद्धिंगत होऊं लागलीं. सरहस्य वेद व धनुर्वेद यांमध्यें

चारही पुत्र पारंगत होऊन त्यांचा ब्रह्मचर्याश्रम पूर्ण झाल्यावर त्यांचीं लग्नें झालीं. सौंदर्य, तेज, बुद्धिमत्ता, धर्मबुद्धि, धैर्य, शौर्य, पराक्रम, प्रजाप्रेम इत्यादि गुणांनीं राम सर्वांमध्यें श्रेष्ठ असल्यामुळें व आपणांसही वार्धक्य आलें असें जाणून दशरथानें आपले सचिव व पुरोहित यांचे संमतीनें रामास पुष्यनक्षत्राचे शुभ मुहूर्तावर यौवराज्याभिषेक करण्याचा निश्चय केला. हें वर्तमान मंथरेस कळतांच तिनें कैकेयीकडे येऊन तिचे कान फुंकले व मन कलुषित केलें. ती म्हणाली:—" कैकेयी, आज तुझें सौभाग्य नष्ट होऊन तें कौसल्येस प्राप्त झालें आहे. तुला आज एक महाभयंकर कृष्णसर्प चावला आहे. कौसल्येचा राम उद्यां युवराज होणार असून तूं व तुझा पुत्र हे अभागी राज्यहीनच राहणार. तुझ्या पुत्रास युवराज न करतां रामासच तें पद दशरथ देत आहे; मग राजाचें तुझ्यावर प्रेम तें कसलें ? " याप्रमाणें कैकेयीचें मन मंथरेनें सवती-मत्सरानें भरून टाकल्यानंतर कैकेयी उत्तमोत्तम अलंकार धारण करून दशरथाकडे एकांतांत आली, आणि हंसत हंसत विनयाचा व प्रेमाचा मोठा आव आणून म्हणाली:—' सत्यप्रतिज्ञ महाराज, आपण मला पूर्वीं एक वर देऊं केला होता; तो या वेळीं मला देऊन माझी एका संकटांतून मुक्तता करावी. ' कैकेयीच्या मनांत उद्भवलेल्या दुष्ट विचाराचा मागमूसही राजास नसल्यामुळें, तिची इच्छा पूर्ण करण्यासाठीं, ती म्हणेल तर **निरपराध्याचा वध करण्यास व वध्य अपराध्यास मुक्त करण्यासही तो तयार झाला! अयोग्य स्त्रीवरील प्रेमासाठीं असें पातक करावयास तयार झालेल्या दशरथास याचें प्रायश्चित्त लवकरच मिळालें.** दशरथाकडून असें वचन घेतल्यावर कैकेयी आपल्या सौंदर्याच्या

प्रभावाबद्दल मोठा अभिमान धरून राजास आलिंगन देऊन म्हणाली " रामास यौवराज्याभिषेक करण्यासाठीं जी तयारी केली आ तिनेंच माझ्या भरतास अभिषेक करा; व रामास १४ वर्षें दंडकारण्यांत वनवासास धाडून तेथें जटा वल्कलें वगैरे तापस वेष धारण करून त्यास राहावयास लावा. " कैकेयीचें हें दारुण व दुष्ट भाषण ऐकून झालेल्या दुःखामुळें दशरथानें कांहींच उत्तर दि नाहीं. तथापि कैकेयीनें दशरथापाशीं मागितलेला वर व राजानें तिला दिलेलें वचन हीं रामांस समजल्यावर, केवळ आपल्या **पित्याचा वचनभंग होऊन त्याचें कीर्तीस असत्याचा डाग लागूं नये, म्हणून राम राज्यत्याग करून वनवासास निघून गेले;** त्याचे बरोबर धनुर्धारी व तेजस्वी लक्ष्मण आणि रामांची पतिव्रता भार्या सीता हींही वनांत गेलीं ! ह्या दुःखामुळें दशरथ लवकरच मृत्यु पावला. तेव्हां कैकेयीनें भरतास बोलावून आणून त्यास रामलक्ष्मणाचा वनवास व दशरथाचा मृत्यु या संबंधाची बातमी निवेदन केली; आणि ' आतां हें निष्कंटक झालेलें राज्य निर्वेधपणें स्वीकार ' असें ती भरतास म्हणाली. मातेचें हें निर्दयपणाचें भाषण ऐकून भरत दुःखसंतापातिरेकानें तिला म्हणालाः-"राज्य–लोभानें आपल्या पतीचा प्राण घेतलास व ह्या कुलाचाही विध्वंस करून माझ्या डोक्यावर अपेशाचें पातक लादलेंस आतां तरी, अगे कुलकलंकिनी, तुझे मनोरथ पूर्ण झाले ना ? " असें म्हणून भरत दुःखानें मोठमोठ्यानें रडूं लागला. कांहीं दिवसांनीं आपल्या सगळ्या मातांस वाहनांत बसवून रामांस परत आणण्यासाठीं भरत शत्रुघ्नासह त्यांचे मागोमाग गेला. वसिष्ठ वामदेवादि ऋषि, नगरवासी व इतर हजारों प्रजाजनही त्यांजबरो



जनस्थानांत घडलेली सर्व हकीकत शूर्पणखेनें रावणास सांगितली.

(पृ. २६७)

वर निघाले होते. सर्वांची चित्रकूट पर्वतावर भेट झाली. परंतु **पित्याचें वचन पुरें करण्यासाठीं स्वीकारलेलें वनवासाचें व्रत सोडण्यास राम तयार झाला नाहीं.** तेव्हां भरतानें नाइलाज होऊन रामाच्या पादुकांस सिंहासनावर ठेवून त्यांचा प्रतिनिधि या नात्यानें नंदिग्रामीं राज्य चालविलें. अयोध्येंतील प्रजाजन पुन: कदाचित् वनांत येऊन आपणास उपसर्ग देतील, असें जाणून राम, लक्ष्मण व सीता हीं तेथून निघून शरभंगऋषींच्या आश्रमावरून गहन दंडकारण्यांतील गोदावरीतीरीं येऊन राहिलीं. जनस्थानांत त्या वेळीं खर व शूर्पणखा हीं राहत होतीं; तीं तापसी व ऋषि यांच्या तपास व यज्ञयागांस व्यत्यय आणीत असल्यामुळें त्यांचें रामाशीं वैर पडलें अखेर रामानीं तपस्व्यांचे संरक्षणार्थ खर व दूषण हे राक्षस मारून त्यांचें १४ हजार दैत्यसैन्यही यमसदनीं पाठविलें, व तें धर्मारण्य पुनरपि सुरक्षित केलें. जनस्थानच्या सर्व राक्षसांचा याप्रमाणें संहार झाल्यावर शूर्पणखा नाक व ओठ कापलेली अशी रावणाचे राजसभेंत जाऊन उभी राहिली! तिची ही स्थिति पाहून रावण संतापानें एकदम सिंहासन सोडून उभा राहिला; आणि सर्व सचिवांस निरोप देऊन तिला एकांतस्थळीं घेऊन गेला. तेथें जनस्थानांत घडलेली सर्व हकीकत तिनें आपल्या भावास सांगितली. ती ऐकून रावणाच्या क्रोधास पारावार राहिला नाहीं. 'डोक्यावर अग्नि घेऊन सुखानें झोंप घेण्याची इच्छा करणारा हा कोण मानव आहे? भयंकर विषारी सापाला पायानें स्पर्श करणारा हा कोण आहे? सिंहाच्या दातांस स्पर्श करून जिवंत सुटूं पाहणारा हा साहसी पुरुष कोण आहे?' वगैरे प्रलाप रावण संतापाचे भरांत करूं लागला. जनस्थानांतील आपल्या सर्व राक्षस

बांधवांचा नायनाट करणाऱ्या ह्या रामाचा वध करावयाचा, अशी रावणानें प्रतिज्ञा केली; आणि यासंबंधानें उपाययोजना कोणती करावी, याबद्दल सल्ला विचारण्यासाठीं रावण आपला जुना मंत्री मारीच याजकडे गोकर्ण येथें आला. तेथें रामाचे भयानें मारीच पूर्वींच तपश्चर्या करीत बसला होता. कांहींसा संतप्त व कांहींसा उद्विग्न, अशा स्थितींत रावण तेथें आलेला पाहतांच मारीचानें त्यास धीर देऊन म्हटलें कीं, ' तुजवर कोणतें संकट आलें आहे ? मला कोणतेंही कार्य सांग; तें कितीही दुष्कर असलें तरी तें माझ्या हातून झालेंच असें समज. ' मारीचाचें हें भाषण ऐकून जनस्थानांत घडलेला सर्व प्रकार रावणानें त्यास कळविला; आणि ' या रामाचा वध करावयाचा आहे, तर या कामीं मला साहाय्य कर ' असेंही त्यानें त्यास म्हटलें. जनस्थानांतच रामाच्या बाणांचा प्रताप पूर्णपणें माहीत झालेल्या मारीचास हें काम अंगावर घेणें अर्थातच आवडलें नाहीं. तो म्हणाला:—" रामाचा प्रताप मला चांगला माहीत आहे; त्याच्या बाणांचा प्रहार सहन करण्यास कोणीही समर्थ नाहीं. येथें येऊन तपांत निमग्न होण्याचें तरी कारण रामाचा प्रत्यक्ष अनुभविलेला पराक्रमच होय. तूं या फंदांत मुळींच पडूं नको; ही नाशकारक मसलत कोणत्या दुष्टानें तुला दिली कोण जाणे ? " मारीचाचें हें भाषण ऐकून रावणानें त्याची निर्भत्सना केली; आणि ' मीं सांगितलेलें काम करण्याचें कबूल न करशील तर तुझा आतांच वध करीन. ' अशी त्यास धमकीही दिली ! तेव्हां मारीचानें विचार केला कीं,

अवश्यं मरणे प्राप्ते विशिष्टान्मरणं वरम् ।



सीतेला प्रतिबंध करून लक्ष्मण तिला म्हणाला. (पृ० २६९)

**मरण जर अवश्यच यावयाचें असेल तर दुष्ट प्राण्याचे हातून तें येण्यापेक्षां पुण्यात्म्यांचेंच हातून येणें अधिक श्रेयस्कर आहे.** असें मनांत येऊन **मारीच रावणास** साहाय्य करण्यास सिद्ध झाला. उभयतांनीं एकांतांत बसून, **सीतेला** कसा मोह उत्पन्न करावयाचा, **राम** पाठलाग करूं लागले असतां काय युक्ति योजावयाची व **रावणानें सीतेचें** हरण कसें करावयाचें, या संबंधाचे सर्व बेत निश्चित केले. त्या बेतांप्रमाणें **मारीच** राक्षसानें सुवर्णमृगाचें व **रावणानें** संन्याशाचें रूप धारण केलें. या मृगाचीं शिंगें रत्नखचित असून त्याचे अंगावरही रत्नाचीं कोंदणें केलेलीं होतीं. हा मनोहर मृग पाहून **सीता** दुर्दैवानें मोहित झाली; व तिनें त्या मृगास मारून आणण्याची **रामास** विनंति केली. आपल्या प्रिय भार्येचा हा मनोरथ पूर्ण करण्यासाठीं हातांत धनुष्य घेऊन व **सीतेचे** संरक्षणार्थ लक्ष्मणास ठेवून **राम** त्या मृगाचे पाठोपाठ गेले. हा मृगरूपी **मारीच** मध्येंच अदृश्य होई व मध्येंच दिसूं लागे. या प्रकारच्या युक्त्यांनीं त्यानें **रामास** बरेंच दूर नेलें. मृग हा खरोखरच मायावी राक्षस असावा, असें **रामाचे** लक्षांत येऊन त्यांनीं एक अमोघ बाण काढून त्याजवर सोडला. त्या बाणानें जखमी होऊन प्राण सोडतां सोडतां **मारीचानें रामाचा** स्वर काढून 'हा **सीते**! हे लक्ष्मणा!' अशी मोठ्यानें हांक मारली! आपल्या पतीची ही दीनवाणी ऐकून, जिकडून शब्द ऐकूं आला तिकडे **सीता** धांवत जाऊं लागली. परंतु तिला प्रतिबंध करून लक्ष्मण म्हणाला:—'तिकडे जाऊं नको. **रामाबद्दल** व्यर्थ शंका घेण्याचें कारण नाहीं. त्यास प्रहार करण्याचें सामर्थ्य कोणासच नाहीं. एक दोन घटकेंतच **रामचंद्र** परत येऊन तुला भेटतील'

लक्ष्मणाचें हें सरळ भाषण ऐकून व तिचें स्वतःचें चारित्र्य शुद्ध असूनही **सीते**च्या मनांत स्त्रीस्वभावानुसार भलतीच शंका येऊन ती रडूं लागली. ती म्हणाली:—" मेल्या, तुझ्या मनांत जी पापवासना उत्पन्न झाली आहे ती कदापिही तृप्त व्हावयाची नाहीं. वाघीण ज्याप्रमाणें आपल्या पतीस सोडून कोल्ह्याची भार्या कधींही होत नाहीं, याप्रमाणें मीही **रा**मास सोडून तुझी अंकित केव्हांही होणार नाहीं. यापेक्षां मी शस्त्रानें आत्महत्या करीन, पर्वतावरून खालीं उडी घेईन, किंवा चिताप्रवेश करीन ! " **सीते**चें हें कठोर भाषण ऐकून सदाचारी लक्ष्मण **सीते**कडे न पाहतां किंवा तिला उत्तर न देतां कान हातानें झांकून **राम** जिकडे गेले होते, तिकडेच चालता झाला. इतक्यांत त्रिदंड-कमंडलुधारी संन्यासी होऊन **रावण** तेथें आला. **सीते**नें त्यास पूज्य आतिथि व संन्यासी असें मानून फलमूलादिक देऊन त्याचा सत्कार केला. परंतु त्या आतिथ्याकडे लक्ष न देतां **रावणा**नें आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. आणि आपण कोठले कोण हें मोठ्या अभिमानानें तिला सांगून, ' वनवासी **रामा**चा त्याग करून व माझी पट्टराणी होऊन लंकेचे राज्याची अर्धी मालकीण हो ' असें तिला म्हटलें ! **रावणा**चें हें निर्लज्जपणाचें भाषण ऐकून **सीता** हातानें आपले कान झाकून म्हणाली:— " मैवं " असें बोलूं नको.

**प्रपतेत्द्यौः सनक्षत्रा पृथिवी शकली भवेत् ।**
**शैत्यमग्निरियान्नाहं त्यजेयं रघुनंदनम् ॥**

**नक्षत्रांसह सगळें आकाश खालीं कोसळून पडेल, पृथ्वीचीं शकलें होतील, कदाचित् अग्नीही शांत होईल, पण मी आपल्या पतीचा कालत्रयींही त्याग करणार नाहीं.** आपल्या

मत्त मतंगजाला सोडून हत्तीण कुत्र्याला कधीं स्पर्श तरी करील काय ? ' याप्रमाणें त्यास बोलत, ओंठ कांपत कांपत व धिक्कारयुक्त हातवारे करीत करीत **सीता** पर्णकुटिकेंत निघून गेली. **रावणानें** तिचे पाठोपाठ धांवून तिला आडविलें; आणि तिचा कठोर शब्दांनीं निर्भर्त्सना करून त्यानें तिचे केश धरले, आणि तिजसह वर उड्डाण-करून **रावण** आकाशमार्गानें लंकेकडे जाऊं लागला. वाटेंत एका पर्वतशिखरावर **अरुणपुत्र** व **संपातीचा** भाऊ असा **जटायु** हा गृध्रराज बसला होता. त्याचें व **दशरथाचें** फार सख्य असे. आपल्या स्नुषेस **रावण** बलात्कारानें नेत आहे, असें पाहून व तिचा '**राम! राम!** ' असा करुण शब्द ऐकून **जटायूनें रावणावर** हल्ला केला, आणि नखें, चोंच व पंख यांनीं अनेक प्रहार करून **रावणास** जर्जर व जखमी केलें. पण इतक्यांत **रावणानें** तरवारीनें त्याचे दोनही पंख छाटून टाकून त्यास भूमीवर निश्चेष्ट पाडलें; आणि तो लंके-कडे अधिक वेगानें निघाला. आपल्या पतीस आपला सुगावा लागावा म्हणून खालीं एकादें सरोवर, नदी किंवा आश्रम दिसला कीं, **सीता** वरून एकेक दागिना खालीं टाकून देत असे. एका डोंगराचे माथ्यावर पांच वानर बसलेले तिला वरून दिसले; तेव्हां तिनें त्यांजकडे आपल्या जवळचें एक पिवळें रेशमी वस्त्र टाकून दिलें. याप्रमाणें **सीतेचें** हरण करून **रावणानें** तिला लंकेंत आणून मोठ्या बंदोबस्तानें ठेवलें.

इकडे सुवर्णमृगरूपी **मारीचास** मारून **राम** परत आश्रमाकडे येऊं लागले असतां वाटेंत त्यांस **लक्ष्मण** भेटला. **राक्षसांनीं** वास्तव्य केलेल्या ह्या वनांत **सीतेला** एकटीला आश्रमांत सोडून आपल्या मागें आल्याबद्दल **रामानीं** लक्ष्मणास फार दोष दिला. परंतु **सीतेनें**

केलेलीं दुरुत्तरें व तेथें घडलेला सर्व प्रकारलक्ष्मणानें रामास विदित केला. राम अत्यंत दु:खित अंत:करणानें आश्रमांत परत आले, तों तेथील पर्ण-कुटिका अस्ताव्यस्त व शून्य झालेली पाहून राम अत्यंत शोक करूं लागले. थोड्या अंतरावर विव्हळत पडलेला प्रचंड गृध्र त्याचे दृष्टीस पडला; हा कोणी राक्षसच असावा असें वाटून राम-लक्ष्मणांनीं धनुष्य-बाण सज्ज केले. पण इतक्यांत ‘ मी दशरथाचा मित्र व गृध्रांचा राजा आहें ’ असें कळवून जटायूनें राम-लक्ष्मणांस मोठ्या कष्टानें हांक मारली; आणि सीतेचें हरण करणाऱ्या रावणाचा वध कर-ण्याची रामांस आग्रहानें आज्ञा केली. रावण सीतेस घेऊन कोणत्या दिशेनें गेला ? असें रामानीं विचारलें असतां, मृत्यु समीप आल्यामुळें जटायूस उत्तर देतां येईना.त्यानें फक्त मानेच्या खुणेनेंच दक्षिण दिशा दाखवून प्राण सोडले. जटायूनें दाखविलेल्या दिशेनेंच सीतेचा शोध करीत राम-लक्ष्मण चालूं लागले.कांहीं वेळानें त्यांस एक कबंधनामक विचित्र राक्षस भेटला. तो मेघाप्रमाणें कृष्णवर्ण असून त्याचें डोकें त्याचे उदरांत व डोळे छातीवर होते ! हा राक्षस लक्ष्मणास एकदम हातीं धरून त्यास उचलून घेऊन चालला. त्या वेळीं दश-रथाचा मृत्यु, रामाचा राज्यभ्रंश, सीतेचें हरण व आपणावर आलेला हा कठिण प्रसंग यांची लक्ष्मणास लागोपाठ आठवण होऊन त्याचें हृदय दु:खानें दाटून आलें; व १४ वर्षांचा वनवास संप-ल्यावर सीता-रामास राज्याभिषेक झालेला पाहण्याची आपली उत्कट इच्छा तृप्त होत नाहीं, असें मनांत येऊन तो अत्यंत शोक करूं लागला. लक्ष्मणाची ही स्थिति पाहून रामानीं त्यास धीर दिला, व कबंधाचा डावा हात तरवारीनें एकदम तोडून टाकला. लक्ष्मणानेंही तात्काळ त्याचा उजवा हात तोडून त्याचे पाठीवर

जोराचे प्रहार करून त्यास ठार केलें, तों त्याचे शरीरांतून एक दिव्य व तेजस्वी पुरुष बाहेर पडला ! रामांनीं विचारल्यावरून त्या पुरुषानें त्यांस आपली हकीकत सांगितली. तो म्हणाला:—" मी मूळ विश्वावसु नांवाचा गंधर्व असून ब्राह्मणशापामुळें माझा राक्षस-योनींत जन्म झाला होता. लंकेंत राहणाऱ्या राक्षसराज रावणानें तुझी भार्या नेली आहे. ऋष्यमूक पर्वतासंनिध मनोहर पंपा सरोवर आहे. तिकडे जाऊन वालीचा भाऊ जो सुग्रीव त्याशीं सख्य कर. तो व तूं सांप्रत समदुःखी असून तो तेथें चार सचिवांसह राहत आहे. तिकडे जाऊन तूं त्याला आपलें दुःख निवेदन कर; त्याला रावण वगैरे राक्षसांची चांगली माहिती आहे. त्यांचे साह्यानें तुला लवकरच जानकीची भेट होईल. " याप्रमाणें आश्वासन देऊन विश्वावसु गंधर्व गुप्त झाला. ( वनपर्व, अध्याय २७६–२७८.)

विश्वावसु गंधर्वानें दाखविलेल्या मार्गानें राम-लक्ष्मण पंपा-सरोवराजवळ आले. तें कमलांनीं गजबजलेलें सरोवर पाहिल्या-मुळें आणि तेथें वाहणारा सुगंधित व शीतल वारा अनुभविल्या-कारणानें श्रीरामचंद्र सीतेची आठवण होऊन एकसारखा शोक करूं लागले. तेव्हां लक्ष्मण त्यांस म्हणाला:"—अशा प्रकारचें दुःख व शोक करण्याचें वास्तविक कांहीं कारण नाहीं. जानकी व तिला नेणारा राक्षस रावण यांचा तपास व ठावठिकाण तुम्हांस लाग-लेला आहे. याकरतां दैवास दोष देत शोक करीत न बसतां आपल्या बुद्धिसामर्थ्यानें व पुरुषार्थ-प्रयत्नानें तिला पुनः प्राप्त करून घेण्याचे उद्योगास लागा. आपण पुढें जाऊन सुग्रीवाचें सख्य संपादन करूं या. शिवाय मीही तुमचा शिष्य, सेवक व मित्र आहें. हें लक्षांत घेऊन शोक सोडून प्रयत्नास लागा. " याप्रमाणें बरेंच

भाषण झाल्यावर श्रीरामाचा शोक नाहींसा झाला. पंपासरोवरांत स्नानपानादि क्रिया व पितृतर्पण करून रामलक्ष्मण ऋष्यमूक पर्वताकडे गेले. त्या पर्वताचे शिखरावर मैंद, द्विविद, हनूमान् व जांबवान् ह्या चार अमात्यांसह सुग्रीव वनवासांतच राहत होता. त्यानें हनुमानास पाठवून रामलक्ष्मणांस आपणाकडे आणलें. उभयतांचें सख्य होऊन रामानीं आपलें कार्य सुग्रीवास निवेदन केलें. सीताहरणाची हकीकत ऐकतांच सीतेनें टाकलेलें पिवळें वस्त्रही वानरांनीं आणून रामचंद्रांस दाखविलें. त्यावरून विशेष प्रत्यय येऊन त्यानीं सुग्रीवास वानराधिपति म्हणून राज्याभिषेक केला. रामाप्रमाणें सुग्रीवाचीही भार्या वालीनें हरण केली असून तोही रामांप्रमाणें राज्यभ्रष्ट होऊन वनवासांत होता. 'समानशीलव्यसनेषु सख्यं'—ज्यांचें शील सारखें असेल किंवा ज्यांवर सारखें संकट आलें असेल, त्यांचें सख्य चांगलें जमतें; या न्यायानें सुग्रीव व रामचंद्र यांचें सख्य झालें. आणि वालीचा वध करण्याची रामानीं व सीता परत आणण्याची सुग्रीवानें प्रतिज्ञा केली. याप्रमाणें वचनप्रमाण झाल्यावर सर्वजण माल्यवान पर्वतानजीक मोठ्या गुहेंतच वसलेल्या किष्किंधा नगरीजवळ आले. सुग्रीवानें प्रचंड गर्जना करून तद्द्वारा वालीस युद्धास आव्हान केलें. सुग्रीव कोणत्या वीराच्या आधारावर अशी गर्जना व द्वंद्वयुद्धाची इच्छा करीत आहे, हें तारेस माहीत असून या युद्धांत वालीचा वध होणार असें तिला वाटावयास लागलें होतें. म्हणून हें सर्व निवेदन करून युद्धाला न जाण्याचा ती वालीस आग्रह करूं लागली. यामुळें तारेचें मन पुनः सुग्रीवाकडे धांव घेऊं लागल्याचा संशय वालीस आला. तेव्हां तिची याबद्दल निर्भर्त्सना करून तिचें न ऐकतां

वाली युद्धासाठीं गुहा-नगरीबाहेर आला; व सुग्रीवास म्हणाला:— ' मीं तुला पूर्वीं अनेकदां जिंकलें असूनही केवळ आपला भाईबंद म्हणून मीं तुला भ्याडाला जीवदान दिलें आहे. असें असून पुनः तुला मरण्याची इतकी त्वरा कां झाली आहे ? ' सुग्रीवः—"तूं माझें राज्य व माझी भार्या बलात्कारानें हरण केली आहेस, व कित्येक वेळां मला जिंकलेंही आहेस. पण आतां माझ्या अंगांत एवढें सामर्थ्य कशामुळें आलें आहे, तें तुला लवकरच दिसेल" याप्रमाणें वालीस उत्तर देऊन व त्यांतच वालीवधाची रामास सूचना देऊन सुग्रीव वालीशीं भिडला. उभयतांचें बराच वेळ द्वंद्वयुद्ध होऊन दोघेही जखमी झाले. परंतु दोघेही समानबल असल्यामुळें जय कोणाचाच झाला नव्हता. इतक्यांत रामांस वाली कोणता तें दुरून समजावें म्हणून सुग्रीवाचे गळ्यांत हनुमानानें एक मोठी पुष्पमाला घातली. तेवढ्यावरून रामांस खूण पटली. उभयतां पुनः झगडावयास लागले असतां रामानीं दुरून व आडून एक तीक्ष्ण व अमोघ बाण वालीवर सोडला. तो त्याचे छातींत जोरानें घुसल्यामुळें रक्त ओकतच वाली मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. कांहीं वेळानें थोडा सावध होऊन पाहतो तों त्यास दूर उभे असलेले राम-लक्ष्मण दिसले. आपण दुसऱ्याशीं युद्ध करण्यांत गुंतलों असतां बेसावध स्थितींत आपला असा अधर्मानें वध केल्याबद्दल रामाची निंदा करीत वालीनें प्राण सोडला. सुग्रीवानें किष्किंधा नगरींत प्रवेश करून पुनः आपलें राज्य व भार्या प्राप्त करून घेतली. सुग्रीवाचे विनंतीवरून राम-लक्ष्मण हे तेथेंच मौल्यवान पर्वताचे माथ्यावर पर्णकुटिका करून राहिले.

इकडे सीतेस घेऊन लंकेंत आल्यावर रावणानें तिला अशोकवनिकेनजीकच्या एका दिव्य मंदिरांत ठेवलें. पतीचें वारंवार स्मरण होत असल्यामुळें सीता कृश होऊन सुकत चालली होती. तिनें तापसी वेष धारण केला होता व ती नुसतीं फळें-मुळें खाऊनच केवळ प्राण-धारण करीत होती. तिच्यावर पाहरा करण्यासाठीं रावणानें अनेक क्रूर सशस्त्र राक्षसी ठेवल्या होत्या. 'आपल्या धन्याचा अपमान करून अजून ही स्त्री जिवंत राहिली आहे; हिला फाडून आणि हिचे तिळाएवढे तुकडे करून आपण खाऊन तरी टाकूं या!' असें वरचेवर म्हणून ह्या राक्षसी तिचा वारंवार छळ करीत; व इतरही अनेक प्रकारें तिला भीति दाखवीत व त्रास देत. पण सीता त्यांस एकच निर्वाणीचें उत्तर देत असे. ती म्हणे:—"बायानों, तुम्ही मला खुशाल व लवकर खा.

विना तं पुंडरीकाक्षं न मे लोभोस्ति जीविते ।

**त्या कमलनयन रामचंद्राविना मला माझ्या जीवाबद्दल कांडीचाही लोभ वाटत नाहीं.** रामांवांचून अन्य पुरुषाकडे मी पाहणारही नाहीं. त्यांची पुनः भेट न होईल तर उपवास करून मी हा देह ठेवीन; मला माझ्या प्राणांची मुळींच पर्वा नाहीं. याकरतां तुम्हांला माझें काय करावयाचें असेल तें खुशाल करा!" अशा प्रकारचें सीतेकडून आलेलें उत्तर रावणास कळविण्याकरितां ह्या क्रूर राक्षसी एके समयीं निघून गेल्या असतां, सीतेजवळ एकटी त्रिजटा मात्र होती. त्या राक्षसींमध्यें ही विशेष सात्त्विक व धार्मिक होती. इतर सर्व राक्षसी निघून गेल्याची संधी साधून त्रिजटेनें सीतेचें सांत्वन केलें. ती म्हणाली:—'सखे, तूं माझ्यावर विश्वास ठेवून भीति व काळजी करण्याचें सोडून दे. रावणाजवळ अविंध्य

नांवाचा एक वृद्ध व बुद्धिमान् राक्षस आहे. रामाचें हित करण्याची बुद्धि मनांत उद्भवल्यामुळें त्यानें मला तुला सांगण्यासाठीं निरोप कळविला आहे. राम-लक्ष्मणांचें कुशल असून त्यांनीं तुजसाठीं वानरराज सुग्रीवाशीं सख्य केलें आहे. तो लवकरच रावणाचा वध करून तुझी सुटका करण्याकरतां वानर-सैन्यासह इकडे येणार आहे, मला जीं वारंवार दुष्ट स्वप्नें पडत आहेत व अपशकुन होत आहेत त्यां-वरून रावणाचा नाश लवकरच होऊन राम-लक्ष्मणांची दिगंत कीर्ति होणार, अशी खात्री वाटते. दुष्ट रावणाची तुला भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. कुबेराची सून व नलकूबराची पत्नी रंभा इजवर रावण बलात्कार करीत असतां नलकूबरानें त्यास असा शाप दिला कीं, कोणतीही स्त्री तुला प्रत्यक्ष वश झाल्यावांचून यापुढें तुला तिजशीं बलात्कारानें रममाण होतां येणार नाहीं." त्रिजटेचें हें भाषण ऐकून सीतेस बरेंच समाधान वाटलें व पतीचें पुनः दर्शन होणार, अशी तिला आशाही उत्पन्न झाली. ( वनपर्व अ० २७९ )

पुढें एके दिवशीं सीता अशोक-वनांतील एका शिलेवर नित्या-प्रमाणें दीनपणें पतीसाठीं शोक करीत बसली होती, डोक्यांतील एका सौभाग्यमण्याखेरीज इतर सर्व भूषणांचा तिनें त्याग केला होता, तिचीं वस्त्रें मलीन झालीं असून ती रावणाच्या कारागृहांतील हे दिवस मोठ्या दुःखानें कंठीत होती. अशा वेळीं अंगावर अनेक दिव्य वस्त्रभूषणें घालून, पुष्पहारांनीं मंडित होऊन व किरीटकुंडलें धारण करून सीतेचें मन वश करून घेण्याचे इराद्यानें तिजकडे रावण आला. रावण त्या वेळीं वस्त्रभूषणांनीं नटलेला असल्यामुळें जरी कल्पवृक्षाप्रमाणें शोभत होता, तरी स्मशानांतील वटवृक्षाप्रमाणें भयंकर दिसत होता. तो सौम्यपणाचा आविर्भाव आणून सीतेला

म्हणाला:—" आजपर्यंत पतीबद्दल तूं दाखविलेली आदरबुद्धि पुरे झाली, आतां मंगलवेष धारण करून माझे मनोरथ पूर्ण कर. देव, गंधर्व, यक्ष, राक्षस यांच्या हजारों सुंदर कन्या व अप्सरा माझ्या अंतःपुरांत आहेत. मंदोदरीप्रमाणें त्यांची पट्टराणी मी तुला करतों. कोट्यावधी यक्ष, राक्षस, पिशाच्च हे माझे अंकित आहेत. लोकपालांतील पांचवा लोकपाल असलेला जो विश्रवामुनि त्याचा मी पुत्र असून कुबेर हा माझा भाऊ आहे; मजजवळ इंद्राप्रमाणें ऐश्वर्य व संपत्ति आणि पराक्रम आहे. तर वनवासांतील सर्व कष्टदायक कर्में व तापसवेष टाकून देऊन माझा स्वीकार कर." रावणाचें हें भाषण ऐकून सीतेनें आपलें तोंड झांकून घेतलें; व मध्यंतरीं एक तृण धरून एकसारखे अश्रु गाळीत ती त्यास म्हणाली:—"राक्षस राजा, तुझें असलें भाषण ऐकण्याचा मला अभागिला आजपर्यंत पुष्कळ वेळां प्रसंग आला आहे; परंतु प्रत्येक वेळीं तुझी निराशा झाली आहे. हें लक्षांत आणून असलें वर्तन सोडून दे. प्रयत्न करून मिळविलेली पण क्षुद्र मनुष्यस्त्री असलेली मी ही तुझी भार्या नसून मी तुला अलभ्य अशी परदारा व पतिव्रता आहें, हें लक्षांत ठेव. परस्त्रीवर व तिचे इच्छेविरुद्ध बलात्कार करण्यांत तुला कोणतें सुख किंवा आनंद लाभणार आहे? **माझा आजा ब्रह्मदेव व पिता एक लोकपाल आहे, म्हणून तूं फुशारकी मारतोस; पण त्यांचेप्रमाणें धर्माचें परिपालन कां करीत नाहींस? श्रीशंक**राचा सखा, धनेश व राजेश्वर कुबेर हा माझा भाऊ आहे असें सांगण्यास तुला लाज कशी वाटत नाहीं?" याप्रमाणें उत्तर देऊन आपलें मुख व केश वस्त्रानें झांकून घेऊन सीता मोठमोठ्यानें विलाप करूं लागली. तरी तिची दया न येतां रावण पुनः तिला म्हणाला:—

'माझे शरीरास मदन कितीही दुःख देवो; तूं पूर्ण वश झाल्याशिवाय मी तुजशीं रममाण होणार नाहीं. आम्हां राक्षसांचें भक्ष्य असलेल्या मनुष्याचा—रामाचाच-अजून तूं छंद घेऊन बसली आहेस; तेव्हां आतां आम्हीं काय करावें ?' याप्रमाणें बोलून रावण तेथेंच गुप्त होऊन निघून गेला. ( वनपर्व अ० २८० )

इकडे वालीचा वध व सुग्रीवाचा राज्याभिषेक होऊन दोन महिने लोटत आले तरी सीतेच्या शोधाची गोष्टही सुग्रीव काढीत नाहीं, असें पाहून रामांस अत्यंत विषाद वाटला. एके दिवशीं सकाळीं ते लक्ष्मणास म्हणाले:—"वालीचा वध करून या सुग्रीवास मी राज्य दिलें; परंतु सीतेचा शोध लावण्याचा प्रयत्न हा अद्याप करीत नाहीं. हा कृतघ्न वानराधम मजकडे किंवा आपल्या प्रतिज्ञेकडे लक्ष न देतां किष्किंधेंत राहून विषयोपभोगांतच दंग झाला आहे ! असला पुरुष आपली प्रतिज्ञा कशी पुरी करणार व माझा उपकार तरी कसा फेडणार? तूं आतां किष्किंधेंत जाऊन त्या वानरराजाचा शोध कर; आणि तो असाच कृतघ्नपणा व विश्वासघात करणार असेल, तर त्यास वालीचे पाठोपाठ यमसदनीं पाठीव." रामाचें हें भाषण ऐकून लक्ष्मण धनुष्यबाण घेऊन किष्किंधा नगरींत गेला; व आपल्या वडील भावाचें सर्व भाषण त्यानें सुग्रीवास विदित केलें. तेव्हां सुग्रीव नम्रपणानें त्यास म्हणाला:—"तूं किंवा रामचंद्रानीं मजवर राग करण्याचें कारण नाहीं. त्यांस वाटलें तसा मी दुष्ट, नीच, कृतघ्न किंवा निर्दय नाहीं. सीतेचा शोध करण्यासाठीं मीं चारी दिशांस विश्वासू वानरदूत पाठविले आहेत; व एक महिन्याचे आंत परत यावयाचा त्यांनीं करार केला आहे. एका महिन्याचीही मुदत भरण्यास अद्याप पांच दिवसांचा अवकाश आहे."

हीच सर्व हकीकत सुग्रीवादिकांनींही माल्यवान् पर्वतावर येऊन स्वतःही रामचंद्रांस सांगितली. तेव्हां त्याचा क्रोध शांत झाला. पांच दिवसांनीं तीन दिशांकडे गेलेले वानरदूत परत आले; व सीतेचा किंवा रावणाचा कोठेंच शोध लागत नाहीं, असें त्यांनीं सुग्रीव व रामचंद्र यांस कळविलें. दक्षिण दिशेकडे गेलेले हनूमान्, अंगद वगैरे वानर मात्र परत आले नव्हते. त्यांच्या येण्याकडे डोळे लावून राम-लक्ष्मण तेथें दिवस कंठित होते. एक महिन्याचे ऐवजीं दोन महिने होऊन गेल्यावर सुग्रीवाकडे येऊन कित्येक वानरांनीं अशी बातमी सांगितली कीं, दक्षिणेकडे पाठविलेले हनूमानादि वानर परत आले असून ते वालीनें व तुम्हीं स्वतः-साठीं रक्षण करून ठेवलेलें मधुवन विध्वंसित असून तेथील मधूचें यथेष्ट पान करीत आहेत! सोंपविलेल्या महत्कार्यांत यश आल्यामुळें जो आनंद झाला, त्याचे भरांत हनूमानादि वानर अशी क्रीडा करीत आहेत, असें ध्यानांत येऊन सुग्रीवास याबद्दल राग न येतां आनंदच वाटला. त्यानें हें वर्तमान रामांस जाऊन सांगितलें. कांहीं दिवसांनीं हनूमान्, अंगद वगैरे वानर सुग्रीवासह रामचंद्रांकडे आले. हनूमानाची चालण्याची ढब व चेहऱ्याचा रंग वगैरें-वरून सीतेचा शोध त्यांस लागला असावा, असें रामानीं आधींच अनुमान केलें होतें. ते समीप येतांच राम त्यांस म्हणाले :— " तुम्ही कृतकृत्य झालांत काय? शत्रूला मारून व वैदेहीला मुक्त करून मी पुनः अयोध्येचें राज्य करणार काय? युद्धांत रावणाचा वध न होईल व माझे हातून जानकीची मुक्तता न होईल, तर बायको दुसऱ्यानें हरण करून नेल्यामुळें सर्वांनीं तिरस्कृत केलेला असा मी मुळींच जीवंत राहणार नाहीं. " रामांचें

हें भाषण ऐकून हनूमानानें आपल्या लंकागमनाची व सीता-शोधाची हकीकत त्यांस विस्तारानें सांगितली. तो म्हणाला :— " तुम्हांस प्रिय असें वर्तमान मी तुम्हांला सांगणार आहें. सीता मीं प्रत्यक्ष पाहिली असून तिची खूणही आणली आहे. दक्षिण दिशेकडे शोध करीत असतां महिन्याची मुदत संपून गेली, तरी सीतेचा शोध लागेना. मग आम्ही एका मोठ्या निबिड व विस्तीर्ण अशा गुहेंत शिरलों. तीमध्यें बरेच दिवस मार्ग-क्रमण केल्यावर आम्हांस मयासुराचें मंदिर लागलें. तेथें प्रभावतीनामक स्त्री तपश्चर्या करीत होती. तिनें दिलेलीं भक्ष्य-भोज्यें व पेयें यांचें सेवन केल्यावर आम्हांस अधिक उत्साह व सामर्थ्य आल्यावर, तिनें सांगितलेल्या मार्गानेंच आम्ही आणखीं बरेच पुढें गेलों. तों गुहेच्या बाहेर पडल्यावर आम्हांस समुद्र दिसूं लागला. त्याचे नजीकच सह्य, मलय व दर्दुर हे पर्वत होते. ठरलेली मुदत संपून गेली, पण पुढें समुद्रानें मार्ग कुंठित केला, आणि सीतेचा तर शोध लागत नाहीं; असें पाहून आमची अतिशय निराशा झाली. **धन्यानें सोंपविलेलें कार्य तडीस न नेतां परत जाऊन त्यास अपेशी तोंड दाखविण्यापेक्षां त्या कार्यांतच मरण आलें तरी तें श्रेयस्कर होय,** असें जाणून आम्हीं सर्वांनीं तेथेंच राहून प्रायोपवेशनानें प्राणत्याग करण्याचा निश्चय केला. आमचें आपसांत बोलणें चाललें असतां जटायूची गोष्ट निघाली. तेव्हां त्यासंबंधाचें आमचें बोलणें ऐकून एक प्रचंड गृध्र आमचेकडे येऊन म्हणाला कीं, ' माझा भाऊ जटायु यासंबंधानें तुम्ही काय बोलत आहां? त्याचें काय वर्तमान आहे? ' हा प्रश्न ऐकून आम्हीं त्यास सीताहरण, जटायु-वध व आमच्या प्रायोपवेशनाचें कारण

यांसंबंधाची सर्व हकीकत निवेदन केली. तेव्हां तो म्हणाला:— ' मी संपाति व जटायु हे भाऊ भाऊ असून एकमेकांचे स्पर्धेनें आम्हीं सूर्यमंडळाकडे उड्डाण केलें. त्याच्या तेजानें माझे पंख जळून गेले, तसे जटायूचे जळाले नाहींत. त्यामुळें त्यानें सूर्यमंडळ गाठलें, पण मी मात्र या पर्वतावर दीन होऊन पडलों आहें. मला हा रावण माहीत आहे; त्याची राजधानी लंका ही असून ती ह्या समुद्राचे परतीरावर त्रिकूटपर्वताचे खोऱ्यांत वसली आहे. सीतेला नेऊन त्यानें तेथेंच ठेवलें असलें पाहिजे, अशी मला खात्री वाटते. " संपातीचें हें भाषण ऐकून पुनः आम्हांस आशा उत्पन्न झाली. समुद्राचें उल्लंघन कसें करावें, याबद्दल आम्हीं पुष्कळ विचार केला; पण उपाय सुचेना. शेवटीं मीं जलराक्षसीला मारून आपला पिता मारुत याचे आश्रयानें तो तरून गेलों. लंकेमध्यें रावणाच्या अंतःपुरांत प्रतिबंधांत ठेवलेली सीता माझे दृष्टीस पडली. ती अत्यंत कृश व दीन झाली असून उपवास, तप व पतिचिंतन यांतच कालक्रमण करीत आहे. मीं तरी तिला याच लक्षणावरून ओळखलें. ' रामांचा दूत म्हणून मी हनूमान् वानर आलों आहें; मी राक्षस नव्हे ' राम-लक्ष्मणांचें कुशल आहे. ते लवकरच लंकेवर चाल करून येऊन तुझी मुक्तता करतील ' असें सांगून मीं तिला धीर दिला. तिनें कांहीं वेळ विचार करून मला उत्तर दिलें:—' अविंध्य नांवाच्या वृद्ध व सात्त्विक राक्षसाकडून मला हें सर्व कळलें आहे; व तूं हनूमान् असून तुझ्यासारखेच सुग्रीवाचे सचिव आहेत, हेंही मला त्यानें सांगितलें आहे. तूं आतां परत जा ' असें म्हणून, आजपर्यंत ज्याच्यामुळें सीतेनें प्राण धारण केले होते, तो डोक्यांतील मणि तुम्हांला खूण म्हणून देण्या-

करितां मजपाशीं दिला. आणि शिवाय मला **सीते**चा शोध लागला याची पक्की खूण म्हणून **चित्रकूट** पर्वतावर तुम्हीं ईषिका सोडून कावळ्याचें शासन केलें, ही गोष्ट तुम्हांला सांगण्यास सांगितली आहे. तेथून निघाल्यावर बाहेर येऊन मी **लंके**स आग लावून दिली, व **सीते**चा शोध लागल्याचें वर्तमान तुम्हांस कळविण्यासाठीं त्वरेनें परत आलों." ( वनपर्व, अ० २८१ )

**सीते**चा याप्रमाणें पक्का शोध लागल्यानंतर **राम**-सहाय्यार्थ **लंके**वर स्वारी करण्याची तयारी **सुग्रीवा**नें केली. **वाली**चा सासरा **सुषेण**, **गय**, **गवय**, **गवाक्ष**, **गंधमादन**, **पनस**, **दधिमुख**, **जांबवान**, **नल**, **नील**, **क्राथ**, वगैरे वानरांचे अनेक मांडलिक राजे आपापलें सैन्य घेऊन जमले. स्वारीची सर्व तयारी झाल्यानंतर शुभ मुहूर्तावर हें वानरसैन्य **लंके**कडे व्यवस्थेनें चाल करीत निघालें. सैन्याचे अघाडीस **हनुमान्** व पिछाडीस **लक्ष्मण** असे चालले होते. याप्रमाणें सैन्य चाल करीत करीत समुद्राजवळ येऊन ठेपलें. सागर ओलांडून कसें जावें, याबद्दल विचार निघाला. तेव्हां कित्येक वानर म्हणाले ' हा समुद्र सर्व वानरसैन्य उड्डाण करूनच ओलांडून जाईल. ' इतरांचे मतें मोठमोठ्या नावांचे साह्यानें पलीकडे जावें; कित्येक म्हणाले कीं, ' लहान लहान होड्यांचे योगानें समुद्र तरून जावें. ' पण ह्या मसलती **रामां**स पसंत पडल्या नाहींत. ते म्हणाले:"—समुद्र दुस्तर असून आपलें सैन्यही मोठें आहे. इतकें सैन्य नावांतून, होड्यांतून किंवा अन्य साधनांनीं परतीरीं नेणें शक्य नाहीं. इतक्या नावाही आपणाजवळ नाहींत. शिवाय **नावांकरतां वणिजांना त्रास देणें मजसारख्यास केव्हांच पसंत पडणार नाहीं.** हा दुस्तर समुद्र या

साधनांनीं उल्लंघन करून जात असतां शत्रूसही आपणावर हल्ला करण्यास ती उत्तम संधी मिळेल. याकरतां हे सर्व उपाय निरुपयोगी आहेत. " याप्रमाणें बरीच भवति न भवति होऊन अखेर विश्वकर्म्याचा पुत्र जो नल त्याजकडून समुद्रांत १०० योजनें लांब व १० योजनें रुंद असा सेतु तयार करण्याचें ठरलें. नलानें काष्ठ, तृण व शिला यांचे योगानें हा सेतु निर्माण केला; तेव्हांपासून त्यास नलसेतु हें नांव पडलें. इतक्यांत रावणाचा भाऊ बिभीषण हा चार सचिवांसह रामांकडे आश्रयास आला. हा रावणाचा गुप्त हेर आला असावा, अशी सुग्रीवास शंका आली. परंतु त्याचें एकंदर वर्तन पाहून रामांस त्याचा इतका विश्वास पटला कीं, त्यानीं त्यास तेथें सर्व राक्षसांचा राजा या नात्यानें राज्याभिषेकही केला ! नंतर बिभीषणानें दाखविलेल्या मार्गानें एक महिन्याचे आंत सेतु ओलांडून वानरसैन्य पलीकडे गेलें. लंकेबाहेरचीं अनेक उपवनें वानरांनीं उध्वस्त करून टाकलीं. तेथें शुक-सारणनामक दोन राक्षसहेर वानर—रूपानें हिंडत असलेले आढळले. पण त्यांस बिभीषणानें ओळखून पकडलें व रामाचे स्वाधीन केलें. त्यांस आपलें सर्व सैन्य दाखवून रामानीं त्यांची मुक्तता केली. लंकेचेभोंवतीं सर्व वानरसैन्याचे तळ पडल्यानंतर अंगदास अखेरचें सामाचें बोलणें करण्यासाठीं दूत म्हणून रामानीं रावणाकडे पाठविलें. ( वन० अ० २८२ )

वानरसैन्यासह राम लंकेकडे आले असून त्या सैन्याचा तळ नजीकच पडला आहे, हें ऐकून रावणानेंही लंका नगरीच्या संरक्षणाची कडेकोट तयारी केली. नगरीचे दरवाजे, सात तट व सात खंदक या जागीं ठिकठिकाणीं शतघ्नी ( तोफा ) वगैरे ठेवून

तेथें हत्यारबंद राक्षससैन्याच्या तुकड्याही ठेवल्या. इकडे अंगदानें रामाचा दूत म्हणून रावणाचे राजसभेंत येऊन त्यास आपल्या स्वामीचा निरोप मोठ्या आवेशानें सांगितला. तो म्हणाला:—
" रामचंद्राचें तुला असें सांगणें आहे कीं, "

अकृतात्मानमासाद्य राजानमनये रतं ।
विनशन्त्यनयाविष्टा देशाश्च नगराणि च ॥

**राजा अविचारी व आत्मसंयमनशून्य झाला कीं, हा अविचार व ही संयमनशून्यता सर्व राज्यांत पसरून परिणामीं नगरें किंबहुना देशचे देश उध्वस्त करून टाकते.** सीतेचें बलात्कारानें हरण करून तूं एकट्यानें माझा महान् अपराध केलास; परंतु ह्या तुझ्या एकट्याच्या–राजाच्या–अपराधास्तव इतर अनेक निरपराध्यांचा विनाकारण वध होण्याचा समय आला आहे. आपल्या बलाच्या व पराक्रमाच्या घमेंडींत आजपर्यंत तूं अनेक वनवासी ऋषि मारलेस, देवांचा उपमर्द केलास, राजर्षींचे प्राण घेतलेस व आक्रोश करणाऱ्या स्त्रियांस भ्रष्ट केलेंस. या सर्व अविचाराबद्दल प्रायश्चित्त भोगण्याची आतां वेळ आली आहे; वीरपुरुषाप्रमाणें आतां युद्धास सज्ज हो. आज मी तुला माझ्या धनुष्याचा प्रभाव व तूं क्षुद्र मानलेल्या माणसांचा पराक्रम दाखवून तुझ्या अमात्यांसह तुला यमसदनीं पाठविणार; किंबहुना आतां लवकरच ही भूमि अराक्षस होणार. हें व्हावयास नको असेल तर सीतेला तूं मुकाट्यानें मुक्त कर ! ' अंगदाचें हें भाषण ऐकून रावणास अत्यंत क्रोध आला. तें पाहतांच चार राक्षसांनीं अंगदास चारी बाजूंनीं वेढून धरलें. पण त्यानें त्या चारी राक्षसांसह एकदम वर उड्डाण करून अंग झाडलें. त्यासरशीं ते चारी राक्षस

भूमीवर पडून तत्काळ मरण पावले. अंगद वेगानें नगरींतून बाहेर निघून वानरसैन्यांत आला; आणि रावणाचे राजसभेंत घडलेला सर्व प्रकार त्यानें रामचंद्रांस निवेदन केला. लागलींच वानरसैनिकांनीं लंकेच्या चोहोंबाजूंनीं एकदम हल्ला केला. रामचंद्रानीं एका बाजूनें तट फोडून आंत प्रवेश केला; बिभीषण, जांबवान व लक्ष्मण हे सैन्यासह दक्षिण नगरद्वारांतून आंत घुसले! तटाचे आंत प्रवेश होतांच वानरांनीं तेथील मंदिरें, शस्त्रास्त्रें, बागा यांचा एकसारखा विध्वंस मांडला. हातीं येतील त्या तोफा, त्यांचीं चाकें व गोळे हीं सर्व उचलून ते लंकेवर फेंकूं लागले. छाप्याचे वेळचा पहिला बेसावधपणा, आश्चर्य व गोंधळ शांत झाल्यावर राक्षससैन्यही मोठ्या निकरानें लढूं लागलें. लवकरच उभय पक्षांची हात-घाईची लढाई सुरू झाली. दुर्गावर ठेवलेले निवडक राक्षस लक्ष्मणानें बाण मारून ठार केले; रामाचे अमोघ बाणही लंकेंत येऊन राक्षसांचा झपाट्यानें वध करूं लागले. याप्रमाणें बराच वेळ तुमुळ युद्ध झाल्यावर रामचंद्रांचे आज्ञेनें युद्ध बंद करून सैन्य रात्रींचे विश्रांतीसाठीं जेथल्या तेथेंच राहिलें. ( वन० अ० २८३ )

कांहीं वेळानें लंकेंतून क्षुद्र राक्षस व पिशाच यांचें सैन्य बाहेर पडलें; व गुप्त राहून वानर सैन्याचा संहार करूं लागलें. तेव्हां राक्षसी माया व राक्षसी युद्धकला जाणणाऱ्या बिभीषणानें त्यांचा एकसारखा ‘ अंतर्धानवध ’ चालविला. तो सहन न होऊन जे प्रगट झाले, त्यांची वानरांनीं कत्तल केली. तेव्हां रावणानें त्यांहून बलवान् अशा राक्षसांचें सैन्य लंकेबाहेर पाठवून ‘ औशनस ’ व्यूहरचनेनें तें उभें करविलें. त्याशीं दोन हात करण्याकरितां रामचंद्राना वानर सैन्याचा ‘ बार्हस्पत्य ’ व्यूह रचला. याप्रमाणें व्यूहरचना पूर्वक

युद्ध सुरू झाल्यानंतर आपआपल्या बाहुबलास अनुरूप असे परपक्षांतील योद्धे पाहून त्याशीं प्रत्येक वीर लढूं लागला. ह्या व्यूढ-युद्धांतील पहिला निकराचा हल्ला प्रहस्तनामक राक्षसानें बिभीषणावर केला. त्यानें लवकरच त्यास गांठून त्याजवर गदेचा प्रचंड प्रहार केला. पण बिभीषणानें न डगमगतां त्याजवर घंटा लावलेली अमोघ शक्ति सोडली. ह्या शक्तीच्या प्रहारानें प्रहस्ताचें शीर धडापासून वेगळें होऊन तो रणभूमीवर पडला! प्रहस्ताचा पहिला बळी रणदेवतेला मिळालेला पाहतांच धूम्राक्ष राक्षसानें वानर सैन्यावर अधिक निकरानें व जोराचा हल्ला केला. तेव्हां त्याच्या पहिल्या प्रचंड वेगापुढें वानरसैन्याचा टिकाव लागेनासा होऊन तें कच खाण्याची वेळ आली. तेव्हां स्वतः हनूमान् पुढें होऊन आवेशानें युद्ध करूं लागला; इतर वानरांसही हिंमत येऊन ते अधिक निकरानें लढूं लागले. धूम्राक्ष व हनुमान् यांचें बराच वेळ तुमुल युद्ध झालें, राक्षस गदा व परिघ यांनीं व वानर पाषाणांनीं व वृक्षांनीं प्रतिपक्ष्याशीं लढत होते. अखेर हनूमानानें धूम्राक्षास सारथि व घोडे ह्यांसह ठार केलें. वानरसैन्याचा असा दुसरा जय झालेला पाहतांच त्यांस विशेषच स्फुरण चढलें, त्यांनीं बाणांनीं असा वेगाचा हल्ला केला कीं राहिलेलें राक्षससैन्य पराभूत होऊन लंकेंत परत गेलें! प्रहस्त व धूम्राक्ष ह्या मुख्य राक्षसवीरांचा हजारों योध्यांसह नाश झालेला पाहून कुंभकर्णास जागा करण्याची आवश्यकता रावणास वाटूं लागली. अनेक मोठमोठ्या वाद्यांचा एकसारखा गजर केल्यावर कुंभकर्ण जागा झाला. स्नानभोजनादिकांनीं व विश्रांतीनें महानिद्रेंतील मंदत्व नाहींसें झाल्यावर रावणानें लंकेवर आलेलें 'दारुण महत्संकट' त्यास निवेदन केलें. 'रामचंद्रांची भार्या सीता मीं

हरण करून आणली आहे; तिला परत नेण्याकरितां तो वानरसन्यासह लंकेवर आला आहे. समुद्रांत सेतु बांधून त्यावरून त्यानें हें सैन्य आणलें असून प्रहस्त-धूम्राक्षादि आपले शूर वीर त्यांनीं मारले आहेत. तर आतां ह्या वानरसैन्याचा समाचार घेण्याचें काम तुझ्यांवांचून कोणासही करतां येणार नाहीं.' याप्रमाणें रावणाचें भाषण ऐकून कुंभकर्ण सज्ज होऊन युद्धास निघाला. त्याचे संरक्षणार्थ व साहाय्यार्थ दूषण राक्षसाचे धाकटे भाऊ वज्रवेग व प्रमाथि यांस रावणानें त्याजबरोबर पाठवून दिलें. कुंभकर्ण वानरसैन्यासमोर येऊन एवढा पराक्रमी राम तो कोणता, म्हणून पाहूं लागला; तों त्यास समोर लक्ष्मण दिसला. तोच राम असें समजून तो त्याजवर चालून जाऊं लागला. तेव्हां हजारों वानरांनीं त्यास वेढून त्याजवर प्रहार चालविले. परंतु कुंभकर्णानें नुसतें हांसून त्यांस खाऊन टाकण्याचा सपाटा चालविला! कुंभकर्णाचें हें भयंकर कर्म पाहून तारप्रभृति वानरांनीं एकच हलकल्लोळ केला. तो ऐकून वानरराज सुग्रीव यानें कुंभकर्णावर हल्ला करून त्याचे डोक्यावर शालवृक्षाचा प्रचंड प्रहार केला. तेव्हां कांहींसें सावध होऊन कुंभकर्णानें वानर खाण्याचें काम किंचित् बंद केलें, व सुग्रीवास नुसतें हातांनींच उचलून घेऊन तो लंकेकडे निघाला. रामांच्या मुख्य साहाय्यकर्त्यावर आलेला हा कठिण प्रसंग पाहून लक्ष्मण पुढें सरसावला. त्यानें एकच अमोघ बाण कुंभकर्णावर टाकला. त्या बाणानें त्याचें कवच व वज्रासारखें कठिण शरीर हीं विदारण केलीं! तेव्हां सुग्रीवास सोडून देऊन व हातांत मोठी शिला घेऊन लक्ष्मणाचे अंगावर तो धावला. लक्ष्मणानें दोन तीक्ष्ण 'क्षुर'-प्रकारचे बाण काढून त्यांनीं कुंभकर्णाचे दोनही हात तोडले. त्याबरोबर राक्षसीमायेमुळें त्या जागीं चार हात उत्पन्न

झाले ! तेही लक्ष्मणानें तोडले, तरी पुनः चारांचे सहा हात झाले ! याप्रमाणें कुंभकर्णाचें शरीर, हात, पाय, डोकीं, हीं वाढत चाललेलीं पाहून लक्ष्मणानें निर्वाणीचें ब्रह्मास्त्र त्याजवर सोडून त्याचा वध केला ! कुंभकर्णासारख्या अत्यंत पराक्रमी व बलिष्ठ राक्षसवीराचा वध झालेला पाहून राक्षससैन्य हताश होऊन पळावयास लागलें. पण वज्रवेग व प्रमाथि यांनीं विशेष नेट धरून लक्ष्मणावर अधिक निकरानें हल्ला केला. हे दोघे दूषण-बंधु व लक्ष्मण यांचें दोन घटका फारच तुंबळ युद्ध झालें. अखेर हनुमानानें वज्रवेग यास व नीलानें प्रमाथि राक्षसास, मोठ्या शिला त्यांचे अंगावर फेंकून, यमसदनीं पाठविलें. तेव्हां आणखी थोडा वेळ राक्षस सैन्य दानरांशीं लढून पराभूत होऊन लंकेंत परत गेलें. ( वनपर्व, अध्याय २८४-२८६

राम-लक्ष्मणापुढें कुंभकर्णासारख्या पराक्रमी राक्षसवीराचीही मात्रा न चालतां त्यांनीं त्याचा वधच केला, हें पाहून रावणाचें मन उद्विग्न झालें. तरी प्रत्यक्ष इंद्राला युद्धामध्यें जिंकून ज्यानें स्वतःचें यश व आपली कीर्ति गाजविली, तो आपला इंद्रजित् पुत्र कुंभकर्णाचे हातूनही जें महत्कार्य झालें नाहीं तें सहज करील, असा रावणास भरंवसा वाटूं लागला; व त्यास अनुसरून त्यानें इंद्रजितास प्रोत्साहन देऊन राम-लक्ष्मणांशीं युद्ध करण्यास लंकेबाहेर पाठविलें. वानरसैन्यासमोर येऊन इंद्रजितानें आपलें नांव मोठ्यानें सांगून लक्ष्मणास युद्धास आव्हान केलें. उभयतांही वीर अस्त्रवेत्ते असल्यामुळें त्यांचें फारच तुमुळ युद्ध झालें. आपलें अस्त्रविद्येचें तेज लक्ष्मणापुढें फिकें पडतें, असें पाहून अखेर इंद्रजितानें त्याजवर तोमर टाकलें. परंतु लक्ष्मणानें तीक्ष्ण बाण सोडून तें मध्यें तोडलें. इतक्यांत अंगदानें इंद्रजितावर चाल

करून एका वृक्षाचा प्रहार त्याचे मस्तकावर केला. तेव्हां इंद्र-जितानें संतापून अंगदावर फेंकण्यासाठीं एक प्रास ( भाला ) हातीं घेतला, पण तोही लक्ष्मणानें बाणांनीं मोडून टाकला! तेव्हां इंद्रजितानें आपली गदा घेऊन तिचा प्रचंड प्रहार अंगदाचे उजव्या कुशीवर केला; अंगदानेंही अधिक त्वेषानें शालवृक्षाची एक मोठी फांदी घेऊन ती इंद्रजितावर फेंकली. त्यामुळें त्याचा रथ, सारथि व अश्व यांचा चुराडा उडाला! याप्रमाणें विरथ होतांच इंद्रजित् राक्षसी मायेचा आश्रय करून गुप्त झाला! आणि स्वतः अदृश्य राहून वानरसैन्य व राम-लक्ष्मण यांजवर बाणांचा वर्षाव करूं लागला. इंद्रजिताचे मात्र बाण सर्वांस येऊन लागत; पण राम-लक्ष्मणांचे बाण किंवा वानरांच्या शिळा यांचा मारा इंद्रजितावर कांहींच चालेना! याप्रमाणें एकतर्फी युद्ध झाल्यावर राम-लक्ष्मण बाणांनीं जर्जर व जखमी होऊन भूमीवर पडले. इंद्रजितानें लगट करून त्या दोघांसही शरबंधानें बांधून तेथेंच निश्चेष्ट पाडलें! तेव्हां सुग्रीव, हनुमान्, अंगद वगैरे वानर वीर पळून न जातां त्यांचे भोंवतीं जमले, व त्यांचें संरक्षण करीत लढूं लागले. कुंभकर्णाचाही वध करणाऱ्या राम-लक्ष्मणांस आपण मूर्च्छित व शरबंधांनीं बद्ध केलें, हें वर्तमान रावणास सांगण्याकरतां इंद्रजित् मोठ्या उल्हासानें व विजयोत्साहानें लंकेंत परत गेला. इकडे बिभीषणानें राम-लक्ष्मणांकडे येऊन त्यांस प्रज्ञास्त्राचे योगानें सावध केलें; व मंत्रांनीं अभिमंत्रित केलेल्या एका महौषधीचे योगानें सुग्रीवानें त्यांचे अंगांत रुतलेले सर्व बाण काढून टाकले! इतक्यांत दिव्य मंत्रांनीं युक्त असलेलें उदक घेऊन कुबेराकडून एक गुह्यक आला. त्यानें दिलेलें हें पाणी नेत्रांस लावतांच राम-लक्ष्मणांचे डोळ्यांस अतीं-

द्रिय वस्तूही स्पष्ट दिसूं लागल्या. रामानीं ह्या दिव्य उदकाचा केवळ स्वतः पुरताच उपयोग न करतां तें सुग्रीव, अंगद, हनूमान् वगैरे सर्व प्रमुख वानरवीरांस देऊन त्यांसही या बाबतींत आपल्या बरोबरीचें केलें. इंद्रजिताची राक्षसी माया ऊर्फ अंतर्धानविद्या याप्रमाणें विफल झाल्यानंतर पुनः इंद्रजित् नगराबाहेर येऊन लढूं लागला. राक्षसी माया निरुपयोगी झाल्याचें ध्यानांत आलें, तरीही इंद्रजित् लक्ष्मणाशीं अधिक निकरानें व आवेशानें लढत होता. अखेर लक्ष्माणानें तीन अमोघ व निर्वाणीचे बाण हातीं घेतले; व एकानें इंद्रजिताचा धनुष्य धरलेला हात तोडून टाकला, दुसऱ्यानें बाण घेतलेला हात छेदून टाकला आणि तिसऱ्या अधिक तीक्ष्ण व सतेज बाणानें त्याचें शिर उडविलें व त्याचा सारथिही ठार केला. दोनही हात व शिर तुटून गेलेलें असें इंद्रजिताचें धड आंत असलेला रथ घोड्यांनीं उधळून जाऊन लंकेंत परत आणला. कुंभकर्णाचे पाठोपाठ आपल्या पुत्राचाही असा भयंकर रीतीनें वध झालेला पाहून रावणाच्या दुःखशोकास व क्रोधास सीमाच राहिली नाहीं. ह्या रागाच्या व पुत्रशोकाच्या भरांत हातांत खड्ग घेऊन सीतेचा वध करण्यासाठीं रावण अशोकवनिकेकडे धांवला! रावणाचा हा दुष्ट व नीच हेतु अविंध्य राक्षसाचे लक्षांत येऊन त्यानें सीतेचे प्राण वांचविण्याचा निश्चय केला. आपल्या स्वामीवर आपली मोठी निष्ठा व भक्ति आहे, असा आव आणून अविंध्य त्यास म्हणाला:—“ तुम्हीं राक्षसराज्याचे महाराज असल्यामुळें अशी स्त्रीहत्या करणें योग्य नाहीं. ह्या अबला स्त्रीस हरण करून तुम्हीं जव्हां आपल्या अंतःपुरांत आणून अटकेंत ठेवलेंत तेव्हांच ती मेलेली आहे. हिला जर तुम्हांस खरोखर

मारावयाची असेल तर तें कार्य हिचें शरीर विच्छिन्न केल्यानें होणार नाहीं. तुम्ही हिच्या नवऱ्याला रणांत मारा, म्हणजे ही आपोआपच–तुम्हांस स्त्रीहत्येचा दोष न लागतां–मरेल. तुम्हीं इंद्रासुद्धां सर्व देवांस अनेक वेळ जिंकलें आहे; तुम्हांस ही गोष्ट अशक्य आहे असें नाहीं." अविंध्याचें हें भाषण ऐकून रावणास संतोष वाटून त्याचा राग शांत झाला. **ज्या दुष्ट पुरुषामध्यें क्रोधापेक्षां अहंमन्यतेचा प्रादुर्भाव जास्त असतो, तो गोड स्तुतीमुळें त्याच्या गर्विष्ठ स्वभावाचें समाधान होत असल्यामुळें, प्रसंगीं रागही सोडण्यास तयार होतो.** तसेंच या वेळीं रावणाचें झालें. त्यानें सीतेचा वध करण्यासाठीं उपसलेली तरवार म्यानांत घातली; व युद्धासाठीं रथ सिद्ध करण्याची सेवकांस आज्ञा करून रावण तेथून निघून गेला. (वन. अध्याय २८७-२८८)

भ्राता कुंभकर्ण व पुत्र इंद्रजित् यांच्या वधाचा सूड उगविण्याचे ईर्षेनें रावण निवडक राक्षसवीरांसह राम-लक्ष्मणांवर आवेशानें चालून आला. ज्याच्या वधासाठीं रामचंद्रानीं एवढा खटाटोप केला, तो राक्षसराज स्वतः युद्धास आलेला पाहतांच सुग्रीवादि-वानरवीरांनीं सैन्यासह त्यास वेढलें, व त्याच्या सैनिकांचा फडशा उडविण्यास सुरवात केली. हें पाहून रावणानें राक्षसी मायेचे योगानें लक्षावधि राक्षस, राम-लक्ष्मणांच्या व वानरवीरांच्याच रूपांचे उत्पन्न केले, व त्यांचाच संहार त्यानें सुरू केला! तेव्हां रामचंद्रानीं लक्ष्मणाचे सूचनेवरून हे सर्व रामरूपधारी राक्षस बाणांनीं ठार केले. इतक्यांत प्रत्यक्ष इंद्राचा 'जैत्र' रथ घेऊन मातली तेथें आला. व 'देव-शत्रु रावणाशीं यांत बसून लढा' अशी त्यानें रामचंद्रांस विनंति केली. हीही रावणाची एक मायाच

असेल असें वाटून राम रथांत बसण्यास कांकूं करूं लागले. परंतु मायाविद्या जाणणाऱ्या बिभीषणानें, हा रथ मायावी नाहीं अशी खात्री करतांच राम त्यांत बसून युद्ध करूं लागले. राम-रावण हे वीर एकमेकांचे रथास रथ भिडवून लढूं लागले. तेव्हां बराच वेळ अनुपमेय असें तुंबळ युद्ध झालें. रावणानें मायेनें अनेक शस्त्रास्त्रें उत्पन्न करून तीं रामांवर सोडलीं, पण तीं सर्व त्यानीं क्षणांत तोडून टाकलीं. आपल्या अस्त्रविद्येचा, राक्षसी मायेचा, पराक्रमाचा व सामर्थ्याचा रामचंद्रांपुढें कांहींच टिकाव लागत नाहीं, यावरून आपल्या पापाचे घडे भरले, असें पाहून रावणाचे मनांत भीति उत्पन्न झाली. तरी निराशेमुळें उत्पन्न होणाऱ्या अपूर्व आवेशानें तो लढत होता. अखेर रामचंद्रानीं सोन्याचीं पिसें लावलेला एक उत्कृष्ट व अमोघ बाण काढून धनुष्यास जोडला; व तो ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रित करून रावणावर सोडला; तों रावणाचा रथ एकाएकीं पेटून त्या भडक्यांत तो रथ, सारथि, घोडे व खुद्द रावणही क्षणार्धांत जळून खाक झाले! त्या ब्रह्मास्त्राचें तेज इतकें प्रखर होतें कीं, त्यानें रावणाचें शरीर समूळ नष्ट केलें इतकेंच नव्हे, तर त्याची रक्षाही शिल्लक राहिली नाहीं! (वन० अ० २८९.)

रावणाचा याप्रमाणें वध करून रामानीं देवमानव यांची क्लेशांतून मुक्तता करतांच आकाशांतून त्यांजवर पुष्पवृष्टि झाली. रामांनीं लंकेचें राज्य आपला सहाय्यकर्ता बिभीषण यास अर्पण केलें. नंतर सीतेस पालखींत बसवून तीसह बिभीषण व अविंध्य राक्षस रामांकडे आले; तेव्हां ' साध्वी सीतादेवी तुम्हांकडे आणली आहे तिचा स्वीकार करा ' अशी अविंध्यानें रामांस विनंति केली. ती

ऐकून रामचंद्र रथांतून उतरून पालखीकडे गेले. मलिन झालेलें व काळें वस्त्र नेसलेली, विरहानें व शोकानें कृश झालेली, आणि वेणी फणी न केल्यामुळें दीन दिसणारी अशी सीता पतिदर्शनामुळें तोंडावर अधिक तेज येऊन आनंदाश्रूंनीं न्हालेली आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. पण तिच्याकडे क्षणभर संशययुक्त मुद्रेनें पाहून रामचंद्र तिला म्हणाले:—' हे वैदेही, ( विदेह देशचे राजकन्ये ) मला जें कार्य करावयाचें होतें तें करून मीं तुला मुक्त केली आहे. तुझी इच्छा असेल तिकडे आतां तूं जा. माझी बायको असूनही रावणाच्या कारागृहांतच वार्धक्य येईपर्यंत तुला राहावें लागलें, असा प्रसंग तुजवर येऊं नये याच हेतूनें मीं रावणाचा वध केला आहे. धर्म व नीति यांचीं तत्त्वें जाणणारे माझ्यासारखे पुरुष परहस्तगत झालेल्या स्त्रीचा पुनः क्षणभर तरी कसा स्वीकार करतील ?

सुवृत्तामसुवृत्तां वाप्यहं त्वाऽमथ मैथिलि ।
नोत्सहे परिभोगाय श्वावलीढं हविर्यथा ॥

तुझें पातिव्रत्य भ्रष्ट झालेलें असो कीं कायम राहिलेलें असो; कुत्र्यानें चाटलेल्या हविर्भागाप्रमाणें तूं झाली असल्याकारणानें तुझा स्वीकार करण्याचें माझे मनांत येत नाहीं. धर्मनीतिनिष्ठेपुढें स्त्री-प्रेमास तुच्छ लेखणाऱ्या रामचंद्रांच्या तोंडचें हें दारुण भाषण ऐकून सीतेच्या तोंडावरचें तेज पार मावळून जाऊन तोडलेल्या केळीप्रमाणें ती मूर्च्छित व मृतप्राय होऊन धाडकन् जमीनीवर पडली ! हा सर्व प्रकार पाहून सर्व वानरसैन्य दुःखानें व आश्चर्यानें स्तब्ध व तटस्थ होऊन राहिलें. इतक्यांत ब्रह्मदेव, इंद्रादि देवता व सप्तर्षि आणि दिव्य देहधारी



"तुझी इच्छा असेल तिकडे तूं जा." (पृ० २९४)

खुद्द दशरथ विमानांत बसून तेथें आला. कांहीं वेळानें सावध होऊन सीता उभी राहून रामांस म्हणाली:—" राजपुत्रा, या तुमच्या वर्तनाबद्दल मी तुम्हांस दोष देत नाहीं; पुरुष व स्त्री यांची अशा स्थितींत गति काय असते, हें तुम्ही पूर्णपणें जाणतच आहां. माझें मन व देह जर निष्कलंक नसेल तर पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं पंचमहाभूतें माझ्या पंचप्राणांसह माझे शरीरांतून निघून जातील.

यथाहं त्वद्दते वीर नान्यं स्वप्नेऽप्यचिंतयम् ।
तथा मे देवनिर्दिष्टस्त्वमेव हि पतिर्भव ॥

हे वीरा, तुमच्यावांचून अन्य पुरुषाचें मीं स्वप्नामध्येंही जर चिंतनसुद्धां केलें नसेल, तर देवांचे कृपेनें व आज्ञेनें मला तुमचीच पति या नात्यानें पुनः प्राप्ति होवो. "सीतेचें हें भाषण होतांच गंभीर अशी आकाशवाणी झाली; आणि वायु, अग्नि, वरुण, ब्रह्मदेव, व खुद्द दशरथ यांनीं रामास असें सांगितलें कीं, ' सीता अगदीं निष्पाप व निष्कलंक असून तिचा देह व मन पूर्ववत् शुद्ध व पवित्र आहे; तिचा त्याग न करतां स्वीकार कर. तिच्या पातिव्रत्याबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं. स्त्री आपण होऊन वश झाल्यावांचून तिजशीं जर जबरदस्तीनें रममाण होशील तर तुझ्या मस्तकाचे शतशः तुकडे होतील, असा नलकूबरानें रावणास शाप दिला होता. तेव्हां त्यानें सीतेला बलात्कारानें भ्रष्ट केली असेल, असा संशयच घेतां येत नाहीं. ' देवांचें व प्रत्यक्ष पित्याचें हें भाषण ऐकून रामचंद्रानीं सीतेचा स्वीकार केला. त्यानीं अविंध्य व त्रिजटा यांस देणग्या देऊन त्यांच्या उपकाराची फेड केली. ब्रह्मदेवानीं वर देऊं केले असतां

वव्रे रामः स्थितिं धर्मे शत्रुभिश्चापराजयम् ।
राक्षसैर्निहतानां च वानराणां समुद्भवम् ॥

माझी धर्माचे ठिकाणीं दृढबुद्धि राहो, शत्रूस मीं अजिंक्य असावें व राक्षसांनीं मारलेले वानर पुनः जिवंत व्हावे, असा वर मागून रामानीं आपली धर्मनिष्ठा, सत्यपराक्रमता व कृतज्ञता हीं उत्तम रीतीनें प्रगट केली. रामकीर्ति जोंपर्यंत जगावर राहील तोंपर्यंत तूंही जिवंत राहशील, असा सीतेनेंही हनूमानास वर दिला. देव, सप्तर्षि, मातली वगैरे सर्व आपापल्या स्थानीं परत गेल्यावर लंका बिभीषणाचे स्वाधीन करून राम लक्ष्मण वानरांसह त्याच सेतूनें समुद्र उल्लंघून पुनः ऐल तीरास परत आले. पुष्पक विमानांत बसून सर्व प्रमुख वीर किष्किंधा नगरीस आल्यावर तेथें रामानीं अंगदास यौवराज्याभिषेक केला. आलेल्या मार्गानेंच विमानांतून अयोध्येनजीक आल्यावर सर्वांची व भरताची नंदिग्राम येथें भेट झाली. भरतानें रामांची ठेव म्हणून स्वीकारलेलें राज्य त्यांचें त्यांस परत दिलें. वसिष्ठ व वामदेव यांनीं रामचंद्रांस शुभ वैष्णव मुहूर्तावर राज्याभिषेक केला. सुग्रीव, बिभीषण वगैरेंना रत्नभूषणांच्या देणग्या देऊन सत्कार करून रामानीं त्यांना मोठ्या कष्टानें निरोप दिला. पुष्पक विमानही त्यांनीं कुबेरास परत दिलें. रामानीं यापुढें गोमतीचे तीरीं दहा अश्वमेध यज्ञ केले. ( वन० अ० २९० )

---

# सावित्री-चरित्र.



प्राचीनकाळीं मद्रदेशाचा अश्वपतिनामक एक फार धर्मशील राजा होता. त्यास संतान नसल्यामुळें त्यानें त्यासाठीं १८ वर्षें उग्र तप केलें. तो सावित्री देवीस उद्देशून दर तीन दिवसांत सावित्रीमंत्रानें १ लक्ष हवन करी, व नंतर पारणें फेडी. या तपाचरणानें व यज्ञादिकांनीं प्रसन्न होऊन सावित्रीनें त्यास प्रत्यक्ष दर्शन देऊन वर दिला. ह्या वरप्रसादाचे योगानें मनुकुलोत्पन्न मालवीनामक वडील राणीस गर्भ राहून ती योग्य काळीं प्रसूत झाली, व तिला दिव्य कन्यारत्न झालें. सावित्री देवीच्या प्रसादानें ही कन्या झाली म्हणून तिचें नांव सावित्री असेंच ठेवलें. ही कन्या आपल्या तारुण्याच्या ऐन भरांत आली, तेव्हां एखाद्या सोन्याच्या पुतळीप्रमाणें तेजस्वी दिसूं लागली. तिचें तें अलौकिक सौंदर्य व अद्वितीय तेज पाहून लोकांचे डोळे दिपूं लागले! सावित्री रूपगुणयौवन यांनीं इतकी संपन्न असतांही कोणाही राजपुत्रानें तिच्या तेजास भिऊन तिला मागणी घातली नाहीं. तेव्हां अश्वपति राजानें बरोबर वृद्ध व आनुभविक मंत्री आणि इतर परिवार देऊन सावित्रीलाच आपला पति पसंत करण्यास पाठविलें. सावित्री सुवर्णरथांत बसून अनेक देश, नगरें व राजर्षींचीं तपोवनें यांतून फिरून मद्रदेशास परत आली. आपल्या पित्यास व जवळ बसलेल्या नारदांस तिनें नमस्कार केल्यानंतर

पित्यानें विचारल्यावरून ती म्हणाली:—' शाल्वदेशचा द्युमत्सेन राजा आंधळा झाला, व त्याचा पुत्रही लहान. अशी संधी साधून जवळच असलेल्या त्याच्या शत्रूनें त्याचें राज्य हिरावून घेतलें, व त्यास पत्नीसह वनवासांत पाठविलें. ह्या द्युमत्सेनास राजधानींत झालेला पण तपोवनांत वाढलेला सत्यवान् नांवाचा पुत्र आहे, त्यास मीं वरलें आहे.'

सावित्रीचें हें भाषण ऐकून नारद म्हणाले:—'मातापित्यांच्या सत्यनिष्ठेवरून त्यास हें नांव ठेवलें आहे. यास लहानपणापासून अश्व प्रिय असून त्यांचीं मातीचीं चित्रें करण्याचा व तीं चित्रें काढण्याचा बाळपणीं फार नाद होता; म्हणून त्यास चित्राश्व असेंही नांव पडलें आहे. तूं वरिलेला सत्यवान् राजपुत्र तेजस्वी, बुद्धिमान्, शूर, पितृभक्त, दाता, सौंदर्यसंपन्न, उदार, सत्यनिष्ठ असा सर्वगुणांनीं जरी संपन्न आहे तरी आजपासून बरोबर एक वर्षानें तो मरणार आहे; व हा त्याचा दोष त्याच्या या सर्व गुणांची माती करणारा आहे. यासाठीं दुसरा एकादा राजपुत्र वर म्हणून शोधून काढ." सत्यवानास वरल्यास राजसुख नाहींच, पण सौभाग्यसुखही एक वर्ष मिळतें न मिळतें तोंच आपणास वैधव्य येणार, असें जरी सावित्रीला कळलें तरी तिनें आपला निश्चय ढळूं दिला नाहीं. कारण स्त्रीनें एकदां जो पुरुष वरला, त्याखेरीज अन्य पुरुषाशीं तिनें विवाह करणें म्हणजे एक प्रकारचा व्यभिचारच आहे, हें ती जाणून होती. ती म्हणाली:—" दायविभाग, कन्यादान व वचन देणें हीं सज्जनांचीं तीन कृत्यें एकदांच होत असतात. यासाठीं—

दीर्घायुरथवाऽल्पायुः सगुणो निर्गुणोऽपि वा ।
सकृद्-वृतो मया भर्ता न द्वितीयं वृणोम्यहम् ॥

मीं एक पुरुष भर्ता या नात्यानें मनानें एकदां वरला आहे; मग तो दीर्घायु असो कीं अल्पायु असो; गुणवान् असो कीं गुणहीन असो—आतां त्यावांचून अन्य पुरुषास मी वरणार नाहीं. " असें एकच निर्धाराचें उत्तर तिनें नारदांस व पर्यायानें आपल्या पित्यास दिलें. तेव्हां सावित्रीची ही स्थिरबुद्धि पाहून नारदानीं तिचें म्हणणें मान्य केलें व अश्वपतीनेंही सावित्रीच्या म्हणण्यास रुकार दिला. आणि द्युमत्सेन हा अंध व राज्यभ्रष्ट राजा वनांत जेथें शालवृक्षाखालीं दर्भासनावर बसला होता, तेथें वृद्धब्राह्मणांसह पायीं चालत जाऊन अश्वपतीनें आपली व आपल्या राजकन्येची मनीषा त्यास कळविली. सावित्री ही आपली सून व्हावी, अशी जरी राज्यभ्रष्ट होण्यापूर्वीं अश्वपतीची इच्छा होती, तरी राज्यभ्रष्ट होऊन वनवासांत दुःख भोगीत कसें तरी आयुष्य कंठणाऱ्या आपणासारख्या अंध राजाच्या मुलास आपली कन्या देण्याचें मूर्खत्व कोणताही राजा करणार नाहीं, असें वाटून द्युमत्सेनानें अश्वपतीच्या विनंतीबद्दल संशय प्रगट केला. परंतु अश्वपतीनें सर्व प्रकारची खात्री केल्यावर द्युमत्सेनानें रुकार दिला. पुढें तेथें तपोवनांतच सत्यवान् व सावित्री यांचा यथाविधि विवाह झाला. सर्वगुणसंपन्न पत्नी मिळाल्यामुळें सत्यवानास व मन बसलेला पति मिळाल्यामुळें सावित्रीस अर्थातच आनंद झाला. सावित्रीस तेथेंच सासऱ्याचे आश्रमांत ठेवून अश्वपति आपल्या राजधानीस परत आला.

इकडे सावित्रीनें राजवैभवदर्शक अशीं अंगावरील सर्व वस्त्र-भूषणें काढून टाकलीं; आणि वनवासी तपस्व्यांस योग्य अशीं वल्कलें व भगवीं वस्त्रें परिधान केलीं. सासऱ्याच्या तपोवनांतील आश्रमांत आनंदानें राहून विनय, नम्रपणा, गृहकृत्यांतील कौशल्य व सेवापरायणता, इ० साध्वी–पतिव्रतेच्या सद्‌गुणांचे योगानें तिनें आपल्या पतीस व सासुसासऱ्यांस संतुष्ट केलें. नारदांनीं सांगितलेली गोष्ट सावित्रीचे मनांत सारखी घोळत असल्यामुळें ती वर्षाचे दिवस चिंतेनें मोजीत असे. याप्रमाणे क्रम चालला असतां लग्न होऊन जवळ जवळ वर्ष होत आलें. नारदानीं सांगितलेल्या दारुण प्रसंगाची तिला यापुढें जास्तच आठवण होऊं लागली. भावी भयंकर संकटाची काळजी करीत सावित्री कृश होत चालली असतां वर्ष संपण्यास चारच दिवसांची अवधि राहिली. पतीचे प्राण व आपलें सौभाग्य यांचें संरक्षण करण्याचे हेतूनें सावित्रीनें त्रिरात्र व्रत व उपोषण करण्याचा निश्चय केला. सावित्रीसारख्या सुकुमार व तरुण राजकन्येनें असलें खडतर व्रत करावें, असें प्रेमामुळें सासूसासऱ्यांचे मनांत येईना. तरी, स्वतः तपाचरण करणाऱ्या तपस्व्यांनीं इतरांच्या व्रतनियमादिकांचे आड येणें किंवा त्यांचा व्रतभंग करणें अप्रशस्त होय; हें जाणून आणि सावित्रीनेंही आपला निर्धार स्पष्टपणें कळविल्यामुळें त्यांनीं मोठ्या नाखुषीनें हें व्रत करण्याची सावित्रीस अनुज्ञा दिला. सावित्रीचें त्रिरात्रव्रत व उपोषण यथाविधि पार पडल्याबरोबर चवथे दिवशीं सकाळीं सावित्रीनें देवदेवतार्चन करून सासूसासरा व आश्रमांतील इतर तपस्वी यांस नमस्कार केले; त्या सर्वांनीं तिला ‘ अवैधव्य असो ’ असे आशीर्वाद दिले. तेव्हां ‘ तथास्तु ’ असें मनांत म्हणून

सावित्रीनें त्या आशीर्वादांचा आनंदानें स्वीकार केला. सावित्रीनें लवकर पारणें फेडावें, असें सासूसासऱ्यांनीं तिला आग्रहानें सांगितलें; तरी तो चवथा भयंकर दिवस निर्विघ्नपणें पार पडून पांचवा उजाडेपर्यंत तिचे हातून पारणें कसचें होणार? सायंकाळीं सूर्यास्तास पारणें फेडीन, असा माझा नवस आहे, असें तिनें सासूसासऱ्यांस सांगितलें. इतक्यांत नित्याचे परिपाठाप्रमाणें खांद्यावर कुऱ्हाड घेऊन सत्यवान् लांकडें व फळें आणण्यासाठीं वनांत निघाला. आज पतीपासून क्षणभरही दूर राहूं नये असें सावित्रीचे मनानें घेतलें,—किंबहुना तिनें त्या दिवशीं दूर राहणें अशक्यच होतें. 'आज आपणाबरोबर वनांत येतें' असें तिनें नम्रपणें आपल्या पतीस म्हटलें. परंतु राजधानींत वाढलेली ही राजकन्या आहे, हिला आश्रमांतही राहण्याची संवय नाहीं। अशा स्थितींत हिला अरण्यांत कशी न्यावी? शिवाय तीन दिवस व्रत व उपवास केल्यामुळें हिच्या शरीरांत त्राणही नाहीं; वगैरे विचार मनांत येऊन सत्यवान् सावित्रीचें निवारण करूं लागला. तरी तिनें आपला आग्रह सोडला नाहीं. तेव्हां आपल्या सासूसासऱ्यांची परवानगी घेऊन अरण्यांत बरोबर येण्यास त्यानें तिला संमति दिली. 'आश्रमांत येऊन मला एक वर्ष होत आलें. या अवधींत मीं आश्रम सोडून केव्हांही बाहेर गेलें नाहीं. आज मला पुष्पफलांनीं भरलेलें गहन अरण्य पाहण्याची इच्छा झाली आहे. तर मला बरोबर जाण्याची अनुज्ञा असावी' वगैरे बोलून नम्रपणानें तिनें द्युमत्सेनाची परवासगी मागितली. सावित्रीनें वनांत आल्यापासून आपणास केलेली ही पहिलीच विनंती अमान्य करणेंयोग्य नाहीं असें वाटून द्युमत्सेनानें तिला परवानगी दिली; व सत्यवान्

सावित्री हीं दोघें वनांत गेलीं. मोरांनीं भरलेलीं रमणीय वनें, पवित्र नद्या, फुललेले वृक्ष वगैरे सत्यवान् सावित्रीला दाखवी, तेव्हां ती बाह्यत: हंसून आनंद झालासें दाखवी. परंतु नारदांचें भाषण मनांत घोळत असल्यामुळें तिचें अंत:करण आंतून दु:खानें करपून जात होतें. याप्रमाणें सावित्रीचें मन सुख-दु:खांनीं द्विधा झालें असतां व ती एकसारखी गुप्त दु:खानें पतीकडे पाहत असतां नेहमींप्रमाणें अवश्य तीं फळें काढून सत्यवानानें स्थालि भरली, व नंतर तो लांकडें तोडूं लागला. याप्रमाणें लांकडें तोडण्याचे श्रम सायंकाळपर्यंत केल्यामुळें त्याचें सर्वांग घामानें डवडवून गेलें; सगळें अंग व काळीज यांत वेदना होऊं लागल्या आणि त्याचें कपाळही दुखूं लागलें. तेव्हां हें आपल्या पत्नीस सांगून, 'मला उभें राहवत नाहीं, मी थोडा वेळ निजून विश्रांति घेतों' असें सत्यवान् म्हणाला. तेव्हां सावित्रीनें खालीं बसून आपल्या मांडीवर पतीचें डोकें घेतलें. एक वर्षापूर्वीं नारदानीं केलेलें भयंकर भविष्य या वेळीं तिचे डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभें राहिलें. तशांत ती जागा घोर निर्जन अरण्याची असून तेथें हळुहळु अंधारही पडूं लागला होता. अशा त्या भयंकर वेळीं व भयाण स्थळीं, तांबडें वस्त्र परिधान केलेला, डोळे लाल असलेला, जटाधारी, सांवळ्या वर्णाचा, पण तेजस्वी असा प्रत्यक्ष यमधर्म हातांत पाश घेऊन तेथें आलेला सावित्रीस दिसला. सावित्रीनें नम्रपणानें हात जोडून विचारलें असतां यमानें सांगितलें कीं, तुझा पति गुणवान् आणि तूं पतिव्रता व व्रतस्थ आहेस, असें पाहून मीं आपले दूत न पाठवितां स्वत:च त्याचे प्राण घेऊन जाण्यास आलों आहें. असें बोलून यमानें सत्यवानाचे प्राण आपल्या पाशांनीं हरण केले, व



प्रत्यक्ष यमधर्म सावित्रीस दिसला. ( पृ. ३०२ )

तो त्यांसह दक्षिण दिशेकडे जाऊं लागला. पति मृत झालेला पाहतांच सावित्रीनें धीर न सोडतां किंवा दुःख करीत न बसतां त्याचें डोकें हळूच जमिनीवर ठेवलें, व ती यमाचे मागोमाग जाऊं लागली. ' परत जाऊन आपल्या पतीचें और्ध्वदेहिक कर्म कर. व्यर्थ माझे मागें लागत येऊं नको ' असें यमधर्मानें सावित्रीस परोपरीनें सांगितलें. पण—

यत्र मे नीयते भर्ता स्वयं वा यत्र गच्छति ।
मयापि तत्र गंतव्यमेष धर्मः सनातनः ॥

" माझ्या पतीला जिकडे नेलें जाईल किंवा तो स्वतः जिकडे जाईल, तिकडे त्याजबरोबर जाणें हा माझा—पतिव्रता साध्वी स्त्री या नात्यानें—सनातन धर्म आहे. सात पावलें बरोबर चालल्यांनेंही मैत्री होते. आपण आतां माझे मित्र झालां आहां. माझा पति नेऊन तुम्ही आमच्या गृहस्थधर्माचा नाश करूं नका " असें तिनें यमधर्मास उत्तर दिलें. तिचा व यमधर्माचा याप्रमाणें मार्गानें संवाद चालला असतां सावित्रीची पतिनिष्ठा, बुद्धिमत्ता व चातुर्य पाहून यमास फार संतोष झाला; व सत्यवानाचे प्राण खेरीज करून इतर कोणताही वर माग असें तो तिला म्हणाला. तेव्हां पतिव्रतेस पतीच्या खालोखाल पूज्य असलेल्या सासऱ्याचे स्थितीकडे लक्ष जाऊन तिनें प्रथम ' माझ्या सासऱ्याचें अंधत्व नाहींसें होऊन त्याचें शरीर अत्यंत सुंदर व्हावें ' असा वर मागितला, व तो यमानें तिला दिला. येवढ्या वरानें संतुष्ट न होतां ती तशीच बोलत त्याचे मागोमाग जाऊं लागली. ' पुष्कळ लांब आलीस, तुला फार श्रम झाले आहेत; आतां परत जा. ' असें यम तिला म्हणाला. परंतु पति सन्निध असतां मला दूरही कांहीं नाहीं

व श्रमही होत नाहींत, असें उत्तर देऊन ती तशीच त्याचे पाठोपाठ जाऊं लागली. तेव्हां त्यानें सावित्रीला असेच आणखी तीन वर देऊं केले. तेव्हां " सासऱ्याचें राज्य त्यास परत मिळावें व त्याचे हातून स्वधर्म सुटूं नये; माझ्या पित्यास शंभर पराक्रमी पुत्र व्हावे, आणि मलाही शंभर औरस पुत्र व्हावे. " असे तिनें तीन वर मागितले, व यमानेंही बेसावधपणें त्या सर्वांस ' तथास्तु ' म्हटलें ! " शंभर औरस पुत्र होतील असा तुम्हीं वर दिला आहे, पण हे शंभर पुत्र मला पतिव्रतेला सत्यवानापासून मात्र होणें शक्य आहे; आणि त्यांचे प्राण तर तुम्ही घेऊन चाललां आहां. तेव्हां आपला शब्द व मला दिलेला वर खरा करण्याकरितां माझे पति–त्यांस चारशें वर्षांचें आयुष्य देऊन–मला परत देणें आतां तुम्हांस भाग आहे. ह्यांस परत न द्याल तर मी कांहीं जिवंत राहणार नाहीं आणि तुमचें वचन व दिलेला वर खोटा होईल.

न कामये भर्तृविना कृता सुखम् ।
न कामये भर्तृविना कृता श्रियम् ।
न कामये भर्तृविना कृता दिवम् ॥
न भर्तृहीना व्यवसामि जीवितुम् ॥

पतीविना मला सुख नको, वैभव नको, स्वर्ग नको, किंबहुना त्यांचेविना मला जीवही नको. " असें म्हणून सावित्रीनें यमधर्मास पेंचांत पकडलें ! तेव्हां तिचें हें पतिप्रेम व चातुर्य पाहून यमानें प्रसन्न होऊन तोही पांचवा वर तिला दिला; आणि सांगितलें कीं, तुला व तुझ्या मातेला जे शंभर शंभर पुत्र होतील ते व त्यांचे वंशज तुमच्या नांवावरून अनुक्रमें ' **सावित्र** ' व ' **मालव** ' या नांवानें प्रख्यात होतील. याप्रमाणें कृतकृत्य होऊन,

पतीचें शव जेथें ठेवलें होतें तेथें सावित्री परत आली; व पतीचें मस्तक पूर्ववत् मांडीवर घेऊन बसली. थोड्या वेळानें, गाढ झोंपेंतून जागें झाल्याप्रमाणें सत्यवान् सावध होऊन सावित्रीकडे प्रेमानें पाहत तिला विचारूं लागला:—‘ तुझ्या मांडीवर डोकें ठेऊन निजलों असतां एक भयंकर काळपुरुष मला ओढून नेत आहेसा मला दिसला, तो कोठें गेला? मीं पाहिलें तें सर्व स्वप्न कीं काय? मी तुला एकटीला या घोर अरण्यांत जागी ठेवून इतका वेळ कसा निजलों? तूं मला जागें कां केलें नाहींस?’ वगैरे प्रश्न तो तिला विचारूं लागला. तेव्हां ‘ आतां रात्र फार झाली आहे, आपण आश्रमांत परत जाऊं या; उद्यां सकाळीं मी सर्व हकीकत आपणास सांगेन ’ असें सावित्रीनें त्यास उत्तर दिलें. काळोख फार पडल्यामुळें वाट सांपडणार नाहीं, याकरतां रात्रीचे रात्र तेथेंच राहावें, असें आरंभीं सत्यवानास वाटलें. तथापि, आश्रमांत परत येण्यास आपणास उशीर झाला तर आपल्या वृद्ध मातापितरांस किती दु:ख होतें, याची आठवण होऊन सत्यवानास रडें कोसळलें. राज्यभ्रष्ट व अंध मातापितरांचें वनवासांतील दु:ख गिळून टाकण्याचें एकच साधन असा जो एकुलता एक पुत्र आपण, तो वनांतून परत आला नाहीं, असें पाहून त्यांस अतोनात दु:ख झालें असेल; कदाचित् या पुत्रशोकानें ते मृत्युपंथासही लागले असतील; असे विचार मनांत येऊन सत्यवान् अति शोक करूं लागला. तेव्हां आपल्या पतीचे अश्रु पदरानें पुसून त्याजसह परत आश्रमास जाण्यास सावित्री तयार झाली. सावित्रीनें आपले केश बांधले, फळांची स्थाली तेथेंच एका झाडाचे फांदीस बांधून ठेवली, व पतीचा परशु एका हातांत घेतला; आणि त्याचा डावा हात

आपल्या डाव्या खांद्यावर ठेवून व आपल्या उजव्या हातानें त्यास मिठी मारून सावित्री सत्यवानास सांवरून घेऊन चालली. पानांच्या फटींतून येणारा चंद्रप्रकाश, पेटलेल्या वणव्याचा उजेड व सत्यवानानें सांगितलेल्या खाणाखुणा यांचे साह्यानें सावित्री वाट न चुकतां सत्यवानासह मार्ग चालूं लागली.

इकडे नेहमींप्रमाणें सत्यवान् वनांतून परत आला नाहीं, हें पाहून त्याचे मातापितरांस अत्यंत दुःख झालें. इतक्यांत एकाएकीं आपलें अंधत्व जाऊन दृष्टि आल्याचें पाहून तर द्युमत्सेनास फार आश्चर्य व दुःख वाटूं लागलें. ' आपला पुत्र जवळ असतांना आपण अंधत्वाचीही फिकीर केली नाहीं; पण आतां पुत्र नष्ट होऊन गेल्यावर दृष्टि येऊन तरी काय उपयोग? दृष्टि न आली तरी चालेल, पण पुत्र परत येवो. पुत्रसुखापुढें दृष्टिसुखाची कांहींच मातब्बरी नाहीं. ' वगैरे विलाप करीत व त्याच्या लहानपणच्या गोष्टी आठवीत तो वृद्ध राजा नुकत्या आलेल्या दृष्टीचा उपयोग करून पत्नीसह रात्रीं वनांत पुत्राचा शोध करीत हिंडूं लागला. पण त्या आश्रमांतील ऋषींनीं त्यांचें असें समाधान केलें कीं, ' ज्या अर्थी तुम्हांस ईश्वरकृपेनें अशी एकाएकी दृष्टि प्राप्त झाली आहे, त्या अर्थी तोच ईश्वर तुमच्या पुत्राचा नाश करून तुम्हांस शोकसागरांत टाकणार नाहीं; तुम्हीं स्वस्थ असावें. सत्यवानाचे तोंडावर दीर्घायुत्वाचींच लक्षणें दिसत आहेत, व सावित्रीही साध्वी स्त्री असून तिचींही सर्व लक्षणें सौभाग्यसूचकच आहेत. अर्थात् सत्यवान् जिवंत असून तो लवकरच आश्रमांत परत येईल.' ऋषींचें हें बोलणें पटून द्युमत्सेन आश्रमांत परत आला. कांहीं वेळानें सत्यवान् व सावित्री हींही आश्रमास येऊन पोहोंचलीं.



सावित्री सत्यवानास सांवरून घेऊन चालली. ( पृ० ३०६ )

सासूसासऱ्यांनीं विचारल्यावरून अरण्यांत घडलेली सर्व हकीकत सावित्रीनें त्यांस निवेदन केली. पतिव्रता व साध्वी अशा सावित्री सुनेमुळेंच आपणास दृष्टि प्राप्त झाली; एवढेंच नव्हे, तर एकुलता एक पुत्रही पुन: लाभला व राज्यही परत मिळणार, किंबहुना आपल्या सबंध कुळाचाच तिजमुळें उद्धार होणार, हें पाहून द्युमत्सेनाच्या आनंदास पारावार राहिला नाहीं! दुसऱ्या दिवशीं सकाळीं शाल्वदेशांतील प्रमुख प्रजाजनांनीं येऊन द्युमत्सेनास सांगितलें कीं, ‘ तुमच्या शत्रूस त्याच्या अमात्यानें ठार मारलें आहे; व त्यामुळें त्याचें सैन्यही पळून गेलें आहे. तुम्हीं अंध असा किंवा नसा, तुम्हांसच राजा करण्याचें आम्हीं सर्व प्रजाजनांनीं आतां एकमतानें ठरविलें आहे; व तुमची द्वाहीही राज्यांत चोहोंकडे फिरविली आहे. तर तुम्हीं पूर्ववत् राज्य करण्यास राजधानीस चलावें. तुम्हांस नेण्याकरतांच आम्ही सैन्यासह आलों आहों. ” प्रजाजनांची ही विनंती ऐकून द्युमत्सेनास व त्याच्या इतर माणसांस अर्थात्च अतिशय हर्ष झाला. घोडे सोडून देऊन मनुष्यांनींच ओढलेल्या अशा आपल्या रथांत द्युमत्सेस सत्यवानासह बसला आणि मागाहून त्याची पत्नी व सावित्री ह्या पालख्यांत बसून चालल्या. राजधानीस परत आल्यावर प्रजाजनांनीं द्युमत्सेनास राज्याभिषेक करून सत्यवानास युवराजपद दिलें. यमधर्मापासून मिळविलेले तीन वर जसे याप्रमाणें सफळ झाले, त्याप्रमाणें कालेंकरून राहिलेले दोन वरही फलद्रूप होऊन अश्वपतीस शंभर पराक्रमी पुत्र झाले व सावित्रीसही सत्यवानापासून शंभर औरस पुत्र झाले! याप्रमाणें साध्वी सावित्रीच्या एकनिष्ठ पातिव्रत्यामुळें

पति, सासू, सासरा, पिता, माता, किंबहुना दोनही कुळें यांचा विपत्तींतून उद्धार होऊन त्यांचें वैभव वृद्धिंगत झालें.*

* सावित्रीची हीच कथा स्कंद पुराणांतही दिलेली आहे. भारतांतील व ही कथा यांत शब्दांतरावांचून दुसरा फरक मुळींच नाहीं म्हटलें तरी चालेल. "अश्वपति राजा 'सावित्रीं च प्रसावित्रीं' या मंत्राच्या जपानें सावित्री देवीची आराधना करी; त्याला जिनें प्रसन्न होऊन दर्शन दिलें त्या सावित्रीचे हातीं अक्षसूत्र (अक्ष नामक बीजांची माळ) व कमंडलु हीं होतीं; द्युमत्सेनाचें राज्य हरण करणाऱ्या शत्रूचें नांव रुक्मी असें होतें. हा रुक्मी द्युमत्सेनाचा प्रधानच होता; त्या रुक्मीचा दुसऱ्या एका प्रधानानें वध केल्यावर प्रजाजन द्युमत्सेनाकडे आले. सत्यवानानें लांकडांचा भारा घट्ट बांधून एका झाडाला टेंकून ठेवला, व नंतर तो वडाखालीं बसलेल्या सावित्रीकडे आला" वगैरे कांहीं गोष्टी स्कंद पुराणांतील कथेंत जास्त सांगितल्या आहेत. शिवाय स्त्रियांनीं सावित्रीव्रत कसें करावें, तेंही त्या कथेच्या शेवटीं विस्तारानें सांगितलें आहे.

---



# इंद्र व नहुष.

त्वष्टा प्रजापति हा देवश्रेष्ठ व महा–तपस्वी असून त्याचें व इंद्राचें वांकडें होतें; म्हणून त्यानें इंद्राचा वध करूं शकणारा असा एक पुत्र उत्पन्न केला. त्याचें नांव विश्वरूप असें असून त्यास त्रिशिरा असेंही म्हणत कारण त्यास तीन मुखें असून तीं सूर्य, चंद्र व अग्नि यांप्रमाणें तेजस्वी होतीं. तो एका मुखानें वेदाध्ययन व दुसऱ्या मुखानें सुरा-पान करी; आणि तिसऱ्या मुखानें सर्व दिशांकडे जणूं सगळें विश्वच गिळून टाकतो कीं काय अशा भयंकर रीतीनें पाहत राही ! हा त्रिशिरा मोठी तपस्वी, जितेंद्रिय व धर्मपरायण असून इंद्रपद मिळविण्यासाठीं तो घोर तप करूं लागला. त्रिशिरा ऋषि आपल्या **तपानें, वीर्यानें व सत्यानें** आपलें **इंद्रपदही हरण करील**, अशी भीति वाटून त्याला विषयासक्त व तपोभ्रष्ट करण्यासाठीं इंद्रानें आपल्या अप्सरांचा तांडा त्याजकडे पाठविला. पण त्यांनीं कितीही प्रयत्न केला, आपलें तारुण्य–सौंदर्य त्यास कितीही दाखविलें व त्यांनीं त्याशीं कितीही लगट केली, तरी त्याचें मन अचल व अढ-ळच राहिलें ! तेव्हां निरुपाय होऊन अप्सरा परत आल्या. हा उपाय निष्फळ झाल्याचें पाहतांच इंद्रानें त्याजवर आपलें विक्राळ व जाज्वल्य असें वज्रच सोडून त्याच्या प्रहारानें त्यास ठार मारून भूमीवर पाडलें ! त्रिशिरा वज्रघातानें मेला, तरी त्याचें शरीर व मुखें इतकीं सतेज राहिलीं कीं, तो अजून जिवंतच असावा, असें

वाटून इंद्रास फार भीति वाटली. इतक्यांत तेथें खांद्यावर कुऱ्हाड टाकून एक सुतार आला. त्याला इंद्रानें त्रिशिराचीं तिन्हीं शिरें तोडून टाकण्यास सांगितलें. पण निरपराधी ऋषि–पुत्राचीं शिरें तोडून ब्रह्महत्येचें पातक करण्यास तो तयार होईना. परंतु, ' यज्ञांत मारलेल्या पशूचें शिर यापुढें तुलाच अर्पण केलें जाईल ' असा इंद्रानें त्यास वर देतांच तो सुतार ' लोभमूलानि पापानि ' या न्यायानें तें **पापकर्म करण्यास तयार झाला!** सुतारानें कुऱ्हाडीनें विश्वरूपाचीं तिन्ही शिरें तोडून टाकलीं; तों असा चमत्कार झाला कीं, त्रिशिरा ज्यानें वेदाध्ययन व सोमपान करी त्या मुखांतून कपिंजल, विश्वग्रास करूं पाही त्यांतून तित्तिर व सुरापान करी त्या मुखांतून कलविंक ( चिमणे ) पक्षी बाहेर पडून उडून गेले! त्रिशिराचा याप्रमाणें वध होतांच इंद्र निश्चित व आनंदित होऊन स्वर्गास गेला.

इकडे आपल्या तपोनिष्ठ, क्षमाशील, आत्मसंयमी व निरपराधी पुत्राचा इंद्रानें दुष्टपणानें असा वध केल्याचें वर्तमान कळतांच त्वष्टा प्रजापतीस फारच क्रोध आला; व त्यानें लागलीच यज्ञ करून इंद्राचा वध करूं शकणारा प्रचंड वृत्रासुर निर्माण केला. प्रजापतीचे आज्ञेवरून वृत्रासुरानें स्वर्गास जाऊन इंद्रास युद्धांत जिंकिलें; आणि त्यास धरून व मुरगाळून तोंडांत टाकलें! इंद्राची ही स्थिति पाहतांच देव भ्याले; व त्यांनीं एक जांभई उत्पन्न केली. ती जांभई वृत्रास येतांच त्याचा जबडा जोरानें उघडला; त्या सरशीं इंद्र लहान रूप धारण करून बाहेर पडून निसटला! पुनः इंद्र व वृत्र यांचें भयंकर युद्ध होऊन इंद्र व देव पराभूत झाले; आणि मंदर पर्वतावर जाऊन वृत्र–वधाच्या उपयांचें चिंतन करीत राहिले. ( उद्योग-

पर्व, अध्याय ९ ) ' वृत्रासुर अत्यंत तेजस्वी, प्रचंड, पराक्रमी किंबहुना अजिंक्यच असल्यामुळें मला तुमचें संरक्षण करतां येत नाहीं ' असें इंद्रानें देवांस स्पष्ट सांगितलें. तेव्हां सर्वांचे विचारें, श्रीविष्णूकडे जाऊन गाऱ्हाणें सांगावें, असें ठरलें; त्याप्रमाणें सर्व देव व ऋषि यांनीं श्रीविष्णूकडे जाऊन आपलें दुःख प्रार्थनापूर्वक त्यांस निवेदन केलें. तेव्हां श्रीविष्णु म्हणाले:—" वृत्राचा वध करण्यासाठीं मीं आपल्या तेजासह इंद्राचे वज्रांत प्रवेश करीन; पण त्याचा वध होण्यासाठीं आधीं तुम्हीं त्याशीं सख्य केलें पाहिजे. त्यावांचून त्याचा वध होणार नाहीं. " श्रीविष्णूंच्या या आज्ञेप्रमाणें ऋषि वृत्राकडे जाऊन त्याशीं सौम्यपणें बोलूं लागले:—" तूं व इंद्र दोघेही सारखेच पराक्रमी व तेजस्वी आहां. तुमचें युद्ध अनेक वर्षें चाललें आहे; तरी कोणाचाच पराजय होत नाहीं, व युद्धाचा निकालही लागत नाहीं. पण इकडे त्यामुळें त्रैलोक्यमात्र त्रस्त होऊन गेलें आहे. याकरतां युद्ध थांबवून एकमेकांत सख्य करा. " वृत्रः—" तुम्हीं म्हणतां तें खरें, पण आम्ही दोघेही सारखेच अति तेजस्वी असल्यामुळें सख्य होणार कसें ? **दोन विरुद्ध तेजांचा मिलाफ कसा होणार ?** " ऋषिः—" **माणसानें सत्समागमाचीच इच्छा नेहमीं धरावी; सत्समागम एकदां घडला कीं जन्मभर अखंड कल्याणच होतें. याकरतां सत्समागमाची संधी कधींही दवडूं नये; मग पुढें काय होईल तें होवो. विपत्काळीं तर सत्संगति हीच खरी संपत्ती असते.** यासाठीं इंद्राशीं स्नेह करण्याची आलेली ही संधी व्यर्थ दवडूं नको. " वृत्रः—" तुम्हीं म्हणतां त्याप्रमाणें वागण्यास मी तयार आहें. पण इंद्र किंवा देव यांचे हातून मला सुक्या

किंवा ओल्या वस्तूनें, काष्ठ-पाषाणानें, शस्त्रास्त्रानें, दिवसा किंवा रात्रीं मृत्यु येऊं नये असा वर मला मिळाला पाहिजे; येवढीमात्र माझी एक अट आहे." वृत्राची ही अट ऋषींनीं मान्य केल्यावर इंद्र व वृत्र यांचें सख्य झालें, आणि उभयतांसही आनंद झाला. इंद्राला याप्रमाणें आनंद झाला तरी त्याचें वृत्र-वधाच्या उपायांचें चिंतन सारखें चालूच होतें; व तो त्याच्या वधाच्या संधीची वाटच पाहत होता. एके समयीं इंद्र समुद्र-तीरीं गेला असतां, तेथें वृत्र त्याचे दृष्टीस पडला. त्यावेळीं सूर्यास्त होऊन दिवस व रात्र यांचा संधि होता. समुद्रावरही फेंसाचे पर्वतप्राय ढीग उसळत होते. हें पाहत असतां इंद्राचे मनांत विचार आला कीं, सध्यां दिवस नाहीं व रात्रही नाहीं; हा फेंसही शस्त्रास्त्र नाहीं, काष्ठ-पाषाण नाहीं, किंवा तो सुकाही नाहीं व ओलाही नाहीं; ही संधी व हीं साधनें वृत्र-वध करण्यास चांगलीं आहेत. याप्रमाणें निश्चय करून इंद्रानें श्रीविष्णूचें स्मरण करून आपलें वज्र फेंसाचे आंत घातलें; विष्णूनींही तेजासह त्यांत प्रवेश केला; व इंद्रानें तो फेंस वृत्राचें अंगावर फेंकून त्याचा वध केला! वृत्राचा असा वध होतांच चोहोंकडचा अंधःकार नाहींसा होऊन सुखकारक वाराही वाहूं लागला आणि सर्वांस आनंद झाला. पण इंद्रानें केलेल्या त्रिशिरा—वधामुळें **ब्रह्महत्या त्याचे पाठीस लागली होती, त्यांतच वृत्राचा कपटानें वध केल्याच्या पातकाचीही भर पडली; आणि त्यामुळें तो बेहोष व वेडा होऊन लोकसीमपलीकडे पाण्यांत दडून बसला.** याप्रमाणें इंद्र नाहींसा झाल्यामुळें देव व ऋषि त्रस्त होऊन पृथ्वीवरील झाडें व नद्या सुकून गेल्या, आणि प्राणिमात्र संकटांत पडले. ( उद्यो० अ० १० )

' आपणांवर कोणी शास्ता नसेल तर आपण आपसांत भांडून एकमेकांचा कदाचित् नाश करूं ' असें वाटून देवांनीं नहुषास इंद्रपद देण्याचा बेत केला. नहुष हा तेजस्वी, यशस्वी आणि धर्मपरायण असल्यामुळें तो त्या पदास योग्यही होता. पण इंद्रपद भोगण्यास अवश्यक तितकें बळ आपणापाशीं नाहीं, असें वाटून तो देवांचें म्हणणें मान्य करण्यास कां कूं करूं लागला. परंतु देव व ऋषि यांनीं आपलें सर्व तपोबल त्यास दिलें, एवढेंच नव्हे तर केवळ दृष्टिपातानें पुढें आलेल्याचें सर्व तेज आकर्षून घेण्याचें सामर्थ्यही त्यास त्यांनीं दिलें. तेव्हां तो इंद्रपद स्वीकारण्यास तयार झाला. देवांनीं त्याची इंद्रपदीं स्थापना केल्यावर त्यानें कांहीं काळ धर्मानुरूप देवराज्य केलें. पण प्रत्यक्ष स्वर्गीचें वैभव व सुख भोगण्याचा मान मिळाल्यामुळें व वरील अपूर्व सामर्थ्यामुळें नहुषाचें मन लवकरच भ्रष्ट होऊन तो विषयसेवनांत गुंग होऊन गेला. नंदनादि वनोपवनांत, हिमालयादि पर्वतांवर, समुद्रावर, व नद्यांचे तीरीं अप्सरा व देवकन्या यांसह क्रीडा करण्यांत व नृत्यगायनादि ऐकण्यांत तो दंग होऊन गेला ! अशा स्थितींतच इंद्राची पट्टराणी इंद्राणी त्याचे दृष्टीस पडली. तेव्हां तर त्याची कामवासना अत्यंत अनावर झाली ! ' इंद्राणी ही जर आपणास इंद्राची पत्नी म्हणविते तर मीच सांप्रत देवांचा इंद्र असल्यामुळें तिनें आज मजकडे आलेंच पाहिजे ' असें तो सर्व देवांस इंद्राणीसमक्ष म्हणाला. तेव्हां इंद्राणी बृहस्पतीस शरण जाऊन म्हणाली:– " आपण माझें या दुष्ट नहुषापासून संरक्षण करावें, मी आपणास शरण आल्यें आहें. ' तूं सर्वलक्षणसंपन्न, एक-पत्नी, पतिव्रता व अविधवा आहेस ' असें आपण मला पूर्वीं सांगितलें आहे, तें आतां खरें करा. " हें

भाषण ऐकून आंगिरस बृहस्पतींनीं तिला धीर दिला कीं, ' तूं नहुषास मुळींच भिऊं नकोस; तुझा पति इंद्र यास लवकरच येथें आणून मी तुझी व त्याची भेट करवीन !' इंद्राणी आपलेकडे न येतां बृहस्पतीकडे आश्रयार्थ गेल्याचें ऐकून नहुष अतिशय क्रुद्ध होऊन गेला. ( उद्योग० अ० ११ ) तेव्हां त्यास शांत करण्याचे उद्देशानें देव त्यास म्हणाले:— ' आपणासारख्या थोर पुरुषांनीं क्रोधाधीन होऊं नये. इंद्राणी ही परस्त्री आहे **व परस्त्रीचा अभिलाष धरणें हें पातक आहे;** करतां या पापापासून आपलें मन परावृत्त करा. आपण देवराज असून कोणी हलकेसलके नाहीं, हें लक्षांत ठेवा. ' पण या उपदेशानें राग शांत होण्याऐवजीं नहुष भडकून जाऊन त्यांस म्हणाला:—' पूर्वीच्या इंद्रानें ऋषि-पत्नी अहल्येचा, तिचा नवरा धडधडीत जिवंत असतां, बलात्कारानें उपभोग घेतला; किंवा असलींच इतर अनेक निर्दयपणाचीं, फसवे-गिरीचीं व अधर्माचीं कृत्यें केलीं, तेव्हां तुम्हीं त्याचें कां बरें निवा-रण केलें नाहीं ? अर्थात् तुमचा आतांचा हा उपदेश निरुपयोगी आहे. इंद्राणीनें मजकडे यावें यांतच तिचें व तुमचेंही कल्याण आहे ' नहुषाचें हें भाषण ऐकून सर्व देव बृहस्पति व इंद्राणी यांजकडे आले आणि देवांस अभय प्राप्त होण्याकरतां बृह-स्पतीनीं इंद्राणी नहुषास द्यावी व तिनेंही त्याजकडे जावें, असें म्हणूं लागले ! परंतु ' नहुष मला पति नको आहे, माझें संरक्षण कर-णारा तुम्हांवांचून मला कोणी त्राता नाहीं, मी तुम्हांस शरण आलें आहें ' असें इंद्राणी अश्रु ढाळीत व दीनपणानें आक्रोश करीत बृहस्पतींस म्हणूं लागली. तेव्हां बृहस्पति तिला धीर देत म्हणाले:— ' मी **शरणागताचा कांहीं झालें तरी त्याग करणार नाहीं;**

त्यांतून तुझ्यासारख्या धर्मनिष्ठ, सत्यनिष्ठ व पवित्र स्त्रीचा-इंद्राच्या प्रिय पट्टराणीचा-तर नाहींच नाहीं. मी धर्मज्ञ व सत्यशील असा ब्राह्मण आहें; मी असलें कर्म कदापि करणार नाहीं. शरणागताचें संरक्षण न करतां जो विश्वासघात करून त्यास शत्रूचे स्वाधीन करतो त्याचे शेतावर पाऊस पडत नाहीं, तो पडला तरी पीक उगवत नाहीं; खाल्लेलें अन्न त्याचे अंगीं लागत नाहीं; त्याचें चित्त दुर्बळ होतें; त्यानें दिलेला हविर्भाग देव स्वीकारीत नाहींत व त्याची संतति अल्पायुषी निपजते, असें ब्रह्मदेवाचें वचन आहे. करतां मी इंद्राणीस नहुषाचे स्वाधीन करीत नाहीं.' बृहस्पतीचें हें म्हणणें देवांस मान्यच होतें. पण इंद्राणीचें सत्त्व व बृहस्पतीचें शरणागत–संरक्षणाचें व्रत हीं दोनही कायम राहून नहुषाचीही समजूत होईल, असा उपाय कोणता योजावा, याची चर्चा देव करूं लागले. तेव्हां बृहस्पतीनीं अशी युक्ति सांगितली कीं, 'एकादें संकट लांबणीवर टाकलें असतां काळच त्यांत विघ्नें उत्पन्न करून व बचावाचा मार्ग दाखवून देऊन प्रसंग पार पाडीत असतो. याकरतां इंद्राणीनें नहुषाकडे जाऊन कांहीं दिवसांची मुदत मागून घ्यावी. नहुष गर्वानें फारच चढेल झाला आहे. अर्थात् त्याचा अधःपातही आतां जवळच आला आहे' ही युक्ति सर्वांस पसंत पडल्यावर इंद्राणी खोटेंच लाजतलाजत नहुषाकडे गेली. तिला पाहतांच नहुषास अत्यानंद झाला व आपणास वश होण्याची तिला आज्ञा करूं लागला ( उद्योग० अ. १२ ). तेव्हां ती पतिव्रता इंद्राणी मनांतून भीतीनें कांपत पण बाह्यतःबळेंच धीटपणा आणून त्यास म्हणालीः–' देवराजा, तुम्ही म्हणतां तें ठीक आहे. पण इंद्राला काय झालें आहे, तो कोणीकडे आहे, तें कांहींच कळत

नाहीं. त्याचा पक्का शोध लागेपर्यंत आपण मला अवधि द्या. तो कोठें सांपडत नाहीं असें एकदां निश्चित झालें म्हणजे मग मी निघोर आपणाकडे येईन.' इंद्राणीच्या या विनंतीप्रमाणें नहुषानें तिला मुदत दिली; व ती आनंदानें बृहस्पतीकडे परत आली.

इकडे देवांनीं श्रीविष्णूकडे जाऊन इंद्राची ब्रह्महत्येचे पापापासून मुक्तता करण्याविषयींचा उपाय त्यांस विचारला. त्यांनीं सांगितलेल्या उपायाप्रमाणें इंद्रानें सर्व देवांसमक्ष अश्वमेध यज्ञ केला. त्यामुळें तो ब्रह्महत्येपासून मुक्त होऊन निश्चित, निष्पाप व स्वतंत्र झाला. पण प्राणिमात्राचें केवळ नजरेनें तेजोहरण करण्याचें नहुषाचें सामर्थ्य अद्याप कायम असल्यामुळें इंद्र पुनः गुप्त होऊन नाहींसा झाला. तेव्हां इंद्राणी पुनः शोक करून 'हे इंद्रा हे इंद्रा' असा आक्रोश करूं लागली. तिनें रात्रिदेवी व उपश्रुतिदेवी यांची स्तुति करून, 'माझें एकभर्तृत्व अखंड राहून मला इंद्राचें दर्शन व्हावें' अशी त्यांची प्रार्थना केली. तेव्हां उपश्रुतिदेवीनें दृश्य रूप धारण केलें व इंद्राणीला आपले मागोमाग येण्यास सांगितलें. त्या दोघीजणी अनेक पर्वत, वनें व हिमालय ओलांडून उत्तरेकडे गेल्या. नंतर तिकडील विस्तीर्ण उत्तर समुद्रांतील एका महाद्वीपांत १०योजनें लांब रुंद असें एक मोठें सरोवर होतें तेथें त्या आल्या. या सरोवरामध्यें अनेक पंचरंगीं कमळें फुललीं असून अगदीं मध्यावर एक कमलिनी होती. तिच्यांतील एका पांढऱ्या कमलाचे देठांतील एका लहानशा तंतूंत इंद्र सूक्ष्म रूप धारण करून लपून बसला होता. इंद्राणी व उपश्रुति याही सूक्ष्म रूपानेंच त्या कमळाचे देठांत शिरल्या. इंद्राणीनें आपल्या पतीस सर्व हकीकत सांगितली. आणि 'आपलें पूर्वरूप व पूर्वतेज धारण करून व दुष्ट

बुद्धि नहुषाचा प्राण घेऊन माझें संरक्षण करा व देवांचे पुनः अधिपति व्हा ' अशी तिनें मोठ्या काकुळतीनें आपल्या पतीस विनंती केली. ( उद्यो० अ० १४ ) तेव्हां इंद्र तिला म्हणाला:— ' प्रिये, पराक्रम करण्याची ही वेळ नव्हे. कारण नहुषाचें केवळ दृष्टिक्षेपानें तेजोहरण करण्याचें सामर्थ्य अजून कायम आहे; तें आधीं नष्ट केलें पाहिजे. यासाठीं मीं तुला एक युक्ति सांगतों, तेवढी तूं कर. मी येथें आहें हें किंवा ही युक्ति तूं कोणासही सांगूं नको. ' ऋषींचे यानांत बसून तुम्हीं मजकडे यावें; माझी ही येवढी हौस तुम्हीं पुरविली म्हणजे मी तुम्हांस वश होईन ' असें तूं त्यास म्हण. तुझ्या या म्हणण्याप्रमाणें करूं लागतांच तो तेजोभ्रष्ट होईल. ' पतीची ही आज्ञा मान्य करून इंद्राणी परत आली; व नहुषाकडे जाऊन त्यास म्हणाली:—' इंद्राचा कोठेंच शोध लागत नाहीं. तुम्ही दिलेली मुदत केव्हां एकदां संपते व मी तुमची केव्हां भार्या होतें, असें मला झालें आहे. पण तूर्त तुम्हीं ती मुदत भरेपर्यंत ऋषींना आपली पालखी वाहावयास लावून व तींत बसून हिंडावें, अशी मला हौस आहे. पूर्वींच्या इंद्रास हत्ती, घोडे, रथ वगैरे पुष्कळ वाहनें होतीं; पण आपण त्याचेहूनही जास्त तेजस्वी व पराक्रमी आहां. तेव्हां आपण विष्णु शंकरादि देव किंवा कोणीही राक्षस यांजजवळ नाहीं असल्या अपूर्व वाहनांत बसून मुदतीचे अखेर मजकडे यावें; म्हणजे मी तुम्हांस वश झालेंच म्हणून समजा ' इंद्राणीचें हें मायावी बोलणें काममोहित व मदोन्मत्त नहुषास खरें वाटलें; येवढेंच नव्हे तर ' आपल्या अपूर्व तेजास व सामर्थ्यास योग्य असेंच वाहन हिनें आपणास सांगितलें ' असें वाटून तो इंद्राणीच्या गुणग्राहकतेचें व चातुर्याचें

कौतुक आणि आपल्या सामर्थ्याचें व पराक्रमाचें फुशारकीनें वर्णन करूं लागला !

इंद्राणी तेथून निघाली ती बृहस्पतींचे घरीं आली. पुढें कांहीं दिवसांनीं ती त्यांस म्हणाली:—' नहुषानें दिलेली मुदत आतां भरत आली आहे; तर इंद्राला लवकर शोधून काढून माझी नहुषाचें जाचांतून मुक्तता करा.' तेव्हां बृहस्पति म्हणाले:-' दुष्टबुद्धि नहुषाचा आतां लवकरच खास नाश होणार. अलीकडे तो ऋषींना आपलें वाहन वाहावयास लावीत असतो ! **अशा प्रकारचा उन्मत्तपणा व अधर्म करणाऱ्या नीच नहुषाचा नाश झालाच पाहिजे.** शिवाय त्याचे नाशार्थ मी एक स्वतंत्र यज्ञच करतों ! याप्रमाणें इंद्राणीस आश्वासन देऊन बृहस्पतींनीं इंद्रप्राप्त्यर्थ मोठा यज्ञ केला; व इंद्राचा शोध लावण्याविषयीं त्यानीं अग्नीस विनंती केली. अग्नीनें सर्व पृथ्वी धुंडाळली, पण त्यास कोठेंच इंद्र दिसला नाहीं. त्यानें पाण्याचे भीतीनें समुद्र वगैरेमध्यें मात्र शोध केला नव्हता. पण बृहस्पतींनीं त्याची पुनः स्तुति केली; तेव्हां अग्नीनें प्रसन्न होऊन समुद्र, सरोवरें वगैरे सर्व उदक—भाग शोधले. तेव्हां एका सरोवरांतील कमलाच्या देठांत इंद्र अणुप्रमाण रूप धारण करून लपलेला त्यास दिसला. त्यानें परत येऊन हें सर्व वर्तमान बृहस्पतीस कळविलें. तेव्हां बृहस्पति, इतर देव, ऋषि, गंधर्व, कुबेर, यम, सोम, वरुण वगैरे लोकपाल हे सर्व इंद्र होता तिकडे गेले; व त्याची स्तुति करूं लागले. यांची जसजशी स्तुति होऊं लागली तसतसा इंद्र वाढून बलवान् होऊं लागला. नहुषास देवराज्य कसें मिळालें, त्याचें तेजोहरणाचें सामर्थ्य केवढें आहे, व तो पुढें मदोन्मत्त कसा झाला, हेंही सर्व त्यांनीं इंद्रास निवेदन केलें. तेव्हां,

नहुषाचा आतां नाश केलाच पाहिजे, असें वाटून त्या संबंधानें सर्व देव, ऋषि व लोकपाल उपायचिंतन करूं लागले.

इकडे इंद्राणीची हौस व स्वतःची उद्दाम वृत्ति पुरविण्याकरितां हजारों ऋषींना आपली पालखी वाहावयास लावून नहुष सर्वत्र फिरूं लागला होता. एके समयीं त्याची पालखी अगस्त्य व इतर ऋषि हे वाहून नेत असतां एका संस्कारासंबंधाच्या वैदिक मंत्रा-विषयीं प्रश्न निघून नहुष व त्याचे वाहक ऋषि यांचेमध्यें वाद सुरू झाला. अखेर त्यांत नहुषानें चिडून उन्मत्तपणें अगस्त्यांचे मस्तकावर लाथ मारली! त्यासरशी **त्याच्या सर्व पुण्याचा क्षय झाला;** व अगस्त्यांचे शापामुळें तो स्वर्गराज्यभ्रष्ट होऊन पृथ्वीवर घोर सर्पाचे रूपानें पडला! अगस्त्यांनीं हें सर्व वर्तमान इंद्र व इतर देव होते तिकडे येऊन सांगितलें. तेव्हां सर्वांस मोठा आनंद होऊन ते स्वर्गाकडे परत आले; व तेथें पुनः इंद्र पूर्ववत् स्वर्गराज्याचें राजधर्मानुसार पालन करूं लागला. नहुष भुजंग-रूपानें पृथ्वीवर दहाहजार वर्षें पर्यंत हिंडत होता. ( उद्यो० अ० १५–१८ ) पण पुढें त्यानें भीमसेनास आपल्या प्रचंड विळ-ख्यांत धरल्यानंतर युधिष्ठिर तेथें आला; त्याचा व अजगररूपी नहुषाचा संवाद झाल्यावर नहुष शापमुक्त होऊन पुनः स्वर्गास गेला. ( वन० अ० १८१ )

# दंभोद्भव चरित्र.

प्राचीन काळीं संपूर्ण पृथ्वीवर राज्य करणारा, बलाढ्य व महारथी असा दंभोद्भवनामक एक सार्वभौम राजा होता. दररोज प्रातःकाळ झाला कीं उठून ब्राह्मणक्षत्रियांपैकीं जो जो भेटेल त्यास ' चतुर्वर्णी लोकांत माझ्यापेक्षां अधिक—निदान माझ्या बरोबरीचा—एखादा शस्त्रधारी वीर आहे काय ? असेल तर सांगा; मजला त्याशीं लढावयाचें आहे ' असा प्रश्न करीत फिरण्याचा त्याचा परिपाठ होता ! राजाच्या ह्या गर्वयुक्त व उद्धट प्रश्नाचा लोकांस फार वीट आला. कित्येक विद्वान्, निर्भय व धीट अशा ब्राह्मणांनीं ह्या मूर्खपणाबद्दल त्याची कानउघाडणी करून त्यास पुष्कळ वेळां झाडला; पण त्यानें आपलें हें वर्तन मुळींच सोडलें नाहीं. अखेर त्याचा हा उमटपणा असह्य झाल्यावर ब्राह्मणांनीं त्यास सांगितलें कीं, ' गंधमादन पर्वतावर **नरनारायण** मनुष्यरूपानें अवतरले असून तेथें तपश्चर्या करीत आहेत. त्यांच्या पासंगासही तूं पुरणार नाहींस. तुला युद्धाची जर येवढी खुमखुम असेल तर तूं त्यांजकडे जा. ' हें ऐकून **दंभोद्भव** राजा बरोबर सैन्य घेऊन **गंधमादन**पर्वताकडे गेला. तेथील एका दाट गर्दींत ते मुनि तप करीत होते. उपवासानें, तपानें व थंडी, वारा, ऊन यांमुळें शरीर कृश व सुकट होऊन गेलेले असे **नरनारायण** त्याचे दृष्टीस पडले. कुशलप्रश्न झाल्यानंतर मुनींनीं येण्याचें कारण राजास

विचारलें. तेव्हां तो म्हणाला:—' आपल्या बाहुबलानें मीं ही सर्व पृथ्वी पादाक्रांत करून सगळे शत्रु मारून टाकले आहेत. आतां मजशीं युद्ध करण्यास कोणीच उरलेला नाहीं. म्हणून तुम्हांशीं युद्ध करण्याकरतां मी इतका दूर आलों आहें. तर आपण मज अतिथीला हीच युद्ध-भिक्षा घालून अतिथिधर्म पाळावा ' हें ऐकून नरनारायण म्हणाले:—' या आमचे आश्रमांत क्रोध व लोभ यांचें वारें देखील जर नाहीं तर येथें शस्त्र कोठलें? तुला प्रतिस्पर्धी तरी कोठला? आणि युद्ध तरी कसलें? पृथ्वीवर इतर पुष्कळ क्षत्रिय आहेत, त्यांजकडे जाऊन तूं आपली युद्ध-तृष्णा भागीव! ' याप्रमाणें पुष्कळ उपदेश करून त्यास शांत करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. परंतु दंभोद्भव आपला गर्वमूलक हट्ट न सोडतां जास्तच अतिप्रसंग करूं लागला. तेव्हां अखेर त्याचें हें युद्धाचें आव्हान स्वीकारून नरानें त्याचा भुजकंडु शमविण्याचा निश्चय केला. दंभोद्भवानें सैन्यरचना करून चोहोंकडून त्या मुनींवर बाणांच्या वर्षावास प्रारंभ केला. पण नरानें केवल मूठभर बोरूचे तुकडे हातीं घेतले व ते ऐषिकास्त्रानें अभिमंत्रून दंभोद्भवाचे सैन्यावर टाकले. असल्या बोरूच्या भेटांनीं आपल्या सैन्यास व आपणास जिंकूं पाहणाऱ्या या मुनींचें राजास प्रथमतः हंसूं आलें. पण लवकरच या बोरूंनीं त्याच्या सर्व सैनिकांचे डोळे, नाक व कान भरून जाऊन सैन्यावरही या बोरूंचा वर्षाव होऊं लागला! तेव्हां दंभोद्भवाचा सर्व गर्व गळून तो त्या मुनींस शरण गेला; व त्यांच्या पायां पडून करुणा भाकूं लागला! त्या मुनींनीं त्यास अभय देऊन म्हटलें:—' पुनः असें करूं नको; तुझ्या सारख्या शूर क्षत्रियानें असला परपीडेचा विचार

मनांत सुद्धां आणूं नये. पराक्रमाचे घमेंडीवर लहान मोठ्यांचा धिःकार करणें इतउत्तर सोडून दे. अहंकार, लोभ, मोह यांचा त्याग करून आत्मसंयमन व क्षमावृत्ति धारण कर; आणि विचारपूर्वक सौम्य व दयार्द्र दृष्टीनें प्रजा—पालन कर.' याप्रमाणें उपदेश ऐकून व त्या मुनींचा निरोप घेऊन दंभोद्भव राजा राजधानीस परत आला; व पुढें खऱ्या राजधर्मानुसार प्रजापालन करूं लागला. ( उद्यो० अ० ९६ )

## मातली व गुणकेशी.





इंद्राचा प्रख्यात सारथी मातली यास एक कन्या होती. तिचें नांव गुणकेशी असें असून तिचें लावण्य व अंगबांधा अप्रतिम होता. ती उपवर झाली, तेव्हां मातलीनें तिचेकरतां अनुरूप वर शोधण्यासाठीं सर्व देव-लोक व मनुष्यलोक धुंडाळून पाहिले. पण गुण-केशीला सर्व प्रकारें शोभेल असा वर त्यास कोठेंच आढळला नाहीं. तेव्हां मातली व त्याची भार्या सुधर्मा यांस मोठी चिंता पडली. शीलवान्, थोर, लौकिकवान् आणि कोमल मनाच्या सत्कु-लांत कन्या उत्पन्न झाली असतां तिजसाठीं मातृकुल, पितृ-कुल व पतिकुल या तीनही कुलांना चिंता उत्पन्न होते, असे विचार त्यांचे मनांत येऊं लागले. शेवटीं, नाग हे कोमलता व सुस्व-रूप या गुणांत प्रसिद्ध आहेत, तर नागलोकीं जाऊन वर शोधावा, असें उभयतां पतिपत्नींनीं ठरविलें. त्याप्रमाणें मातली नागलोका-कडे निघाला असतां वाटेंत त्यास नारद भेटले; व नंतर उभयतां

सोबतीनें प्रवास करीत चालले. वाटेंत त्यांस वरुणलोक, पाताललोक, हिरण्यपुर, सुपर्णलोक, रसातल वगैरे लागले. नारदानीं तेथील सर्व तरुण मातलीस दाखविले; पण त्यांपैकीं एकही मातलीस पसंत पडला नाहीं. पुढें ते दोघे नागलोकीं आले. तेथील सुमुख नांवाचा नाग विनय, धैर्य, रूप व वय या दृष्टींनीं मातलीस पसंत पडला. हा ऐरावत कुळांतील आर्यक नागाचा नातू व चिकुर नागाचा पुत्र होता. त्याचा बाप नुकताच गरुडानें ठार मारला होता. ( उद्योगपर्व अध्याय ९७–१०३ ).

नारदानीं मातलीसह आर्यक नागाकडे जाऊन मातलीची मनीषा त्यास निवेदन केली. ते म्हणाले:—" आर्यका, हा मातली इंद्राचा परम मित्र, मंत्री व सारथी असून हा पवित्र, शीलवान्, गुणी, तेजस्वी व पराक्रमी आहे. देव–दैत्यांचे प्रत्येक युद्धांत हा नेहमीं इंद्राचे जवळ असून त्याचे बरोबरीनें पराक्रम करतो. याची गुणकेशी कन्या सत्यनिष्ठ, सुशील, गुणवती व अत्यंत सुंदर आहे. सर्व त्रैलोक्यांत सुमुख हाच वर त्यास पसंत पडला असून त्याचें शील, पावित्र्य व आत्मसंयमन हे गुण त्यास फार आवडले आहेत. तर त्याचे शब्दास मान देऊन गुणकेशीला आपली सून करून घे. " मातलीसारख्याशीं शरीरसंबंध होऊन गुणकेशी-सारखी सून मिळाली तर ती आर्यकास नको होती, असें नाहीं. पण तो सांप्रत मोठ्या संकटांत असल्यामुळें त्याच्यानें या विनंतीस रुकार देववेना. तो म्हणाला:–' तुम्ही म्हणतां तें योग्य आहे. पण गरुडानें सुमुखाचा पिता व माझा पुत्र चिकुर हा नुकताच भक्षण केला असून त्या दुःखांतच आम्हीं सर्व अद्याप आहों; आमच्या

डोळ्यांचें अजून पाणीही खळलेलें नाहीं. गरुडानें माझा पुत्र चिकुर ठार मारला, इतकेंच नव्हे तर ‘ एक महिन्यानें पुनः येऊन सुमुखासही मी खाईन ’ अशी त्यानें प्रतिज्ञा केली आहे. ही प्रतिज्ञा तो खरी करणार हें निश्चित आहे. अशा स्थितींत गुणकेशी-सारख्या कन्यारत्नाचें जन्माचें मातेरें करण्याचें मला धैर्य होत नाहीं. ’ आर्यकाचें हें भाषण ऐकूनही मातलीचें मन फिरलें नाहीं. तो म्हणाला:—‘ सुमुखाला मीं एकदां मनानें जावई केला तो केला. तुमची ही चिंता दूर करण्याचें काम तुम्ही मजवर सोंपवा व स्वस्थ असा. तुम्ही सुमुखास आमचे बरोबर द्या; त्याजसह इंद्राकडे मी जातों. गरुडाचें तुम्हांस जें भय पडलें आहे, त्याचें निवारण करण्याचें काम आम्हांकडे लागलें, तुम्ही निश्चित असा. ’ ही मसलत आर्यकास पसंत पडून त्यानें सुमुखास मातली व नारद यांचे समवेत पाठवून दिलें. हे तिघे इंद्राकडे आले, त्या वेळीं श्रीविष्णूही तेथें होते. नारदानें सर्व वृत्त उभयतांस निवेदन केलें. तेव्हां ‘ सुमुखास अमृत पाजून अमरच करून टाकावें, म्हणजे गरुडाची भीति मुळींच उरणार नाहीं ’ असें श्रीविष्णूनीं सुचविलें. परंतु तसें न करतां इंद्रानें सुमुखास दीर्घायुष्यमात्र दिलें. तेवढ्यानें त्या तिघांस आनंद झाला. पुढें सुमुख व गुणकेशी यांचा विवाह होऊन मातली व आर्यक यांचे मनोरथ पूर्ण झाले. ( उद्योगपर्व, अ० १०४ )

सुमुख नागास दीर्घायुष्य देऊन इंद्रानें आपल्या तोंडचा घांस काढून घेतला व आपला अपमान केला, असें वाटून संतप्त होऊनच गरुड इंद्राकडे आला; व त्यास म्हणाला:—“ सर्प हेंच

भक्ष्य आम्हां गरुडांस ब्रह्मदेवानें नेमून दिलें आहे; तें आम्हीं भक्षण केलें तर आमचा काय दोष ? तुम्हीं मात्र मला न जुमानतां माझे तोंडचा घांस काढून घेतला. सुमुख नाग हें भक्ष्य निवडून मीं त्यास खाण्याचा दिवसही नक्की ठरविला आहे. असें केल्यावर दुसऱ्या नागाचें भक्षण करून मी शरीरपोषण करीन, तर मग माझी किंमत ती काय ? आपण देवेंद्र आहां. पण आपल्या या खेळानें आमचे प्राण जात आहेत. मी आपले परिवारासह तुमचे समक्ष प्राणत्याग करतों; एकदां तुमचें तरी समाधान होऊंद्या! तुम्हीं माझा असा अपमान करतां याचा दोष तुम्हांकडे नसून मजकडेच आहे. मी तुमच्या बंधूची ( उपेंद्राची–विष्णूची ) गुलामगिरी पत्करली, हा माझाच आत्मघातकीपणा झाला. ह्या आत्मघातकीपणाचे पापाबद्दल मला याहूनही मोठें प्रायश्चित्त मिळालें पाहिजे. आपण मोठे देवेंद्र आहां; पण मीही कोणीतरी आहें. माझी माताही दक्षाचीच कन्या आहे. मीही बलवान् असून त्रैलोक्याचा भार सहन करण्याचें मजमध्येंही सामर्थ्य आहे. दैत्यांशीं झालेल्या युद्धांत मींही अनेक दैत्य मारले आहेत. मी विष्णूचे ध्वजस्थानीं राहून त्यांस परिवारासह वाहून नेतों. खरें पाहतां माझे इतका बळकट व भारसाही दुसरा कोणीही नाहीं. असें असूनही श्रीविष्णूची इमानानें सेवा केल्याबद्दल तुम्ही उभयतांनीं हें मला चांगलेंच बक्षिस दिलेंत ! मी आपले बलाबद्दल पोकळ घमेंड मारतों असें मुळींच नाहीं. सर्व जगतांत हे श्रीविष्णु अत्यंत बलवान् आहेत हें खरें. पण त्यांस त्यांच्या परिवारासह माझ्या पंखांच्या एका टोंकावर घेऊन मीं सहज व न दमतां वाहून नेतों, याची साक्ष खुद्द विष्णूच देतील. मग खरो-

खर अधिक बलवान् कोण? " याप्रमाणें **गरुडाचें गर्वाचें व उद्दामपणाचें भाषण चालून** तो जेव्हां प्रत्यक्ष श्रीविष्णूवरच घसरला, तेव्हां ते त्यास शांतपणानें पण खिजविण्याचे उद्देशानें म्हणाले:—' गरुडा, तूं आमचे समोर असला घमेंडखोरपणा करूं नको. खुळ्या, माझा भार मीच तोलून धरीत असतों व खरोखर तुलाही मीच वाहून नेतों, हें तुला कोठें माहीत आहे? माझा भार त्रैलोक्यही सहन करणार नाहीं, तेथें तुझी कथा काय? तूं सहज मला वाहून नेतों म्हणतोस, तर आतांच त्याची प्रतीति पाहूंया. मी हा आपला उजवा हात तुझे खांद्यावर ठेवतों, तेवढा तुला सोसवतो का पाहूं म्हणजे झालें.' असें म्हणून श्रीविष्णूनीं आपला उजवा हात सहज व हलकेच गरुडाचे खांद्यावर ठेवला; तोंच गरुडानें त्या भाराखालीं पंख पाडले, त्याचें सर्वांग खिळखिळें झालें व तो कण्हूं कुंथूं लागून अखेर तोंड वासून मूर्च्छित पडला! कांहीं वेळानें सावध झाल्यावर **सगळा गर्व पुरता जिरून गरुड** श्रीविष्णूंस म्हणाला:— ' भगवन्,आपल्या नुसत्या हाताच्या सौम्य भारानेंच मी चेंगरून मरणोन्मुख झालों. माझे गर्वोक्तीबद्दल मला क्षमा करा. मी तुमचें एक मूर्ख मूल आहें—तुमचे ध्वजावरचें एक लहानसें पाखरूं आहें; माझें सामर्थ्य तें किती असणार? आपल्या सामर्थ्याचा आजपर्यंत मला अनुभव नव्हता, म्हणून मी स्वतःस अतुल बलवान् मानीत असें. पण आतां माझी भ्रांति दूर झाली!' हें ऐकून श्रीविष्णूनीं कृपापूर्वक गरुडाचे खांद्यावरचा हात काढला; आणि ' पुनः घमेंड करूं नको ' असें त्यास सांगून त्यानीं आपले पायाचे अंगठ्यानें सुमुख नाग उडवून **गरुडाचे छातीवर बसविला.** ज्या नागास

भक्ष्य म्हणून गरुड खाऊन टाकणार होता, तोच नाग तेव्हां-पासून गरुडाच्या गर्विष्ठपणाचें व उतरलेल्या घमेंडीचें स्मारक म्हणून सदैव त्याचे छातीवर बसून राहिला.— ( उद्योगपर्व, अध्याय १०५ )

## गालव, ययाति व माधवी.





प्राचीनकाळीं विश्वामित्र ऋषि उग्र तप करीत असतां, त्यांची परीक्षा पाहण्याचे उद्देशानें यमधर्म वसिष्ठ ऋषींचें रूप धारण करून आला; व क्षुधित अतिथि या नात्यानें त्यांजपाशीं अन्न मागूं लागला. विश्वामित्रानीं तात्काळ उत्तम तांदूळ शिजत घातले. पण ते शिजेपर्यंत दम न धरतां अतिथीनें दुसऱ्या तपस्व्यांकडे जाऊन आपली भूक भागविली. विश्वामित्र कढत कढत भाताची तपेली घेऊन त्याजकडे गेले; तेव्हां ' माझें जेवण झालें, पण तूं असाच थोडा थांब ' असें सांगून वसिष्ठ-रूपी यमधर्म निघून गेला. त्याचे आज्ञेप्रमाणें विश्वामित्रऋषि कढत भाताची तपेली डोक्यावर घेऊन आश्रमाचे वळचणीलाच केवळ वायु भक्षण करून खांबाप्रमाणें निश्चेष्ट असे १०० वर्षे उभे राहिले ! या अवधींत त्यांच्या गालवनामक शिष्यानें, विश्वा-मित्र हे सर्वमान्य ऋषि व आपले गुरु आहेत असें जाणून आणि त्यांची मर्जी संपादण्याकरतां व मनाच्या कळवळ्यानेंही त्यांची काळजीपूर्वक सेवा केली. शंभर वर्षांनीं पुनः वसिष्ठरूपी यम-धर्मानें येऊन विश्वामित्रांचा तो ताजा ताजा व ऊन ऊन भात खाल्ला, व ' विप्रर्षे, मी संतुष्ट झालों ' अशा उद्गारांनीं त्यांस

ब्राह्मणत्व देऊन तो निघून गेला. विश्वामित्रही गालवानें केलेली शुश्रूषा व भक्ति यांनीं संतुष्ट झाले व त्यास वाटेल तिकडे जाण्याची त्यांनीं अनुज्ञा दिली. पण गुरुदक्षिणा दिल्यावांचून परत जाणें योग्य नव्हे, असें जाणून तो त्यांस 'गुरुदक्षिणा काय देऊं' असें विचारूं लागला. 'तुझ्या सेवेनेंच मला सर्व कांहीं पावलें, निराळी दक्षिणा देण्याचें प्रयोजन नाहीं' असें सांगून विश्वामित्र गालवाची समजूत करूं लागले. पण गालव हटवादीपणानें 'गुरुदक्षिणा काय देऊं' असेंच सारखें म्हणत राहिला. तेव्हां अखेर थोड्यांशा रागानेंच विश्वामित्र त्यास म्हणाले:—"ज्यांचा एकच कान काळा असून अंगकांति चंद्राप्रमाणें शुभ्र आहे, असे ८०० घोडे गुरुदक्षिणा म्हणून मला आणून दे. हं, उठ. आतां येथें थांबूं नको." आपल्या गुरूचें हें भाषण ऐकून गालवाच्या तोंडचें पाणी पळालें; त्यास अन्न गोड लागेना व झोंपही येईना; तो चिंता व शोक यांनीं ग्रस्त होऊन फिकट होत चालला; व त्याचीं नुस्तीं अस्थिचर्में राहिलीं. 'मजजवळ एक दमडीही नाहीं व माझा कोणी श्रीमान् मित्रही नाहीं, मी आतां गुरुदक्षिणा कशी देऊं? बरें न द्यावी तर जगून तरी काय उपयोग?

प्रतिश्रुत्य करिष्येति कर्तव्यं तदकुर्वतः ।
मिथ्यावचनदग्धस्य इष्टापूर्तं प्रणश्यति ॥
न रूपमनृतस्यास्ति नानृतस्यास्ति संततिः ।
नानृतस्याधिपत्यं च कुत एव गतिः शुभा ॥
कुतः कृतघ्नस्य यशः कुतः स्थानं कुतः सुखं ।
अश्रद्धेयः कृतघ्नो हि कृतघ्ने नास्ति निष्कृतिः ॥

'अमुक एक काम करीन' असें वचन दिल्यावर वचन देणाराचें तें कर्तव्य होतें. तें कर्तव्य जर केलें नाहीं तर

त्यास मिथ्याभाषणाचा दोष लागून त्याचें सर्व सुकृत नष्ट होतें; असत्य भाषण करणारास ऐहिक रूप, संपत्ती किंवा अधिकार हींही प्राप्त होत नाहींत, मग पारलौकिक सद्गति तरी कोठली मिळणार ? वचनभंग करणाऱ्या कृतघ्नास यश, सुख, आश्रय यांचा कोठेंही लाभ होत नाहीं. सर्व-जण त्यास अविश्वास्य मानतात; किंबहुना असल्या कृतघ्न-तेचे पातकास प्रायश्चित्तही नाहीं ! अशा प्रकारचा कृतघ्न पातकी मी आतां ठरणार " असे अनेक विचार गालवाचे मनांत वारंवार येऊं लागले. अखेर विश्वामित्रांनीं मागितले तसे अश्व मिळवि-ण्याचा एकवार प्रयत्न करून पाहावयाचा व त्यांत यश न आल्यास प्राणत्याग करावयाचा, असा त्यानें आपले मनाशीं पक्का निश्चय केला.

इतक्यांत गालवाचा मित्र गरुड हा श्रीविष्णूचे परवानगीनें त्याजकडे आला; आणि काळ अनुकूळ असलेल्या पुरुषानें आपल्या विपद्ग्रस्त मित्रास साहाय्य करावें हा मित्रधर्म आहे; असें जाणून अश्व-शोधनार्थ आपल्या पाठीवरून गालवास जगभर फिरविण्याचें गरुडानें कबूल केलें. " प्राचीनकाळीं सर्वांच्या ' पूर्वीं ' देवांनीं हीं दिशा प्रथमतः व्यापिली होती, म्हणून हिला ' पूर्व ' म्हणतात. ही दिशा सूर्यानें कश्यप गुरूस ' गुरु दक्षिणा ' म्हणून दिली, याकरतां तिला ' दक्षिण ' म्हणतात. दिवसाच्या ' पश्चात् ' भागीं सूर्य जिकडे जाऊन किरण सोडतो, ती ' पश्चिम;' व पुरुषास पापांतून ' उत्तीर्ण ' करणारी व सर्वांहून ' उत्कृष्ट ' अशी जी दिशा ती ' उत्तर ' होय. " असें सांगून प्रत्येक दिशेचें माहात्म्य गरुडानें गालवास सांगितलें; व तुला मीं आपल्या पाठी-

वरून यांपैकीं कोणत्या दिशेकडे नेऊं, असें त्यास विचारलें. ( उद्यो० अ० १०६–१११ ) पूर्वेकडेच प्रथम जावें, असें गालवानें सुचविल्यावरून गरुडानें गालवास आपल्या पाठीवर घेऊन त्या दिशेकडे जोरानें भरारी मारली. गरुडाचा वेग जसजसा वाढत चालला तसतसा गालवाचा आनंद मावळून तो भ्यावयास लागला. गरुडाच्या पंखांचे वाऱ्यानें उन्मूळलेले अनेक वृक्ष, खवळलेला समुद्र व त्याच्या गर्जना यांचे योगानें गालवाची इतकी गाळण उडाली कीं त्याच्या कानठळ्या बसल्या, त्याचे डोळ्यापुढें अंधेरी आली व आतां आपण खास मरणार असेंही त्याचे मनानें घेतलें! तो गरुडास काकळुतीनें म्हणालाः—“ तुझा हा वेग मला मुळींच सहन होत नाहीं; तुझे साह्यानें इष्टप्राप्ति होण्याऐवजीं मी गरीब ब्राह्मण मरून मात्र जाऊन तुला ब्रह्महत्या लागणार! माझें मरणच आलें असलें तर मला खालीं उतर; म्हणजे मी जरा सुखानें तरी मरेन! ”

त्याचें हें भाषण ऐकून समुद्रतीरच्या ऋषभनामक पर्वताचे माथ्यावर गालवासह गरुड उतरला. तेथें शांडिलीनामक एक ब्राह्मणी तपश्चर्या करीत होती. उभयतांनीं तिला नमस्कार केल्यावर तिनें त्यांस सत्कारपूर्वक पवित्र अन्न खावयास दिलें. तें खाल्ल्यावर उभयतांसही समाधान होऊन त्यांस झोंप लागली. दोन घटकांनीं गरुड जागा होऊन पाहतो तों आपले पंख गळून पडून आपण लोळागोळा झालों आहोंत असें त्याचे दृष्टीस पडलें! गरुडाची ही स्थिति पाहून गालवास वाईट वाटलें. तो त्यास म्हणालाः—‘ कांहींतरी धर्मविरुद्ध भलतीच गोष्ट तूं मनांत आणली असली पाहिजे; त्यावांचून तुला असली जबरदस्त शिक्षा झालेली

नाहीं. ' यावर गरुडानें उत्तर केलें कीं, ' ब्रह्मदेव, महादेव व श्रीविष्णु जेथें आहेत अशा स्थलीं या तपस्विनीनें असावें, असें मला वाटून मीं तिला आपल्या खांद्यावरून तिकडे नेण्याचें मनांत आणलें होतें इतकेंच. हें या तपस्विनीस आवडलें नसेल, पण यांत माझा कोणताही वाईट हेतु नव्हता. हें जाणून व आपल्या थोर-पणास अनुसरून तिनें मला क्षमा करावी. ' गरुडाचें हें बोलणें ऐकून शांडिली ब्राह्मणी म्हणाली:—" गरुडा, भिऊं नको; तूं माझे प्रसादानें पुनः ' सुपर्ण ' ( उत्तम पंखांनीं युक्त ) होशील. तूं मनांत कां होईना मला क्षुद्र समजून माझी एका प्रकारें निंदाच केलीस, त्याचा मला राग आला. सदाचार कडक रीतीनें मी पाळीत असल्यामुळें माझे ठायीं नांव ठेवण्यासारखें कांहींच नाहीं. **सदाचरणानें संकटें टळतात; आणि धर्म, अर्थ व काम यांचें साफल्यही सदाचार असेल तरच होतें.** आतां तूं सुखानें वाटेल तिकडे जा; पण पुनः माझी किंवा **कोणत्याही स्त्रीची** इतउत्तर **निंदामात्र करूं नको.** " शांडिलीचे कृपेनें गरुडास पहिल्यापेक्षांही अधिक बळकट असे पंख फुटले; व गालवास पाठीवर घेऊन तो पुनः भरारी मारून आकाशांत उडाला. वाटेंत विश्वामित्र ऋषीही त्यांस भेटले. ते गालवास म्हणाले:––' गालवा, तूं गुरुदक्षिणा देणार होतास त्याची मुदत आतां भरत आली आहे. तथापि तुझें म्हणणें असेल तर मी आणखी कांहीं दिवस वाट पाहीन. ' गुरूचें हें भाषण ऐकून गालव इतका लाजला कीं, कांहीं एक उत्तर न करतांच तो पुढें चालता झाला( उद्योगपर्व, अध्याय ११२–११२ ).

वाटेंत **गरुड गालवास** म्हणाला कीं, ' काहीं तरी उद्योग करून द्रव्य संपादन केल्यावांचून तुला ८०० अश्व मिळणार नाहींत व गुरुदक्षिणाही देतां येणार नाहीं. एक **सोमवंशी** राजा माझा मित्र असून त्याजजवळ अपार संपत्ती आहे; **नहुषपुत्र ययाती** हें त्याचें नांव असून ह्या **प्रतिष्ठान** नगरींत तो राहत असतो. आपण तिकडे जाऊंया; मी तुझी हकीकत त्यास सांगेन, तूंही त्याजपाशीं याचना कर. म्हणजे तुला **प्रजापीडन न करतां मिळविलेलें धन तो तुला देईन** व तूं कृतकृत्य होशील. ' **गरुडाचें** हें बोलणें **गालवास** पसंत पडून उभयतां **ययाती** राजाकडे गेले. **गरुडानें गालवाचा** सर्व वृत्तांत राजास निवेदन केला; आणि ' या सत्पात्र ब्राह्मणास द्रव्य देऊन किंवा त्यास इष्ट असे ८०० घोडे देऊन तूं संतुष्ट कर; म्हणजे तो तुझ्या कल्याणार्थ तप करीत राहून तुला त्या तपाचाही वांटा देईल ' असेंही त्यानें राजास सांगितलें. **ययाति** राजापाशीं एकेकाळीं पुष्कळ संपत्ति होती; पण ती या वेळीं संपून गेली होती. तरी पण **सत्पात्र अतिथीस हताश व विन्मुख करणें मोठें पातक होय**, असें जाणून **ययातीनें** आपली **माधवीनामक** अत्यंत लावण्यवती व गुणवती कन्या **गालवाचे** स्वाधीन केली. आणि सांगितलें कीं, ' राजे लोक तुम्ही जें मागाल तें हिचें मूल्य तुम्हांस देतील; तुम्ही ही राजांस देऊन आपणास हवे ते अश्व मागून घ्यावे. मात्र माझी एक शर्त अशी आहे कीं, हिचे पोटीं होणारे पुत्रांवर, माझी वंशवृद्धि करणारे या नात्याचा, हक्क राहिला पाहिजे. ' **ययातीचे** या म्हणण्याप्रमाणें **गालवानें माधवीचा** स्वीकार केला; व तो तिला घेऊन निघाला. **गालवाचें** आतां निमें शिमें

काम झालें, असें समजून गरुडही स्वस्थानीं निघून गेला. ( उद्यो० अध्याय ११४–११५ )

सूर्यवंशी हर्यश्व राजा अयोध्येंत संतानप्राप्त्यर्थ तप करीत होता, त्याजकडे प्रथमतः जाऊन गालवानें त्यास ही कन्या देऊं केली; आणि तिचें शुल्क म्हणून, चंद्राप्रमाणें कांतिमान्, पांढरे शुभ्र व एकच कान काळा असलेले आठशें घोडे त्याजपाशीं मागितले. हर्यश्वापाशीं श्यामकर्ण पुष्कळ होते; पण गालवास हवे होते तसले अश्व त्याजपाशीं फक्त २०० च होते; त्यामुळें गालवाची इच्छा व आपला मनोरथ कसा शेवटास जातो याची हर्यश्वास चिंता पडली. माधवीला एका ब्रह्मनिष्ठानें असा वर दिला होता कीं, इतर तरुणीं-प्रमाणें प्रसूतीमुळें तिचें तारुण्य व कौमार्य नष्ट न होतां, प्रत्येक प्रसूतीनंतर तिनें मनांत संकल्प करतांच तें तिला पुनः प्राप्त होईल ! ह्या वराची हकीकत सांगून माधवीनें गालवास सुचविलें कीं, ' तुम्ही २०० च अश्व घेऊन मजला हर्यश्वास द्यावी, व त्याजपासून माझे पोटीं एक पुत्र झाल्यानंतर मला पुनः तुम्ही दुसऱ्या राजास देऊन आणखी अश्व मिळवावे. ' माधवीचें हें म्हणणें गालवास पसंत पडलें; आणि २०० अश्वांचें शुल्क घेऊन त्यानें माधवी यथाविधि विवाह करून हर्यश्वास अर्पण केली. योग्य काळीं तिला त्याजपासून एक पुत्र झाला. हा नेहमीं ब्राह्मणास ' वसू ' चें-द्रव्याचें—दानकरी म्हणून त्याचीं ' वसु ' व ' वसुमना ' अशीं नांवें पडलीं. मुदत भरतांच गालवानें राजाकडे येऊन माधवी कन्या मागितली, व ती राजानेंही परत केली. गालवानें यानंतर याच-प्रमाणें काशिराज भीमसेनाचा पुत्र दिवोदास यासही २०० घोड्यांचें शुल्क घेऊन माधवी अर्पण केली, व तिचे पोटीं प्रतर्दन-

नामक पुत्र त्यास झाल्यावर तिला त्यानें परत नेलें. तिसऱ्या खेपेस याच प्रमाणें त्यानें तिला भोजनगरांतील औशीनर (उशीनर पुत्र) राजास २०० घोडे शुल्क म्हणून घेऊन दिली; व त्याजपासून तिला 'शिबी' नामक पुत्र होतांच तिला त्यानें परत घेतली. गालवास हवे होते तसे ६०० अश्व तर मिळून चुकले, राहिलेल्या २०० अश्वांचे किंमतीइतकें द्रव्य गालवास देऊन राजाला माधवी आणखी कांहीं दिवस आपणाजवळ ठेवतां आली असती. परंतु '**राजानें प्रजेपासून जो कर घ्यावयाचा तो केवळ तिचेच कामीं पुनः लावण्यासाठीं होय. या पैशाचा राजांनीं स्वतःचे चैनीकडे उपयोग करणें न्याय्य नव्हे. जो राजा रयतेच्या द्रव्याची मनमानेल तशी उधळपट्टी करतो, त्यास धर्मदृष्ट्या पाप लागतें व लौकिक दृष्ट्या त्याची अपकीर्ति होते.**' असें सांगून बाकीच्या दोनशें अश्वांऐवजीं द्रव्य न देतां औशीनर राजानें माधवीच गालवास परत दिली. तिला घेऊन गालव चौथ्या राजाचा शोध करवयास निघाला असतां, त्यास वाटेंत पुनः गरुड भेटला. ( उद्यो० अ० ११६–११८ ) माधवी-कन्या तीन राजांस देऊन तिचे बद्दलचें शुल्क म्हणून गालवास फक्त ६०० च अश्व मिळाल्याचें गरुडास समजलें. तेव्हां तो गालवास म्हणालाः—" पूर्वी कान्यकुब्ज देशाचा गाधिनामक राजा असून त्याला सत्यवती नांवाची एक कन्या होती. तिजबद्दल ऋचीकानें त्याजजवळ मागणी घातली. तेव्हां गाधीनें शुल्क म्हणून, सर्व अंग पांढरें शुभ्र पण एकच कान काळा असे एक हजार घोडे त्याजपाशीं मागितले. ऋचीकानें वरुण लोकांत जाऊन अश्वतीर्था-सन्निध असे १००० अश्व संपादन केले व ते गाधि राजास देऊन

त्याची कन्या मिळविली. पुढें गाधीनें पुंडरीक यज्ञ केला, त्यावेळीं त्यानें हे घोडे ब्राह्मणांस दान केले. या तीन राजांनीं प्रत्येकीं दोन दोनशें घोडे त्यांजपासूनच घेतलेले होते; बाकीचे ४ शें घोडे वितस्ती नदीचे उतारांतून जात असतां वाहून गेले. अर्थात् तुला मिळाले त्याहून आणखी असला एकही घोडा तुला आतां कोठेंही मिळणार नाहीं. करतां यापुढें कोठेंही न हिंडता हे ६०० घोडे व बाकीच्या २०० घोड्यांचे मोबदल्यांत ही माधवी कन्या विश्वामित्रांस देऊन तूं त्यांचे गुरुदक्षिणेचे ऋणांतून मुक्त हो." गरुडाचें हें भाषण गालवास पसंत पडलें; व त्यानें विश्वामित्रांकडे येऊन हे ६०० अश्व व बाकीच्या २०० घोड्यांऐवजीं माधवी कन्या त्यांस अर्पण केली. तिचें अप्रतिम रूप व यौवन पाहून विश्वामित्र म्हणाले कीं, "ही कन्या तूं प्रथमतःच सबंध गुरुदक्षिणेच्या ८०० अश्वांचे मोबदल्यांत मलाच दिली असतीस तर फार बरें झालें असतें. म्हणजे मग मला हिचे पोटीं ४ पुत्र झाले असते. असो, आतां झालें तें झालें. एक पुत्र होतांच मी हिला तुझ स्वाधीन करीन." योग्यकाळीं माधवी पासून विश्वामित्रांसही अष्टक-नामक पुत्र झाला. त्यास आपलें सर्व द्रव्य व हे ६०० अश्व देऊन व माधवी गालवाचे हवालीं करून विश्वामित्र तप करण्यास निघून गेले. माधवीला याप्रमाणें चार पुत्र होऊन त्यांपैकीं पहिला दाता, दुसरा शूर, तिसरा धार्मिक व सत्यनिष्ठ आणि चवथा यज्ञयाग करणारा निघाला. या पुत्रांचे द्वारें माधवीनें आपल्या पित्याचें, चार राजांचें व गालवाचेंही तारण केलें. पुढें वचन दिल्याप्रमाणें गालवानें माधवी कन्या नेऊन ययातीस परत दिली. चार पुत्र होऊनही ती ब्रह्मनिष्ठाचे वरामुळें कुमारीच राहिली होती. तिचा विवाह करण्याचें

मनांत आणून ययातीनें तिला पुष्पमालांसह रथांत बसविलें; आणि तिचे बरोबर यदु व पुरु हे आपले राजपुत्र देऊन तिला वराच शोध करण्यास पाठविलें. हे भाऊ–बहिण गंगायमुना–संगमा-नजीकचे सर्व प्रदेश, नगरें व आश्रम हिंडले. पण माधवीस पसंत होईल असा एकही वर त्यास आढळला नाहीं. तेव्हां माधवीनें 'वन' हाच आपला पति मानला; आणि तिनें वनांतच मृगवृत्तीनें राहून व घोर तपश्चर्या करून शेष आयुष्य घालविलें. ( उद्योगपर्व, अध्याय ११९–१२० )

## अंबा व शिखंडी.





चित्रांगदाचे मृत्यूनंतर त्याचा धाकटा भाऊ विचित्र-वीर्य यास भीष्मानीं राज्याभिषेक केला. नंतर काशि-राजाच्या तीन कन्या अंबा, अंबिका व अंबालिका यांचें स्वयंवर होत होतें, भीष्मांनीं तिकडे जाऊन स्वयंवरासाठीं जमलेले शाल्वादि राजे युद्धांत पराभूत करून तीनही कन्या हरण करून आणल्या. या तीनही कन्यांचा विचित्रवीर्याशीं विवाह करण्याचा भीष्मांचा संकल्प होता. पण अंबेचें मन पूर्वींच शाल्वराजावर बसलें असून तिनें त्यास मनानें वरलें होतें; त्यानेंही एकांतात ही गोष्ट मान्य केली होती; स्वयंवर प्रसंगीं ती त्यासच वरणार होती, व तिच्या बापाचाही तोच मानस होता; असें अंबेचेच तोंडून कळल्यावर भीष्मानीं बरोबर वृद्ध ब्राह्मण व दाया देऊन तिला शाल्वराजाकडे पाठवून दिली; व

धाकट्या दोघींचाच विचित्रवीर्याशीं विवाह केला. ( आदि० अ० १००-१०१ व उद्यो० अ० १७३- १७४ )

अंबेनें शाल्वराजाकडे येऊन आपला स्वीकार करण्याविषयीं त्यास विनंती केली; परंतु ती त्यानें मुळींच ऐकिली नाहीं. तो म्हणालाः—‘ भीष्मानीं सर्व राजे जिंकून व तुझें मनगट धरून तुला हरण करून नेली; व तूंही आढेवेढे न घेतां गेलीस. अर्थात् माझ्यासारख्या धर्मज्ञ राजास असला उष्टा घांस तोंडांत घालतां येत नाहीं. ’ शाल्वराजाचें हें भाषण ऐकून अंबेस पराकाष्ठेचें दुःख झालें. रडत रडत ती दीनवाणीनें त्यास म्हणालीः—‘ महाराज, असा निष्ठुरपणा करूं नका. मी आपखुशीनें भीष्मांबरोबर गेलें नाहीं; मी तर सारखी रडत होत्यें. भीष्मानीं सर्व राजांस जिंकून त्यांचे समक्ष आम्हांस जबरदस्तीनें रथांत घातलें, तेथें मी अबला काय करणार ? हस्तिनापुरांत मीं खरा प्रकार भीष्मांस सांगतांच त्यानींच मला आपणाकडे पाठविलें आहे. भीष्मानीं माझा हात धरला असला तरी माझ्याशीं ते विवाह लावणार नसून आपल्या धाकट्या भावाकरितांच त्यानीं हें कन्याहरण केलें. आपणांवांचून अन्य पुरुषाचा माझे मनासही अद्याप स्पर्श झालेला नाहीं. मी निरपराधी, पवित्र व आपणावर अनुरक्त आहें; तर माझा त्याग नकाहो करूं ’ याप्रमाणें अंबेनें त्याची करुणा भाकली. परंतु त्यानें तिचें मुळींच ऐकिलें नाहीं. भीष्मानीं तिला हरण करून नेल्यामुळें, विशेषतः भीष्मांच्या पराक्रमाचा प्रत्यक्ष प्रत्यय आल्याकारणानें, शाल्वराजा त्यांस फार भीत असे; म्हणून त्यानें अंबेचा स्वीकार केला नाहीं.

शाल्वराजानें याप्रमाणें निराशा केल्यानंतर अंबा आक्रोश करीत नगराचे बाहेर पडली. तिचें मन दुःखाच्या व संतापाच्या विचारांनीं भरून गेलें होतें. ' माझ्या माहेरच्या माणसांनीं मला टाकलें व शाल्वानेंही माझा त्याग केला. हस्तिनापुरास परत जाण्यास तरी मला आतां कोठें तोंड आहे ? भीष्मानीं माझ्या आग्रहावरूनच मला शाल्वाकडे पाठविली. माझ्या या स्थितीबद्दल दोष तरी कोणास द्यावा ? स्वतःला, भीष्माला, पित्याला कीं शाल्वाला ? भीष्म मला नेऊं लागले असतां, त्याच वेळेस मीं शाल्वाचें नांव सांगून रथांतून खालीं उडी टाकली नाहीं, हा माझाच दोष नव्हे काय ? किंवा माझ्या पित्यानें, बाहुबल हीच किंमत लावून, एखाद्या वारांगनेप्रमाणें माझा लिलांव मांडला नसता, तर हा प्रसंग तरी कां येता ? पण एकंदरीनें भीष्मानीं जर कन्याहरण केलें नसतें तर शाल्वानेंही माझा त्याग केला नसता व मजवर हें संकट आलें नसतें. ह्याचा मुख्य दोष भीष्माकडेच असून याचा तपानें किंवा युद्धानें सूड उगविलाच पाहिजे, अशा अनेक विचारांनीं अंबेचे मनांत काहूर उठविलें होतें. नगराबाहेरच्या एका तपोवनांत जाऊन अंबेनें तेथील ऋषींपाशीं आश्रयाची याचना केली. तिची हकीकत ऐकून त्या तपस्व्यांस दया आली. तेथेंच राहून तपश्चर्येंत आयुष्य वेंचण्याचा तिचा संकल्प होता; पण त्यापासून ते तिला परावृत्त करूं लागले. आपण हिला घेऊन भीष्माकडे जावें असें कोणी म्हणूं लागले; तर शाल्वाकडे जावें असें इतरांचें मत पडलें. तिसऱ्यांचें असें म्हणणें पडलें कीं,

**पतिर्वापि गतिर्नार्याः पिता वा वरवर्णिनि ।**
**गतिः पतिः समस्थाया विषमे च पिता गतिः ॥**

स्त्रियांना पति किंवा पिता यांवांचून दुसरें योग्य आश्रयस्थान नाहीं. सुस्थितींत पति व दुःस्थितींत पिता हेंच त्यांचें आश्रयाचें स्थान होय. ‘ दिलें घर कीं उपजलें घर ’ ‘ आपघर कीं बापघर ’ हाच न्याय स्त्रियांस केव्हां झालें तरी लागू आहे. अशा तारुण्यांत हिजसारखी राजकन्या तपोवनांत एकटी राहील तर अनेक राजे लग्नासाठीं तिची प्रार्थना करूं लागून, तिची तपश्चर्या एका बाजूसच राहील. तेव्हां अंबेनें आतां आपल्या पित्याकडे जावें, असें तपस्व्यांचें अखेर मत झालें. पण ‘ भीष्म व शाल्व या दोघांकडूनही अपमान झालेली अशी मी माहेरींही जाणार नाहीं. तेथील सर्व माणसें माझी हेटाळणीच करतील, करतां मी तिकडे न जातां येथेंच राहणार. आपणांसारख्या तपस्व्यांचा आश्रय असल्यावर माझे वाटेस कोण जाईल ? ’ असें म्हणून अंबा आपला निश्चय सोडीना. अंबा व तपस्वी यांच्या मध्यें याप्रमाणें वाटाघाट चालली असतां होत्रवाहन सृंजयनामक एक राजर्षि तेथें आला. अंबा ही त्याच्या मुलीची मुलगी होती; तिची ही दुःखाची कहाणी ऐकून त्यास फारच वाईट वाटलें. अंबा आपलें नांव सांगून आपला मित्र परशुराम यास शरण गेली, तर तो हिचें दुःख नाहींसें करील, असें वाटून संजयानें तिला हीच सल्ला दिली. इतक्यांत परशुरामाचा अकृतव्रण नांवाचा एक अनुचर तेथें आला. पुनः सर्वजण, अंबेचा दुःखपरिहार कसा करावा, याबद्दल चर्चा करूं लागले. कांहीं वेळानें खुद्द परशुरामच तेथें आले. ‘ हकीकत घडली ती अशी आहे, यांत खरा किंवा जास्त दोष कोणाचा याचा परशुरामानींच विचार करून त्याचें शासन करावें ’ असें अंबेचें म्हणणें पडलें. भीष्म किंवा शाल्व यांपैकीं कोणासही आपण आज्ञा केली असतां ते

अंबेचा स्वीकार करतील, असा परशुरामांसही भरंवसा वाटत होता. शाल्वराजानें त्याग केला तरी अंबेचें त्याजवरील प्रेम कायम असल्यामुळें, त्यागाबद्दलचा दोष शाल्वापेक्षां भीष्माकडेच विशेष आहे; तेव्हां त्यासच रणांत लोळवून सूड उगविला पाहिजे, असा अंबेनें आग्रह धरला. ' विप्राज्ञेवांचून खालीं ठेवलेलें शस्त्र पुनः हातीं घ्यावयाचें नाहीं, अशी आपली प्रतिज्ञा आहे; भीष्मांचा अपमान करणें येवढेंच म्हणणें असेल तर आपण भीष्मांस अंबेच्या सातदां पायां पडावयास लावूं ' वगैरे परशुराम म्हणूं लागले. भीष्मांचा वध झाल्यावांचून आपलें समाधान होणार नाहीं, असें अंबेनें पुनः निग्रहानें सांगितलें. ' कोणींही ब्रह्मद्वेष्टा निघाल्यास मी त्याचा वध करीन; शरणागताचा परित्याग करणार नाहीं, व सर्व क्षत्रियांस जिंकणार; कोणी निघेल तर त्याचा वध करीन ' अशा तीन प्रतिज्ञा परशुरामांनीं केल्या होत्या. ' त्यांप्रमाणें भीष्मांशीं युद्ध करून त्याची खोड मोडणें जरूर आहे. कदाचित् शस्त्र हातीं घेण्याचें कारण न पडतांच आपला इष्ट हेतु साध्य होईल; ' असें अकृतव्रणानें त्यांस सांगितलें. अखेर भीष्मांकडे जाऊन अंबेचा स्वीकार करण्याविषयीं त्यास सामोपचारानें सांगून पहावें; व तो न ऐकेल तर त्याचा वध करावा, असें ठरलें; व त्याप्रमाणें परशुराम तेथील ऋषींसह कुरुक्षेत्रीं सरस्वतीतीरीं येऊन तळ देऊन राहिले. ( उद्यो० अ० १७५–१७८ ).

तिसरे दिवशीं परशुरामानीं भीष्मांस निरोप पाठविला कीं, ' मी येथें आलों आहें. तरी माझी भेट घेऊन माझी इच्छा पूर्ण करावी. ' त्याप्रमाणें भीष्मानीं त्यांजकडे येऊन त्यांची सत्कारपूर्वक

भेट घेतली. हा सत्कारविधि व कुशल प्रश्न झाल्यावर उभयतांचा पुढीलप्रमाणें संवाद झाला:—

**परशुराम:**—भीष्मा, तुला स्वतःला विवाह कर्तव्य नसतांही सर्व राजांस जिंकून व अंबेचा हात धरून तिला तूं जबरदस्तीनें रथांत घालून हरण करून आणलीस आणि पुनः सोडून दिलीस, हें काय? तुझा हेतु यांत चांगला असला तरी तुझा करस्पर्श झाल्यामुळें शाल्वानेंही तिचा त्याग केला आहे; दुसरा कोणता राजाही तिचा स्वीकार करणार नाहीं. आतां तिनें काय करावें बरें? याकरतां तूं हिचा स्वीकार करून हिचें दुःख नाहींसें कर.

**भीष्म:**—हे ब्रह्मन्! हिचा मला तर स्वीकार करतां येतच नाहीं; पण तिचा आतां विचित्रवीर्याशींही विवाह करण्यास मीं तयार नाहीं. हिनें आपण होऊनच 'मी शाल्वाची आहें' असें मला सांगितलें; व मीं तिला त्याजकडे जाण्याची अनुज्ञा दिली. यांत मजकडे काय दोष? शिवाय मी खरा क्षत्रिय असल्यामुळें

**न भयान्नाप्यनुक्रोशान्नार्थलोभान्न काम्यया ।**
**क्षात्रं धर्ममहं जह्यामिति मे व्रतमाहितम् ॥**

**भयानें, दयेनें, द्रव्यलोभानें किंवा कामवासनेनें प्रेरित होऊन मी कदापि क्षात्रधर्म सोडणार नाहीं.**

**परशुराम:**—भीष्मा! तूं जर माझी आज्ञा मोडून माझा अपमान करशील तर मी तुझा तुझ्या अनुयायांसह रणांत वध करीन, हें तू पक्कें लक्षांत ठेव.

**भीष्म:**—आपण मजशीं युद्ध करण्याचें मनांत आणतां तें कां? आपण श्रेष्ठ मी लहान, आपण माझे गुरु व मी आपला शिष्य; चतुर्विध धनुर्वेद आपणच मला शिकविला. असें असतां आपण

युद्धाची भाषा बोलतां हें काय? आपण मजवर असला प्रसंग आणूं नये, हें बरें.

**परशुरामः**—भीष्मा! तूं मला तोंडानें गुरु म्हणतोस, पण हिचा स्वीकार कर म्हणून मी तुला आज्ञा करतों, ती मात्र मानीत नाहींस! आपल्या गुरूचा तूं हा चांगलाच बोज ठेवलास! भीष्मा, माझे आज्ञेस्तव नसेल तर निदान माझें प्रिय करण्याकरितां तरी तूं हिचा स्वीकार कर. तूं हिचा हात धरलास म्हणून इतर कोणताही राजा हिला वरीत नाहीं. आपल्या ह्या अपराधाचें या अबलेला प्रायश्चित्त कां म्हणून देतोस? माझें ऐक, हिचा स्वीकार कर; तसें न करशील तर मात्र मी तुला स्वस्थ राहूं देणार नाहीं.

**भीष्मः**—ब्रह्मन्! आपण विनाकारण हट्ट धरून स्वतःस व्यर्थ शीण करून कां घेतां? हिचा स्वीकार मी कालत्रयींही करणार नाहीं, हें आपणास स्पष्ट सांगून ठेवतों. हिचा एकवार त्याग केल्यावर हिला पुनः घरांत कशी घ्यावी? **अन्य पुरुषावर मन बसलेल्या स्त्रीस घरांत ठेवणें म्हणजे सर्पीण बाळगण्यासारखें आहे. प्रत्यक्ष इंद्राचे भयानेंही मी स्वधर्म-त्याग करणार नाहीं;** आपण रुष्ट व्हा किंवा प्रसन्न व्हा अगर माझें बरें वाईट काय करणें असेल तें खुशाल करून घ्या. आपण माझे गुरु म्हणून मीं आपणास विनयपूर्वक व नम्रपणानें विनविलें; आपल्या पायांही पडलों; तरी आपण आपला हट्ट सोडीत नाहीं. यावरून शिष्याशीं कसें वागावें हें आपणांस कळत नाहींसें दिसतें. मरुत्ताचें असें म्हणणें आहे कीं,

गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः।
उत्पथप्रतिपन्नस्य परित्यागो विधीयते ॥

**गुरु जर उन्मत्त व कार्याकार्य-विवेकशून्य झाला आणि भलत्या मार्गास जाऊं लागला, तर अशा गुरूचाही शिष्यानें त्याग करावा.** आपल्यासारख्या तपोवृद्ध ब्राह्मण गुरूचा वध करण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून मीं आपलें सर्व बोलणें सोसून घेतलें. आपण माझे गुरु असूनही मजवर हत्यार उपसाल तर मग मीं त्याचा प्रतिकार केला तरी मजकडे दोष नाहीं. **एकादा ब्राह्मण क्षत्रियाप्रमाणें खवळून युद्धास तयार झाला व तो जर मागें पाऊल घेईना, तर अशाचा वध केल्यास ब्रह्महत्येचा दोष लागत नाहीं,** असें शास्त्र आहे. आपण ब्राह्मण असूनही उघड क्षात्रवृत्ति स्वीकारली आहे, व मीही जातीनें क्षत्रियच आहें.

**यो यथा वर्तते यस्मिंस्तस्मिन्नेवं प्रवर्तयन्।**
**नाधर्मं समवाप्नोति न चाश्रेयश्च विंदति ॥**

**आपल्याशीं जो जसा वागेल त्याशीं उलट आपण तसेंच वागलों तर त्यांत अधर्मही नाहीं व अकल्याणही नाहीं.** एकाच काळीं **परस्पर विरोधी दोन गोष्टी पुढें** आल्या, तर **त्यांपैकीं केवळ व्यावहारिक हिताची जी बाजू असेल ती सोडून धार्मिक कर्तव्याचीच बाजू घ्यावी, हें श्रेयस्कर आहे.** याच न्यायानें आपले आज्ञेप्रमाणें कन्या-स्वीकार न करतां ब्रह्मचर्यपालनच मी करणार. मग याकरतां तुमचें आमचें युद्ध जुंपलें तरी बेहत्तर. एकपक्षीं हेंही बरेंच आहे. कुरुक्षेत्रासारख्या पवित्र भूमीवर आपल्यासारख्या गुरूस माझें बाहुबल व पराक्रम हीं दाखविण्याची ही मला आलेली संधी म्हणजे एक अपूर्व पर्वणीच होय, असें मी समजतों. आपण कृपा करून आपल्या शिष्याच्या पराक्रमाचें प्रेमानें कौतुक मात्र करावें. माझे हातून रणांगणीं आपण

पडाल, तेव्हां आपणास सद्गति प्राप्त होईल. क्षत्रियांना मारून त्यांच्या रक्तानें आपण ज्या कुरुक्षेत्रीं पितृतर्पण केलें, तेथेंच मी या क्षत्रिय-हंत्याचा वध व पूर्व-क्षत्रियांचें तर्पण करून त्यांचे ऋणांतून मुक्त होतों. खरें पाहिलें तर आपण नांवाचेच ब्राह्मण आहां; कारण आपणास क्षत्रियाहूनही जास्त युद्धाची खुमखुम व बाहुबलाचा गर्व आहे. पूर्वी अनेकदां क्षत्रिय मारल्याची बढाई आपण वारंवार सांगतां; पण—

**न तदा जातवान् भीष्मः क्षत्रियो वापि मद्विधः ।**
**पश्चाज्जातानि तेजांसि तृणेषु ज्वलितं त्वया ॥**

त्या वेळीं मी किंवा माझ्यासारखे क्षत्रिय अस्तित्वांत नव्हते, म्हणून आपणांस हा पराक्रम करतां आला. तो पराक्रम तरी कसला आला आहे? आपण त्या वेळचे तृणतुल्य निर्जीव क्षत्रिय भाजून टाकलेत झालें. पण आतां मात्र आपली युद्धाची खुमखुम लवकरच जिरणार व आपला बाहुबलाचा गर्व उतरणार, हें ध्यानांत ठेवा.'

**परशुरामः**—ठीक आहे; तूं कुरुक्षेत्रावर पुढें चल. मीही तुझे मागोमाग येऊन तुझी मनीषा पूर्ण करतों. लवकरच माझ्या बाणांनीं जर्जर होऊन तूं समरांगणीं पडलास, आणि कावळे व गिधाडें तुझ्या शरीराचे लचके तोडूं लागलीं, म्हणजे तुझी भाग्यशाली व निष्पाप माता भागीरथी रडावयास लागेल. तुजसारख्या मंदमति व उतावीळ पुत्रास तिनें जन्म दिला याचें फळ भोगणें तिला प्राप्तच आहे.

याप्रमाणें भाषणें झाल्यावर भीष्म हस्तिनापुरांत परत आले; आणि सत्यवती मातेचे व तपस्वी ब्राह्मणांचे आशीर्वाद घेऊन रुप्याच्या पांढऱ्या शुभ्र रथांत बसले. त्यांच्या रथाचे घोडे, छत्र,

चवऱ्या हीं सर्व शुभ्र असून त्यांचें धनुष्य, फेटा, चिलखत हींहीं पांढरींच होतीं. भीष्मांचा रथ कुरुक्षेत्रांत येऊन परशुरामासमोर उभा राहतांच ते परशुरामास म्हणाले:—' आपण पायीं व मी रथांत बसून युद्ध करणें अयोग्य आहे. तर आपणही रथावर आरूढ होऊन मग युद्ध करावें.' यावर परशुरामानीं उत्तर दिलें कीं, ' अरे ! पृथ्वी हाच माझा रथ, वेद हेच माझे घोडे, वायु हाच माझा सारथि, आणि गायत्री-सावित्री ह्या वेदमातृका हींच माझीं चिलखतें होत. मला निराळा रथ कशास पाहिजे ?' असें बोलून लागलीच भीष्मांवर बाणांचा वर्षाव करून परशुरामानीं युद्धास प्रारंभ केला. इतक्यांत परशुरामानीं आपल्या तपःप्रभावानें एकदम एक प्रचंड व दिव्य रथ निर्माण केला ! त्याचें सारथ्य अकृतव्रणास सांगून परशुराम स्वतः त्या रथांत बसून भीष्मांवर चालून आले. हा रथ भीष्मांपासून बाणाच्या तीन टप्प्यांवर येतांच भीष्मानीं आपला रथ थांबविला. आणि धनुष्यबाण रथांतच ठेवून, अनवाणी परशुरामांकडे जाऊन व त्यांस नमस्कार करून भीष्म म्हणाले:—' आपण मजहून श्रेष्ठ योद्धे आहांत; अशांशीं मी युद्ध मांडलें हें एक साहसच आहे. पण यांत माझा विजय होईल असा गुरु या नात्यानें आपण आपल्या या शिष्यास आशीर्वाद द्यावा.' यावर परशुरामानीं उत्तर केलें:—' तुझें हें वर्तन शिष्य-धर्मास अनुसरूनच आहे, व त्यामुळें मी संतुष्ट झालों आहें. आपणाहून वरचढ अशा वीराशीं युद्ध करण्यांत साहस नाहीं; उलट अशानें शौर्य व पराक्रम वाढत असतात. आतां तुला पराभूत करण्यासाठींच जर मीं हें युद्ध मांडलें आहे, तर ' तुझा विजय होवो ' असा आशीर्वाद मला कसा देतां येईल ?' परशुरामांचें हें भाषण ऐकून

भीष्म परत येऊन आपल्या रथांत बसले. ( उद्यो० अ० १७८–१७९ ) या वेळींही परशुरामानींच भीष्मांवर प्रथमतः बाण टाकले. तेव्हां भीष्म म्हणाले:— " आपण माझे गुरु म्हणून मीं आपणावर प्रथमतः प्रहार केला नाहीं; आपण मात्र शिष्यावर शस्त्र उपसून आपलें गुरूचें नातें सोडलेंत. आतां क्षात्रधर्माप्रमाणें मला आपणाशीं लढलेंच पाहिजे. मात्र मी आपले अंगचें तप, ब्राह्मण्य किंवा वेदज्ञान यांजवर प्रहार करणार नसून आपल्या क्षात्रधर्मावरच मी शरसंधान करणार आहें. " याप्रमाणें बोलणें होतांच उभय वीरांमध्यें अपूर्व द्वंद्वयुद्ध सुरू झालें.

शौर्य, धैर्य, धनुर्विद्या व अस्त्रविद्या यांत दोघेही योद्धे सारख्याच योग्यतेचे असल्यामुळें कोणी कोणास हार गेला नाहीं. धनुष्यें, शक्ति वगैरे आयुधांनीं व ब्रह्मास्त्रादि अस्त्रांनीं उभयतांचीं अनेक भयंकर युद्धें झालीं. त्यांत एकमेकांच्या प्रहारांनीं एकमेक कांहीं वेळ जखमी व बेशुद्ध होऊन पडत; पण पुनः सावध होऊन अधिक निकरानें लढत. तथापि कोणाचीच सरशी किंवा कोणाचाच पराभव झाला नाहीं ! याप्रमाणें या दोघां योद्ध्यांचें कुरुक्षेत्रीं तेवीस दिवस सारखें युद्ध चालू होतें ? शत्रु घायाळ व जर्जर झाला असतां अस्त्र सोडलें म्हणजे त्यास कायमची गाढनिद्रा लागावयाची, अशा प्रभावाचें ' प्रस्वापास्त्र ' भीष्मांस पूर्वजन्मीं प्राप्त झालेलें होतें; त्याचें स्मरण अष्टवसूंच्या कृपेनें भीष्मांस या प्रसंगीं होऊन ते त्याचा अखेर उपयोग करणार होते ! पण हे गुरुशिष्य वीर सारख्याच योग्यतेचे व पराक्रमशाली असल्याकारणानें एकाकडून दुसऱ्याचा वध तर काय पण पराजय होणेंही अशक्य होतें. अशा स्थितींत उगीच युद्ध पुढें चालविण्यांत हंशील काय ? असें वाटून

परशुरामाचे पितर व भीष्मांचे पूर्व जन्मींचे बंधु अष्टवसु यांनीं त्यांस प्रत्यक्ष दर्शन दिलें, व त्यांस युद्ध बंद करण्याची आज्ञा केली. पण युद्धांतून आपण होऊन पराङ्मुख होऊन माघार घेण्यास कोणीही कबूल होईना. पण अखेर 'आपण ब्राह्मण असूनही क्षात्रधर्म स्वीकारला, व त्यांतूनही भीष्मांचा पराजय करून अंबेचें दुःख नष्ट करणें हा आपला हेतुही सफळ होणें अशक्य आहे; आतां हें युद्ध पुरे झालें व क्षात्रधर्मही बस्स झाला ' असा विचार करून परशुरामानींच आरंभीं धनुष्य खालीं ठेवलें; व मग भीष्मानींही त्यांचेंच अनुकरण करून आपल्या गुरूकडे जाऊन त्यांस नमस्कार केला. तेव्हां परशुराम आनंदानें शिष्यास म्हणाले:- ' भीष्मा, शाबास ! पृथ्वीवरील सर्व वीरांत तुझी बरोबरी करणारा कोणीही नाहीं. आजचा तुझा पराक्रम पाहून मला संतोष झाला. देव तुझें कल्याण करोत. आतां युद्ध पुरे कर. ' ( उद्योगपर्व अध्याय १८०-१८५ )

यानंतर परशुरामानीं अंबेस जवळ बोलावून आणून म्हटलें:— ' अंबे, तुला वचन दिल्याप्रमाणें मीं भीष्मवधार्थ माझ्या शक्तीची, पराक्रमाची व शस्त्रास्त्रविद्येची तुझ्या देखत शिकस्त केली; तरी मला त्यास पराभूतही करतां आलें नाहीं, हें तूं पाहिलेंसच. इतउत्तर मीं तुजसाठीं काय करावें ? माझें तर सांगणें असें आहे कीं, आतां तूं भीष्मालाच शरण जावें हें बरें. ' यावर मानी अंबेनें उत्तर केलें:—' आपण म्हणतां तें खरें आहे. आपण मजसाठीं लढण्यांत मुळींच कसूर केली नाहीं. पण आपणांस भीष्मांवर कडी करतां आली नाहीं. तथापि याचा दोष मी आपणांस मुळींच लावीत नाहीं. आतां भीष्मांस शरण जाण्यास आपण मला सांगतां

तें मात्र मला पसंत नाहीं. मी **अबला असूनही इतकी करारी आहें कीं, मी त्यांस शरण जाणार नाहीं, येवढेंच नव्हे तर भीष्मवध करण्याचें सामर्थ्य मला स्वतःलाच येईल, असा उपाय मी आतां योजणार आहें.**' याप्रमाणें बोलून अंबा तप करण्यासाठीं तपोवनांत निघून गेली. तिनें यमुनातीरीं व वत्सभूमींत बारा वर्षे मोठ्या निर्धारानें उग्र तप केलें. मध्यंतरीं तपोवनांतील तपस्व्यांनीं व तिचे आप्तांनींही तिला तपापासून पराङ्मुख करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण **एकदां मनानें केलेला दृढ संकल्प तिनें सोडला नाहीं.** 'मी स्त्री—राजकन्या—असून मला पतिसुख किंवा पतिलोक मिळण्याचा, केवळ **भीष्मां**मुळें, मार्ग उरला नाहीं. याकरतां **भीष्मां**चा वध करण्यासाठींच—उत्तम लोक प्राप्तीसाठीं नव्हे-मी हें तप करीत आहें. मला माझ्या या स्त्रीपणाचाही आतां वीट आला आहे. करतां पुरुषजन्म प्राप्त करून घेऊन **भीष्म**वध करतां येईल, असें सामर्थ्य संपादण्याकरतांच मी हें घोर तप करीत आहें. आपण माझें मन वळविण्याच्या भरीस पडूं नये. यांत आपणांस मुळींच यश येणार नाहीं.' याप्रमाणें ती सर्वांस निक्षून सांगत असे. **भीष्म**वधार्थ अंबा तप करीत आहे, असें कळतांच **गंगे**नें आपल्या मुलाचा कैवार घेऊन तिला शाप दिला कीं, 'ही तपश्चर्या करण्यांत ज्याअर्थी तुझे मनांत कुटिल भाव व वांकडेपणा आहे, त्या अर्थी फक्त पावसाळ्यांतच चार महिने तुडुंब फुगून वाहणारी, सुसरींनीं भरलेली, पण बाकीचे आठ महिने पाण्याचा मागमूसही नसलेली अशी कुटिल—वांकड्या—ओघाची नदी तूं होशील' **गंगे**च्या या शापाप्रमाणें, **अंबे**च्या तपःसामर्थ्यामुळें, अक्षरशः घडून न येतां ती अर्धदेहानें नदी झाली, व

अर्धदेहानें पुनः तप करूं लागली ! अखेर महादेवांनीं संतुष्ट व प्रसन्न होऊन अंबेस वर दिला कीं, ' तूं पुढील जन्मीं आरंभीं कन्या होशील; व मग तुला पुरुषत्वप्राप्ति होऊन तूं भीष्मांचा वध करशील. त्या जन्मीं तुला या जन्माची स्मृतिही राहील. ' महादेवांचा हा वर ऐकून अंबेस आनंद झाला; व तिनें लागलीच तपोवनांतील लांकडें गोळा करून त्यांची एक चिता रचली; आणि ती आपल्या हातानें पेटवून **इष्टकार्य-सिद्ध्यर्थ प्राणांचीही परवा न करतां ' भीष्मवधार्थ ' असें मोठ्यानें ओरडून व चितेंत उडी टाकून** अंबेनें देहत्याग केला ! ( उद्योगपर्व, अध्याय १८६-१८७ )

इकडे द्रुपदराजानें संतानप्राप्त्यर्थ उग्र तप करून महादेवास प्रसन्न करून घेतलें; आणि आपणास एक कन्या व भीष्मवध करणारा एक पुत्र व्हावा, असा वर मागितला. पण कन्या व पुत्र वेगवेगळीं न होतां आरंभीं कन्या होऊन तीच पुढें पुरुषत्व संपादून पुत्र होईल, असा महादेवानीं त्यास वर दिला. तपश्चर्या संपवून राजधानीस परत आल्यानंतर द्रुपदाचे राणीचे पोटीं गर्भ राहून ती योग्य काळीं प्रसूत झाली. महादेवाचे वराप्रमाणें तिला एक सुंदर कन्या झाली. पण राजास पुत्राची विशेष उत्कंठा आहे असें जाणून व विशेषतः शिवाचा वर लक्षांत आणून आपणास झालेलें मूल पुत्रच आहे, असें राणीनें सर्वांस सांगितलें. द्रुपदाला खरा प्रकार माहीत असतांही त्यानें तिचे मुलाप्रमाणेंच सर्व संस्कार करविले; व तिचें नांवही ' शिखंडी ' असें ठेविलें. पुढेंही तिला राजपुत्रास योग्य असाच वेश देऊन शिक्षण वगैरेही तशाच प्रकारचें दिलें. पण मुलीला जसजसें तारुण्य येऊं लागलें तसतशी द्रुपदास व

त्याचे राणीस मोठी चिंता पडली. ‘ आजपर्यंत जरी हिला पुत्र म्हणून वागविलें, तरी विवाहाचे वेळीं सर्व गुप्त प्रकार बाहेर पडणार. हिला आतां कन्या म्हणून प्रगट करून एकाद्या राजपुत्राशीं हिचा विवाह करावा तरी कठीण; पुत्र म्हणून एकाद्या राजकन्येशीं हिचें लग्न करावें तरीही कठीण. ’ अशा प्रकारें काळजी करीत असतां राजाराणींनीं अखेर असें ठरविलें कीं, ‘ ही जरी आतां कन्या आहे. तरी महादेवाचे वराप्रमाणें ती पुढें खास पुरुषच होणार आहे; तर त्याचे वचनावर विश्वास ठेवून हिचें आपण एकाद्या राजकन्येशींच लग्न करून द्यावें, हेंच श्रेयस्कर होय. ’ या निश्चयाप्रमाणें दशार्ण देशाधिपति हिरण्यवर्मा याच्या कन्येबरोबर शिखंडीचा विवाह झाला. कांहीं काळानें उभयतांही कन्या भर तारुण्यांत येऊन त्यांची एकांतांत गांठ पडली. त्या वेळीं शिखंडी हा पुरुष नसून आपल्यासारखीच स्त्री आहे, हें राजकन्येस कळून आलें. तेव्हां अर्थात् मरणप्राय दुःख होऊन ती शोक करूं लागली. ही गुप्त गोष्ट बाहेर फोडण्याचेंही लज्जेमुळें तिचे मनांत येईना. तरी तिनें हा प्रकार, माहेरच्या ज्या दासी व दाया तिच्याबरोबर सासरीं आल्या होत्या त्यांस सांगितला. त्यांनींही हें वर्तमान एक दूती पाठवून हिरण्यवर्म्यास कळविलें. शिखंडी हा द्रुपदाचा राजपुत्र नसून राजकन्याच आहे, आणि त्यानें आपणास खोटेंच सांगून पुरतें फसविलें व आपल्या मुलीच्या जन्माचा सत्यनाश केला, हें पाहून हिरण्यवर्म्यास अत्यंत क्रोध आला. शिखंडीचें खरें स्वरूप त्याच्या पत्नीपाशीं उघडकीस आलें; तरीही त्यास लहानपणापासूनच स्त्रीपणाचा तिटकारा असल्यामुळें चारचौघांत पुरुषाप्रमाणें वागण्याचा पूर्वक्रम त्यानें कायमच ठेवल

होता. या गोष्टीचीही त्याचे पत्नीस फार चीड येऊन तिनें स्वतःच पुनः खरा प्रकार हिरण्यवर्म्यास कळविला. तेव्हांपासून तर त्याचा संताप अनिवार होऊन त्यास चैन पडेनासें झालें व त्यास एक प्रकारचा हृद्रोगच जडला. त्यानें आपल्या स्नेही राजांस हें वर्तमान कळवून त्यांस आपल्या राजधानीस बोलावून आणलें. त्यांनीं आपसांत विचार करून अखेर असें ठरविलें कीं, ‘ द्रुपदाचे कांपिल्य राजधानीवर सर्वांनीं चाल करून जावें. शिखंडी कन्या आहे असें ठरलें तर द्रुपदास व शिखंडीस पकडून आणून त्यांचा वध करावा, व द्रुपदाचे गादीवर दुसरा राजा बसवावा ! ’ या बेताप्रमाणें हिरण्यवर्मा व त्याचे स्नेही राजे स्वारीची तयारी करूं लागले. ही बातमी कळतांच द्रुपदानें दूत पाठविले; व ‘ शिखंडी हा खरोखरच पुरुष आहे, तुम्हांस कोणींतरी खोटी बातमी सांगितली आहे; आपण तिजवर विश्वास ठेवूं नये ’ असें कळवून त्याची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण तिकडे मुळींच लक्ष न देतां हिरण्यवर्मा व इतर राजे सैन्यासह कांपिल्य नगरावर चाल करून आले. द्रुपद राजा कांहींसा भित्रा होता शिवाय आपण अपराधी आहों हीही जाणीव त्याचे ठिकाणीं होती. यामुळें हिरण्यवर्म्याचे स्वारीचा वृत्तांत ऐकून द्रुपदराजा फार घाबरला. त्यानें नगर--रक्षणाची थोडीबहुत कशीबशी तयारी केली. पण त्यानें हें परचक्र निवारण्याचे कामीं विशेषेंकरून देवतार्चन, यज्ञयाग व दानधर्म यांजवरच विशेष भर दिला. ‘ शिखंडी वास्तविक पुरुष नसून कन्या आहे, हें आपणास आतांपर्यंत मुळींच ठाऊक नव्हतें; या बाबतींत राणीनेंच आपणास फसविलें. सवतीचें नाक वर होऊं नये या हेतूनें, कन्या झाली असूनही पुत्र झाल्याचाच तिनें जन्मापासून पुकारा

केला ' असें लोकांत पसरून व राणीचे तोंडूनही मंत्र्यांसमक्ष असें वदवून द्रुपदानें आपणावरचा दोष उडविण्याचाही प्रयत्न चालविला होता !

आपल्या आईबापांवर व प्रजाजनांवर आपणामुळें महत्संकट आल्याचें पाहून शिखंडीनीस फार वाईट वाटलें; व ती आत्महत्या करण्याचे इराद्यानें अरण्यांत निघून गेली. नगरापासून कांहीं अंतरावर एक निबिड अरण्य असून तेथें कुबेराचा अनुचर असलेला स्थूणाकर्ण नांवाचा यक्ष एका चुनेगच्ची व तटबंदी वाड्यांत राहत असे. या वाड्यास मोठमोठे दरवाजे असून भोवतीं वाळ्याचा नेहमीं घमघमाट सुटलेला असे. या यक्षाचे भीतीनें त्या अरण्यांत मनुष्य प्राणी फिरकत नसे. शिखंडिनीनें यक्षाचे या वाड्यांत शिरून तेथें घोर तप आरंभिलें. कांहीं दिवसांनीं यक्षानें प्रसन्न होऊन तीस म्हटलें:—' तुजवर असें कोणतें संकट आलें आहे, तें मला सांग; मी त्याचें तात्काळ व निःसंशय निवारण करीन. ' शिखंडिनीनें सर्व हकीकत त्यास निवेदन केली, व ' माझ्या पित्यावरचें व नगरावरचें हें परचक्र टाळण्यासाठीं तुझें पुरुषपण निदान येवढें संकट टळेपर्यंत तरी मला दे ' अशी विनंति केली. ती मान्य करणें यक्षाचे जिवावर आलें; पण वचनबद्ध झाल्यामुळें त्यानें त्यास आपलें पुरुषपण देऊन त्याचें स्त्रीत्व आपणाकडे घेतलें. पण ' नगरावरचें परचक्र परतून गेल्यावर तूं पुनः परत येऊन आपलें स्त्रीत्व परत घ्यावें व माझें पुरुषत्व मला द्यावें ' असें मात्र त्यानें शिखंडीस बजावलें. यक्षाची ही अट मान्य करून शिखंडीनें आनंदानें राजवाड्यांत येऊन, अरण्यांत घडलेला सर्व वृत्तांत आपल्या पित्यास निवेदन केला. तेव्हां त्यास विशेष जोर येऊन त्यानें हिरण्य-

वर्म्यास दणकून निरोप पाठविला कीं, ‘ आपणास कळलेली बातमी निवळ खोटी आहे; तीवर आपण बिलकूल विश्वास ठेवूं नये. फार कशाला ? शिखंडी हा पुरुष आहे कीं नाहीं, याची आपण आतां प्रत्यक्षच परीक्षा करावी !’ हा निरोप ऐकून हिरण्यवर्म्यास पुनः विचार पडला. पण अखेर त्यानें शिखंडीची पुरुषत्व-परीक्षा करण्यासाठीं त्याजकडे कांहीं सुंदर व तरुण वेश्या पाठविल्या. त्यांनीं परत येऊन हिरण्यवर्म्याची शिखंडीच्या पुरुषपणासंबंधानें खात्री केली. याप्रमाणें सर्व शंकांचें निरसन झाल्यावर उभयतां व्याह्यांच्या भेटी झाल्या. हिरण्यवर्म्यानें द्रुपदाचा कांहीं दिवस पाहुणचार घेऊन त्याचा व जांवयाचा अनेक देणग्या देऊन गौरव केला; आणि आपल्या कन्येनें रचलेल्या कुभांडाबद्दल व नवऱ्यावर घेतलेल्या खोट्या आळाबद्दल तिची कानउघाडणी करून हिरण्य-वर्मा दशार्ण देशास परत गेला.

इकडे यक्षापासून पुरुषत्व प्राप्त करून घेऊन शिखंडी कांपिल्य नगरास आल्यानंतर थोड्याच दिवसांनीं यक्षराज कुबेर विमानांत बसून त्या अरण्यांत आला. पण नेहमींप्रमाणें स्थूणाकर्ण आपलें स्वागत करावयास न येतां वाड्यांत लपून बसलेला पाहून कुबेरास फार राग आला. कुबेराचे आज्ञेवरून इतर यक्षांनीं स्त्रीरूपी स्थूणा-कर्णास त्याचे पुढें आणून उभें केलें. सर्व प्रकार त्याचे तोंडून कळल्यानंतर कुबेर त्यास शाप देत म्हणालाः—‘ ज्या अर्थी तूं सबंध यक्षजातीस काळिमा व लाज आणण्यासारखें कृत्य करून स्त्रीत्व व पुरुषत्व यांची अदलाबदल केलीस, त्या अर्थी तूं कायम-चाच स्त्री व शिखंडीही कायमचाच पुरुष होऊन राहील. ’ स्थूणाकर्णाचे वतीनें इतर यक्षांनीं बरीच रदबदली केल्यावरून

कुबेरानें त्याजवर दया केली; आणि ‘ शिखंडी जिवंत असेपर्यंतच तुजकडे स्त्रीत्व राहील; तो मेल्यावर तुझें पुरुषत्व तुला परत मिळेल. ’ असा कुबेरानें त्यास उःशाप दिला. कांहीं दिवसांनीं, वचन दिल्याप्रमाणें शिखंडी अरण्यांत आला; व स्थूणाकर्णास ‘ आपलें पुरुषत्व परत घेऊन स्त्रीत्व परत दे ’ असें म्हणूं लागला. शिखंडीचा हा सरलपणा पाहून यक्षासही फार समाधान वाटलें. कुबेरानें आपणास दिलेल्या शापाची व उःशापाचीही हकीकत त्यानें त्यास सांगितली. ती ऐकून शिखंडी अत्यानंद होऊन नगरास परत आला. ‘ महादेवाची वाणी खरी झाली; आपणास झालेली कन्या पुढें पुरुष झाली, आतां हा पुढें भीष्माचा खास वध करणार ’ असें वाटून द्रुपदास व त्याचे राणीसही फार आनंद झाला. शिखंडीसही पूर्वजन्माचें स्मरण असलेमुळें समाधान वाटलें. ( उद्यो० अ० १८८–१९२ )



## षोडश राजकीय कथा.



शैब्यपुत्र सृंजयनामक राजाचे पर्वत व नारद हे दोघे ऋषि-बंधु परम मित्र होते. एके प्रसंगीं हे राजाचे भेटीस आले असतां त्यानें अति आनंदानें त्यांचें स्वागत केलें. या तिघां मित्रांचीं एकमेकांत बोलणीं चाललीं असतां संजयाच्या उपवर राजकन्येनें हंसत हंसत तेथें येऊन राजास नमस्कार केला, व ती बापाचे बाजूस मर्यादेनें उभी राहिली. राजानेंही प्रेमानें तिला आशीर्वाद देऊन तिचें कौतुक केलें. राजकन्येचें तारुण्य व लावण्य पाहून पर्वतास मोह उत्पन्न झाला. ‘ ही कन्या प्रत्यक्ष सूर्याची प्रभा, कीं अग्नीची ज्वाळा, कीं

चंद्राची कांति आहे ? का ही मूर्तिमंत श्री अगर सिध्दि आहे ? राजा ही तुझी कोण ?' याप्रमाणें उघड स्तुति करून राजास पर्वत प्रश्न विचारूं लागला. तेव्हां ही आपली मुलगी असून आपला आशीर्वाद घेण्यासाठीं येथें आली आहे, असें राजानें पर्वतास उत्तर दिलें. तों लागलींच नारदानीं राजाजवळ त्या कन्येबद्दल प्रत्यक्ष मागणी घालून '.ही कन्या मला भार्या करून दे, 'म्हणजे तुझें कल्याण होईल' असेंही त्यास म्हटलें; व सृंजयानेंही लागलीच 'ठीक आहे' म्हणून त्यास मान्यता दर्शविली ! आपण जिला पूर्वीं मनानें वरलें तिलाच आपल्या धाकट्या भावानें वाणीनें वरणें व राजानेंही तिचें वाग्दान करणें, ह्या गोष्टीचा पर्वतास फार राग आला. आणि अशा रीतीनें आपला अपमान करणाऱ्या नारदास, स्वेच्छेनें स्वर्गांत संचार करण्याची जी तुला शक्ति आहे ती नष्ट होईल, असा त्यानें शाप दिला. पण यावर नारद म्हणाले:—

" कन्या मनानें वरणें, वाणीनें वरणें, ती देण्याचें दात्यानें ठरविणें, किंवा वधूवरांचें परस्पर भाषण होऊन विवाह ठरणें, हे कन्यापरिग्रहाचे चार लौकिक प्रकार आहेत. शिवाय उदकपूर्वक दान व पाणिग्रहण-मंत्र हे दोन वैदिक प्रकार होत. परंतु हे सहा प्रकारचे विधि झाले तरी कन्या-परिग्रह पुरा होत नाहीं. **लग्न कायम होण्यास व वधूला भार्यात्व येण्यास सप्तपदी हा संस्कार पूर्ण व्हावा लागतो.** अशा स्थितींत तुमचा या कन्येवर कांहीं एक हक्क स्थापित झालेला नसतांही तुम्हीं मला विनाकारण शाप दिला. तर मीही तुम्हांस शाप देतों कीं, तुम्हांसही मजवांचून स्वर्गीं जातां येणार नाहीं." याप्रमाणें एकमेकांच्या शापांमुळें गति कुंठित झालेले नारद व पर्वत सृंजयराजाजवळच राहिले.

राजानें त्यांची शुध्द भावानें व तत्परतेनें बरेच दिवस सेवा केली; त्यांनींही प्रसन्न होऊन त्यास वर देऊं केला. तेव्हां सृंजय म्हणालाः- " मला सद्गुणी, यशस्वी, कीर्तिमान्, तेजस्वी व पराक्रमी असा पुत्र व्हावा; व त्याचें विष्ठामूत्रच काय, पण शरीरांतून बाहेर येणारे घाम वगैरे पदार्थही सुवर्णाचेच असावे ! " राजाच्या विनंती-प्रमाणें त्यास पुत्र झाला; त्याच्या ह्या अलौकिक गुणामुळें त्याचें ' सुवर्णष्ठीवी ' असें नांव ठेवण्यांत आलें. या वरप्रदानामुळें ' सुवर्णष्ठीवी ' पासून इतकें सोनें निर्माण झालें कीं, राजानें आपले राजवाडे, किल्ले, आसनें, शय्या, गाड्या फार काय सर्व भांडींही सोन्याचींच बनवून टाकलीं ! सृंजयराजाच्या राजपुत्राचा हा अपूर्व गुण चोरांच्या कांनीं गेल्यावर त्यांचे तोंडास पाणी सुटलें. त्यांनीं आपला मोठा जमाव करून राजवाड्यांत प्रवेश केला; व राजपुत्रास जबरदस्तीनें उचलून नेऊन ते अरण्यांत चालते झाले! सृंजयराजाची सोन्याचीही जिवंत खाण याप्रमाणें चोरांचे हातीं लागली खरी. पण या खाणींतून सोनें बाहेर कसें काढावयाचें याचें त्यांस **ज्ञान नसल्यामुळें ही सुवर्णाची खाण त्यांच्या उपयोगी पडली नाहीं.** राजपुत्राचे पोटांत सुवर्ण सांठविलें असेल, असें वाटून त्यांनीं त्याचा प्राण घेतला व त्याचें पोट फाडूनही पाहिलें ! परंतु तेथें सोनें मुळींच न सांपडल्यामुळें संतापून त्यांनीं आपसांतच मोठी मारामारी केली; व तींत ते सर्व मरण पावून अत्यंत घोर अशा नरकांत पडले !

मोठ्या नवस सायासानें प्राप्त झालेला, सद्गुणी व असल्या अद्भुत प्रकारचा मुलगा अशा रीतीनें मरण पावल्याचें ऐकून सृंजयराजास पराकाष्ठेचें दुःख झालें व तो अतिशय विलाप करूं

लागला. तेव्हां नारदानीं तेथें येऊन स्वर्णष्ठीवीहूनही अभ्दुत गुणांच्या सोळा प्राचीन सुप्रसिद्ध राजांच्या कथा सांगून व मृत्यु ही एक अनिवारणीय गोष्ट आहे, असा बोध करून त्याचें सांत्वन केलें. ह्या सोळा प्रसिद्ध राजांच्या कथांस ' षोडश राजकीय ' असें नांव पडलें आहे. नारद म्हणालेः—" आम्ही ( १ ) आविक्षित मरुत्त राजाचे घरीं राहत असतों. बृहस्पतीचा वडील बंधु संवर्त यानें या मरुत्तासाठीं अपूर्व यज्ञ केला, त्या वेळीं तेथें बृहस्पति व इंद्रादि देव यांनीं स्वतः येऊन हविर्भाग प्रत्यक्ष ग्रहण केला. मरुद्गण त्याचे घरीं वाढप्याचें काम करीत असून विश्वेदेव हे त्याचे सभासद होते. याचे राज्यांत नेहमीं सुवृष्टि होई; व त्याचे प्रजांस व्याधि वगैरेंची कधींच पीडा झाली नाहीं. हा राजा ज्ञानी पण निगर्वी, शूर पण क्षमाशील, श्रीमान् पण दाता, विलासी पण वैराग्यशील असा होता. पण अखेर असल्या पुण्यवान् व श्रद्धावान् राजासही मृत्यूनें सोडलें नाहीं। तेथें तुझ्या मुलाची कथा काय ? ( २ ) सुहोत्र राजाही असाच पराक्रमी, दाता, धर्मनिष्ठ व सद्गुणी होता. तो सन्मान्य ब्राह्मण व पुरोहित यांचे सल्ल्याप्रमाणें लोकहितार्थ राज्यकारभार पाही. म्लेंच्छ देशांखेरीज बाकीची सर्व पृथ्वी त्यानें बाहुबलानें जिंकिली होती. त्याचे राज्यांत कित्येक वर्षेपर्यंत पर्जन्यानें सोन्याचीच वृष्टि केली ! त्यामुळें तेथील सर्व नद्या व त्यांतील सर्व जलचर प्राणीही सुवर्णमय होऊन गेले ! या नद्यांवर जाण्याची कोणासच बंदी नसल्यामुळें त्याच्या प्रजांसही ह्या सोन्याचा उपयोग झाला. सुहोत्रानें ह्या सोन्याचा स्वतःचे उपयोगाकडे व्यय न करतां कुरुजांगल देशांत त्यानें हजारों अश्वमेध व शेंकडों राजसूय यज्ञ करून त्याचा

सत्कार्यी व सत्पात्रीं विनियोग केला. अशा राजासही जर अखेर मृत्यूनें गांठलें, तर तुझ्या पुत्रास मरण आलें यांत नवल काय? ( ३ ) अंग देशच्या **पौरव राजानें** तर हजारों श्यामकर्ण सोडून असंख्य अश्वमेध यज्ञ केले होते. त्या वेळीं नाना देशांतून जमा झालेल्या विद्वान्, वेदवेत्त्या आणि तपोनिष्ठ ब्राह्मणांस दक्षणा म्हणून सुवर्णाप्रमाणें तेजस्वी हत्ती, सोन्याचे रथ, सुंदर कन्या व दासी, सवत्स गाई, उंट, शेळ्या-मेंढ्यांचे कळप, शेतें वगैरे तो देत असे! यज्ञ-समारंभासाठीं आलेल्या ब्राह्मणांची करमणूक करण्याकरतां त्यानें शेंकडों नट, नर्तक, गायक आणि हातावर किंवा डोक्यावर भरलेलीं भांडीं अथवा समया घेऊन नाचणारे अनेक सोंगाडे आणविले होते. अशा या **पौरवराजासही** अखेर मरण यावयाचें तें आलेंच; याकरतां तूं आपल्या पुत्राबद्दल व्यर्थ शोक कां करतोस? ( ४ ) उशीनर-पुत्र **शिबिराजा** हाही अत्यंत पराक्रमी होता. युद्धामध्यें त्याच्या युद्ध-कौशल्यापुढें कोणत्याही राजाचा टिकाव लागला नाहीं; त्याच्या रथाचे घोषानें सर्व पृथ्वी दणाणून टाकली होती; व त्याचें राज्य समुद्रावरही पसरलें होतें. त्याच्या यज्ञास दहा दहा लाख लोक जमत असून यज्ञांतील यज्ञस्तंभ, पात्रें, आसनें, गृहें हीं सर्व सोन्याचीं केलेलीं होतीं. यज्ञ चालू असतां तेथें दह्या-दुधाचे डोह, पेयांच्या नद्या व अन्नाचे पर्वत दिसत! **शिबिराजाच्या** पुण्यकर्मानें संतुष्ट होऊन **शंकरानीं** त्यास वर दिला कीं, ' तूं कितीही दान-धर्म केलास तरी तुझी संपत्ति कमी न होतां ती व तुझी कीर्तीही अक्षय्य राहील. ' अशा प्रकारचा पराक्रमी व धर्मात्मा **शिबिराजाही** अखेर मृत्यु पावला, हें जाणून तूंही पुत्राबद्दल दुःख करूं नको. ( ५ ) सूर्यवंशांतील राजा **राम**-

चंद्रानें केवळ पित्राज्ञा पाळण्याकरतां पत्नीसह चौदा वर्षें वनवास पतकरला; जनस्थानांत १४ हजार राक्षस मारून तापसांचें संरक्षण केलें, व त्यांचे यज्ञयाग निर्विघ्न केले. देव–ब्राह्मणांचा द्वेष्टा, सुरासुरांसही अजिंक्य व अवध्य असलेल्या बलाढ्य रावणाचाही सर्व राक्षसांसह त्यानें संहार केला व प्रजा निर्भय केली. त्यानें अश्वमेधादि अनेक यज्ञ करून प्रजाचें धर्म-नीतीस अनुसरून पालन केलें. त्याचे राज्यांत देव, मनुष्य व ऋषि हे सर्व एकत्र राहूं लागले. त्याच्या पुण्यानें त्याच्या प्रजा सर्वदां निरोगी व आपत्तिरहित झाल्या; त्यांचें आयुष्य १००० वर्षांचें होऊन त्यांस संततीची वाण कधींही पडली नाहीं. रामाचा वर्ण सांवळा, नेत्र आरक्त आणि शरीर तेजस्वी व सुंदर होतें; आणि त्याचें तारुण्य अखेरपर्यंत कायम होतें. पित्याला औरस पुत्रास पाहून जसा आनंद होतो, तसा त्यास पाहून प्रजाजनांस आनंद होत असे. ह्याप्रमाणें ११ हजार वर्षें राज्य करून व पृथ्वीवर आपल्या अंशाचे ८ राजवंश स्थापून रामचंद्र प्रजाजनांसह स्वर्गीं गेले. अशा श्रेष्ठ रामराजासही मृत्यु आला, तर तुझ्या मुलाची कथा काय? (६) भगीरथराजानें भागीरथीच्या उगमापासून मुखापर्यंत दोनही तीरांनीं सारखे सोन्याचे घांट बांधले होते. त्यानें आपल्या हजारों राजकन्या क्षत्रिय राजपुत्रांचा अनादर करून ब्राह्मणांस सालंकृत अर्पण केल्या; व प्रत्येक कन्येबरोबर चार चार घोड्यांचा रथ, शंभर शंभर हत्ती, हजार घोडे, शंभर गाई व शेळ्या-मेंढ्याचे कळप आंदण म्हणून दिले. गंगातीरीं बसून यानें अनेक यज्ञ केले व ब्राह्मणांस विपुल दक्षणा दिल्या. त्या वेळीं ब्राह्मणांची गर्दी इतकी झाली होती कीं, गंगेचा प्रवाह कुंठित होऊन ती

कन्येप्रमाणें भगीरथाचे मांडीवर येऊं लागली. या राजाचें योगबल एवढें होतें कीं, कोणत्याही ब्राह्मणाचे मनांत असलेली कोणतीही दुर्मिळ वस्तू त्यास तो वाटेल त्या स्थळीं देत असे! हा राजा इतका धर्मात्मा व पुण्यशील होता कीं, मरीचिप ऋषि त्याच्या दर्शनानें व उपासनेनें आपणांस धन्य मानीत. अशा भगीरथासही मृत्यूनें अखेर गांठलें तर तुझ्या पुत्राचा पाड काय? (७) दिलीपराजा हा तर मृत्युलोकचा कुबेरच होता. त्याच्या शेंकडों यज्ञांत प्रत्येक वेळीं दहा दहा लाख ब्राह्मण जमत असत. हा राजा वेदार्थ व यज्ञविधि हे उत्तम जाणत होता व याचे पासूनच यज्ञ-विधि विशेष प्रचारांत आले. याच्या यज्ञाचा सभामंडप, हजारों वावांचे यज्ञस्तंभ व त्यांवरील चक्रें हीं सोन्याचीं असून मंडपाबाहेर हजारों हत्ती झुलत असत; मंडपांत सहा सहा हजार अप्सरा सात प्रकारचा नाच करीत, विश्वावसु गंधर्व वीणा वाजवी. याच्या राज्यांतील स्त्रिया उन्मत्तपणांतही पापाचरण करीत नसत. याचा रथ पाण्यावरूनही चालत असे, इतकें याचें अद्भुत सामर्थ्य होतें! अशा दिलीपराजालाही मृत्यु चुकला नाहीं, तर तुझ्या लहान मुलाची कथा काय? (८) युवनाश्वराजा मृगया करीत वनांत हिंडत असतां त्याचे घोडे थकून गेले व त्यासही फार तहान लागली. तेव्हां दूर दिसणाऱ्या धुराच्या अनुरोधानें तो गेला असतां तेथें यज्ञ चाललेला त्याचे नजरेस पडला. त्या यज्ञांतील पृषदाज्यच (दहीं व तूप यांचें मिश्रण) त्यानें तहानेचे भरांत पिऊन टाकलें; त्यामुळें त्याचे उदरांत गर्भ उत्पन्न झाला! अश्विनीकुमारांनीं हा गर्भ पितृ-जठरांतून मोठ्या कौशल्यानें बाहेर काढला! त्या बाल-कास पाहून, हें आतां कोणास पिईल, असें देव विचारूं लागले.

तेव्हां इंद्रानें ' मां धास्यति ' ' मां धाता ' ( मला पिईल ) असें उत्तर दिलें; व लागलीच इंद्राच्या अंगुलींतून दुधाच्या व तुपाच्या धारा निघून बालकाच्या मुखांत पडूं लागल्या ! इंद्राच्या वरील उत्तरावरूनच या बालकाचें नांव ' मांधाता ' असें पडलें. हा मुलगा बारा दिवसांतच बारा वर्षांइतका मोठा दिसूं लागला व त्यानें एका दिवसांतच सर्व पृथ्वी पादाक्रांत केली ! त्यानें अनेक अश्वमेधादि यज्ञ करून लक्षावधि ब्राह्मणांस दक्षिणा व भोजनें दिलीं. पद्मराग व सोनें यांच्या खाणी असलेला आणि इतर प्रदेशांहून उंच व शंभर योजनें लांबीचा मत्स्य देश यानें ब्राह्मणांस अर्पण केला. अशा प्रकारचा महात्मा मांधाताही मृत्युमुखीं पडला, तेथें तुझ्या पुत्राची किंमत ती काय ? * ( ९ ) नहुषपुत्र ययातीनें तर निरनिराळ्या प्रकारचे हजारों यज्ञ केले होते. एकदां आपल्या राज्यांतलें सर्व धन त्यानें ब्राह्मणांस दान केलें. याचे यज्ञाचे वेळीं सरस्वत्यादि नद्या, सप्तसागर व पर्वत त्यास तूप व दूध पुरवीत असत. देवासुरांचे युद्धांत यानें देवांस साहाय्य केलें; व जिंकलेल्या पृथ्वीचे चार भाग करून चौघांस वांटून दिले. देव-

* मांधात्याचें हें चरित्र वनपर्वाच्या १२६ व्या अध्यायांतही थोड्याशा फरकानें आलें आहे. इक्ष्वाकुवंशांतील सुद्युम्नपुत्र युवनाश्वराजा मंत्र्यांवर राज्य कारभार सोंपवून संततिप्राप्त्यर्थ तप करण्यासाठीं वनांत जाऊन राहिला. तेथें असतां एकदां उपवासानें व तहानेनें व्याकुळ होऊन रात्रीं तो भृगुपुत्र भार्गव ऋषि यांच्या आश्रमांत शिरला. तेथें भार्गव ऋषींनीं पुत्रकामेष्टियज्ञांत अभिमंत्रित केलेल्या पाण्याचा कलश ठेवलेला होता; हें पाणी दुसरे दिवशीं राजाचे राणीकडून प्राशन करवावयाचें होतें. पण राजास अति तहान लागली होती, व आश्रमांतील मुनिही सर्व निजले होते; म्हणून युवनाश्वराजानें हें जल पार पिऊन टाकलें. सकाळीं हा सर्व प्रकार भार्गव ऋषींनीं चौकशी केल्यावर त्यांस राजाकडूनच कळला. या जलप्राशनानें राजाचें शरिरांत गर्भ राहिला ! तो १००

यानी व शर्मिष्ठा यांसह त्यानें इंद्राप्रमाणें अनेक वैभवें व सुखें भोगलीं. परंतु अखेर त्यास उपरति झाली. **पृथ्वीवरील सर्व धन, धान्य, पशु व स्त्रिया एका पुरुषास मिळाल्या तरी त्याचें समाधान व्हावयाचें नाहीं.** याकरितां मनुष्यानें **विवेकपूर्वक आत्मसंयमन करण्यासच शिकलें पाहिजे,** अशा आशयांची गाथा त्यानें गाइली. नंतर सर्व विषयोपभोगांचा त्याग करून व पुरूस राज्यावर बसवून ययातीनें वानप्रस्थाश्रम स्वीकारला. अशा पुण्यशील राजासही मृत्यु चुकवितां आला नाहीं, मग तुझ्या पुत्रास तो आला तर नवल काय ? ( १० ) नाभाग **अंबरीष**राजावर हजारों अस्त्रविद्याकुशल उग्र राजे एकदम चाल करून आले होते. पण त्यानें आपलें शरीरबल, अस्त्रबल, हस्तलाघव व युद्ध यांचे योगानें त्या सर्वांस सहज पराभूत केलें. यामुळें निरुपाय होऊन हे सर्व राजे त्यास शरण आले. तेव्हां त्यानें पुष्कळ यज्ञ करून ब्राह्मणांस अनेक अपूर्व पक्वान्नें व फळफळावळी अर्पण केल्या. केवळ सुखासाठीं निषिद्ध अशीं मद्यें पिऊन मत्त झालेले गवई व बजवय्ये या राजाची स्तुति करीत. सुवर्णकवचधारी व

मागील पृष्ठावरून पुढें चालू.

वर्षें वाढत राहून नंतर राजाची डावी बरगडी फोडून एक अत्यंत तेजस्वी व इंद्रासारखा बलाढ्य पुत्र बाहेर आला ! ह्या कोणाला पिणार असें देवांनीं विचारलें असतां, इंद्रानें आपली अंगुली त्याचे तोंडांत घालून ' मां धाता ' ' मला पिईल ' असें उत्तर दिलें; व यावरूनच त्याचें ' **मांधाता** ' हें नांव पडलें. या **मांधात्यास** पुढें अजगवनामक धनुष्य, स्वर्गीय बाण व अभेद्य कवच हीं मिळून धनुर्वेद व शस्त्रविद्या यांत तो पारंगत झाला. बारा वर्षें अवर्षण पडलें असतां यानें स्वतः इंद्रासमक्ष पर्जन्यवृष्टि केली पुढें त्यानें बलाढ्य **गांधारदेशाधिपतीस** जिंकून युद्धांत ठार केलें; व अखेर मरणोत्तर त्यास इंद्राचें अर्धें सिंहासनही प्राप्त झालें; असा वनपर्वांतील कथेचा सारांश आहे.

सुवर्णाचे रथांत बसलेले असे छत्रचामरयुक्त एक लक्ष राजे त्यानें केवळ दक्षणा म्हणून ब्राह्मणांस दिले होते ! ' अंबरीषासारखें असलें कृत्य पूर्वीं कोणीं केलेलें नाहीं व पुढेंही कोणी करणार नाहीं ' असे उद्गार या वेळीं महर्षींचे तोंडून निघाले ! अशा प्रकारच्या अंबरीषराजासही जर मृत्यूनें अखेर गांठलेंच, तर तुझ्या पुत्राची मातबरी काय.? ( ११ ) **शशबिंदुराजा** महापराक्रमी व वैभवशाली होता; त्याला १ लक्ष बायका असून प्रत्येकीला त्याचे पासून एकेक हजार पुत्र झाले ! हे राजपुत्र पित्याप्रमाणेंच पराक्रमी असून त्यांनीं निरनिराळीं राज्यें संपादिलीं. मोठ्या अश्वमेध यज्ञांत शशबिंदुराजानें हे राजपुत्र, प्रत्येकाबरोबर अनेक रथ, हत्ती, घोडे, कन्या, गाई व मेंढ्या यांसह ब्राह्मणांस दान केले ! तरी आपण फारच थोडें दिलें असें त्यास वाटलें ! याच्या ह्या यज्ञांत जितके लांकडी स्तंभ होते तितकेच आणखी सोन्याचे झाले. अशा प्रकारच्या शशबिंदुराजासही मरण चुकलें नाहीं; मग तुझ्या मुलाची कथा काय ? ( १२ ) **गयराजा** अत्यंत धार्मिक व उदार होता. शंभर वर्षें तो यज्ञावशिष्ट अन्नावरच राहिला होता. दररोज सकाळीं १ लक्ष गाई व इतरपशु, १० हजार घोडे, व १ लक्ष मोहरा दान करण्याचा नियम त्यानें १०० वर्षें पाळला होता ! याच यज्ञांतील यज्ञस्तंभ सोन्याचे व रत्नखचित होते व याची सोन्याची वेदी ३६ योजनें लांब व २४ ते ३० योजनें रुंद असून तीवर मोत्यें, हिरे व रत्नें जडविलीं होतीं. ही वेदी यज्ञसमाप्तीनंतर गयराजानें ब्राह्मणांस देऊन टाकली. याच यज्ञस्थलीचे जागीं पुढें अक्षय्य वटवृक्ष व पवित्र ब्रह्मसरोवर निर्माण झालें; व त्यामुळें गयाची कीर्ति त्रैलोक्यांत पसरली. हा गयराजाही जर अखेर मृत्यु

पावला तर आपल्या मुलाच्या मरणाबद्दल तूं व्यर्थ शोक कां करतोस? ( १३ ) सांकृति रंतिदेवाचे राजवाड्यांत रत्नजडित कुंडलें घातलेले २लक्ष आचारी येतील तितक्या ब्राह्मणांस व अतिथींस रात्रंदिवस भोजन घालीत असत! हा यज्ञ करूं लागला म्हणजे स्वर्गप्राप्तीचे इच्छेनें अनेक पशु आपण होऊनच त्याजकडे येत! त्याच्या पाकशाळेंत व अग्न्यागारांत इतके पशु दररोज मारले जात कीं, त्यांच्या चर्मराशींपासून रक्तनदी वाहूं लागली, व तिलाच पुढें 'चर्मण्वती' हें नांव पडलें! तो दररोज ब्राह्मणांस निष्कदान करीत असे. रंतिदेवानें ब्राह्मणांस दान दिलेलीं भांडीं, आसनें, वाहनें, शय्या वगैरे सर्व सोन्याचीं होतीं. अशा रंतिदेवासही अखेर मरण हें आलेंच, मग तुझ्या मुलाची ती कथा काय? ( १४ ) भरतराजानें कण्वाश्रमा लहानपणींच अनेक अघटित कृत्यें केलीं. बर्फाप्रमाणें पांढऱ्या असलेल्या सिंहांना फरफरा ओढीत आणून तो बांधून टाकी. लाखी व मनशिळी रंगाच्या क्रूर वाघांसही तो कह्यांत आणी; सर्प व हत्ती यांचे तो दांत उपटून टाकी; आणि रानरेडे वगैरे वन्य पशूंसही तो जर्जर करी! या अचाट कृत्यांवरून ऋषींनीं त्याचें ' सर्वदमन ' असें नांव ठेवलें होतें. यानें यमुना, गंगा व सरस्वती यांच्या तीरावर हजारों अश्वमेध व इतर अनेक यज्ञ केले. त्यानें एकट्या कण्वांसच १००० पद्मभार शुद्ध सोनें दान म्हणून दिलें. याचा १०० वावा लांब असलेला यज्ञस्तंभ नुसता सोन्याचाच होता. भरताचें मन सदा उत्साहपूर्ण असून तो सर्व शत्रूंस अजिंक्य होता. असा हा सार्वभौम पराक्रमी भरतराजाही अखेर मृत्युवश झाला! तेथें तुझ्या पुत्राचा काय पाड? ( १५ ) वेनपुत्र पृथुराजा हा मोठा पराक्रमी व प्रजावत्सल असून त्यास राज-

सूय यज्ञांत ' सम्राट् ' नात्यानें ऋषींनीं अभिषेक केला होता. याचे वेळीं जमीन इतकी सुपीक असे कीं, तींत नांगरल्यावांचूनच पीक येत असे ! त्या कालचे सर्व दर्भ सुवर्णमय पण फार मृदु असत ! प्रजाजन यांचींच वस्त्रें विणीत व त्यांजवरच निजत. त्या कालीं देश, नगरें वगैरे अस्तित्वांतच आलेलीं नव्हतीं. लोक आपापल्या सोयीप्रमाणें वृक्षांवर किंवा गुहेंत आनंदानें राहत. पृथुराजास पर्वतही वाट देत व समुद्राचें उदकही त्याचे समोर निश्चळ होई. प्राणिमात्राचें सुख व हित वाढवून तें कायम राखण्या-करितां त्यानें पृथ्वीस वश करून घेतलें; व सर्व प्राण्यांस इष्ट असलेलें वस्तुरूपी दुग्ध तिजपासून काढविलें. प्रथमतः फुललेला शाल वृक्ष वत्स झाला; व प्लक्ष वृक्षानें औदुंबररूपी पात्रांत वठ-लेल्या झाडांस पुनः अंकुर फुटणें हें दूध पृथ्वीपासून काढलें. उदय पर्वत वत्स झाल्यावर मेरु पर्वतानें शिलामय पात्रांत रत्नौषधी-रूप दूध काढलें. आस्म्यानें स्वतःच वत्स बनून मनरूपी पात्रांत इष्ट वस्तुरूप दूध काढलें. विरोचन वत्स होतांच द्विमूर्धा दैत्यानें आमपात्रांत मायारूप दूध काढलें. स्वायंभुव मनु वत्स झाल्या-नंतर स्वतः पृथुराजानें शेतकी व गवतरूपी दुग्ध काढलें. तक्षक वत्स झाल्यानंतर धृतराष्ट्र नागानें अलाबु-( भोंपळा ) पात्रांत विष-रूप दूध काढलें. सोमराजाला वत्स करून सप्तऋषींनीं बृहस्पती-कडून वेदरूपी पात्रांत सनातन ब्रह्मरूपी दूध काढलें. वृषध्वज वत्स झाल्यानंतर कुबेरानें आमपात्रांत अंतर्धानरूप दूध काढलें. चित्ररथ हा वत्स झाल्यावर विश्वरुचि गंधर्वानें कमलपात्रांत पवित्र सुवासरूप दूध काढलें. वैवस्वत वत्स झाल्यानंतर स्वतः यमधर्मानें रौप्य पात्रांत स्वधारूप दूध काढलें. पृथ्वीची ही दोहन-क्रिया त्या

कालपासून अजूनही अव्याहत चालली आहे. आपल्या राज्यांतील सर्व मातीचे पदार्थ सोन्याचे करून **अश्वमेध** यज्ञांत त्यानें सोन्याचे ६६ हजार हत्ती करून ते ब्राह्मणांस अर्पण केले. अशा **पृथुराजा**सही मृत्यु चुकला नाहीं; याकरतां आपल्या पुत्राबद्दल तूं शोक करूं नको ( १६ ) **जामदग्न्य परशु**राम हा तर महापराक्रमी व महातपस्वी आहे. **कार्तवीर्याच्या** पुत्रांनीं **जमदग्नीस** मारल्याचें ऐकतांच **परशुरामानें** अजिंक्य **कार्तवीर्याचा** वध केला इतकेंच नव्हे, तर त्यानें त्याचा पक्का सूड उगविण्यासाठीं आपल्या धनुष्यानें, परशूनें, तरवारीनें व मुसळानें, तसेंच झाडांस बांधून, पाण्यांत बुडवून व मिरच्यांची धुरी देऊन कोट्यावधि क्षत्रिय ठार केले. आणि जिवंत ठेवल्यांचीं नाकें व कान कापून त्यांचे दांतही पाडले व क्षत्रियांचीं अनेक राज्यें उध्वस्त केलीं ! **गुणावती** नदीचे उत्तरेस व **खांडवारण्याचे** दक्षिणेस डोंगरानजीक त्याचें हैहयांशीं युद्ध होऊन त्या सर्वांचा त्यानें समूळ संहार केला. पृथ्वीवरील इतर रानटी व क्रूर लोकांचाही नायनाट करून कृतयुगास अनुरूप अशी धर्मसंस्थापना त्यानें केली. परशुरामास **अनुपम ऐश्वर्य प्राप्त झालें असतांही त्यास लोभ किंवा अहंकार याचा स्पर्शही झाला नाहीं.** त्यानें अखेर मोठा अश्वमेध यज्ञ केला; त्या वेळची वेदी बत्तीस हात उंचीची असून ती सर्व सोन्याची केलेली होती। तिला अनेक रत्नें जडविलेलीं होतीं; यज्ञाचे अखेर **परशुरामानें** जिंकलेली सर्व पृथ्वी **मारीच कश्यप** मुनींस दान केली. ‘ पृथ्वीवर आतां तुझी कांहीं सत्ता उरली नाहीं, तूं दुसरी कडे जा ’ असें **कश्यपानीं** सांगतांच **परशुरामानें** ती आज्ञा शिरसा वंद्य केली; आणि बाणानें **समुद्र** हटवून नवीन मोकळ्या केलेल्या भूमींत व **महेंद्र** पर्वतावर तो

राहूं लागला. परशुराम इतका पराक्रमी व निरहंकार आहे तरी त्यासही अखेर मृत्यु हा यावयाचा आहे. पूर्वी होऊन गेलेले हे प्रख्यात राजे यांस मृत्यु चुकला नाहीं, व हल्लीं हयात असलेल्यासही चुकणार नाहीं. याकरतां पुत्राबद्दल शोक करणें सोडून दे."

नारदांच्या या उपदेशानें सृंजयराजाचे मनास समाधान वाटून त्याचें दुःख व शोक नाहींसा झाला. नारदानीं राजास वर देऊं केला; तेव्हां राजा म्हणाला कीं, 'प्रत्यक्ष आपण मला प्रसन्न झाल्यानंतर मला दुर्लभ असें कांहींच नाहीं; करतां मला कांहींच मागावयाचें नाहीं!' सृंजयराजाची ही शांति, आत्मसंयमन, व निर्लोभता पाहून नारदांस समाधान वाटलें. तसेंच सृंजयाचा पुत्रही भयभीत झालेला असतां एकाद्या बळी दिलेल्या पशूप्रमाणें चोरांनीं ठार मारला असून त्याचे हातून यज्ञयाग अगर पराक्रम कांहींच झालें नाहीं व त्यास संततिही नाहीं; अर्थात् त्याच्या जन्माचें कांहींच सार्थक झालेलें नाहीं; ह्या गोष्टी लक्षांत आणून नारदानीं तो मृत राजपुत्र पुनः जिवंत केला! तेव्हां तो पूर्वींहूनही अधिक तेजस्वी व शोभायमान दिसूं लागला! सृंजयासही पुत्राची पुनः भेट झाल्यामुळें परमानंद झाला; आणि त्यानें अनेक यज्ञयाग व पुष्कळ दान धर्म केला. (द्रोण० अ० ५५-७१)

## चंद्राची क्षय-वृद्धि.




दक्ष प्रजापतीस नक्षत्ररूपी सत्तावीस मुली होत्या; त्या त्यानें सोमा-( चंद्रा ) स दिल्या. त्या सर्वही कन्या अत्यंत सुंदर असून त्यांचे डोळे पाणीदार व विशाळ होते; पण त्यांतले त्यांत रोहिणी ही विशेष रूपसंपन्न असल्यामुळें चंद्र नेहमीं तिजसन्निधच राहून विलास करीत असे. यामुळें इतर कन्या रागावून वरचेवर बापाकडे येत; आणि चंद्राच्या रोहिणी-वरील फाजील आसक्तीबद्दल व आपल्या अनादराबद्दल गाऱ्हाणें गात. पतीकडे न जातां बापाजवळच त्याची सेवा व तप करीत राहावें, असेंही त्यांना वाटे. पण प्रत्येक वेळीं तो त्यांची समजूत करी; व ' सर्व भार्यांशीं समतेनें वागून व सर्वांकडे येऊन त्यांचा आदर कर; असें न करशील तर मोठा अधर्म होईल ' असें आपल्या जांवयास बजावून दक्ष आपल्या मुलींस चंद्राकडे परत पाठवीत असे. परंतु रोहिणीवरील प्रेमातिशयामुळें चंद्रानें दक्षाचा हा उप-देश ऐकला नाहीं. एवढेंच नव्हे तर दक्षानें शाप देण्याची धमकी घातली होती, तिलाही त्यानें जुमानलें नाहीं; व तो पूर्ववत् रोहिणी-पाशींच राहून विलास करूं लागला. तेव्हां दक्षप्रजापतीनें संतापून ' तुला क्षयरोग होईल ' असा चंद्रास शाप दिला ! या शापा-प्रमाणें चंद्र दिवसेंदिवस क्षीण व निस्तेज होऊं लागला. त्यामुळें नवीन औषधी, वनस्पति व लता उगवेनाशा झाल्या; व जुन्यांचा स्वाद व रस कमी होऊं लागून त्या सुकत चालल्या. एवढेंच

नव्हे, तर चंद्राच्या क्षीणतेबरोबर इतर प्राणिमात्र, प्रजा व देवही क्षीण होऊं लागले. तेव्हां देवांनीं दक्ष प्रजापतीकडे जाऊन यासंबंधानें गाऱ्हाणें केलें. त्यावर दक्ष प्रजापति म्हणालाः—' माझी शापवाणी कदापि खोटी होणार नाहीं. चंद्र सर्व भार्यांवर सारखें प्रेम करूं लागला व त्यानें सरस्वती नदीच्या तीर्थांत स्नान केलें, म्हणजे त्याचा कायमचा क्षय नाहींसा होईल. तथापि त्यास अर्धा महिना क्षय व अर्धा महिना वृद्धि हीं सदोदित भोगावीं लागतीलच. ' दक्ष प्रजापतीच्या या आज्ञेप्रमाणें चंद्रानें अमावास्येच्या दिवशीं सरस्वतीतीरीं जाऊन तिच्या पहिल्या तीर्थावर स्नान केलें. तेव्हां त्याचें निस्तेजत्व जाऊन त्यास पुनः शीतांशुत्व व सतेजता हीं प्राप्त झालीं. म्हणून तेव्हांपासून या तीर्थास ' प्रभास ' तीर्थ असें नांव पडलें. चंद्रही सर्व भार्यांवर सारखें प्रेम करून त्या सर्वांकडे येऊं लागला. तथापि प्रत्येक वद्य पक्षास दक्षानें शाप दिल्याप्रमाणें, त्यास क्षय व्हावयाचा तो होतच असे, पण दर अमावास्येस प्रभासतीर्थांत स्नान करून तो आपला क्षय नाहींसा करी; व पुनः पंधरा दिवस वाढूं लागे. ( शल्य० अ० ३५ )

## त्रित व त्याचे दोघे भाऊ.



सदा धर्मपरायण असलेल्या गौतम मुनींस एकत, द्वित व त्रित असे तिघे पुत्र होते. ते सर्वच मोठे ब्रह्मनिष्ठ, तपस्वी, तेजस्वी व कुटुंबवत्सल होते, त्यामुळें त्यांचें वर्तन पाहून गौतम मुनींस फार संतोष होत असे. गौतमांचे पश्चात् ते ज्यांचे यज्ञयाग करीत असत ते सर्व राजे व इतर लोक हेही आपलीं धर्म

कृत्यें गौतमांच्या मुलांकडूनच करवीत. तिघेही भाऊ जरी धर्मात्मे होते, तरी त्रित हा अध्ययन व सदाचरण यांमुळें विशेष मोठेपणा व सन्मान पावला. एके प्रसंगीं अनेक यजमानांचे यज्ञयाग केल्या-वर त्यांतील आचार्य-दक्षणा म्हणून मिळालेल्या गाई घेऊन तिघे भाऊ पूर्व दिशेकडील आपल्या आश्रमास परत येत होते. त्रित हा मोठ्या हर्षानें पुढें चालला होता, व त्याचे दोघे भाऊ मागून गाई हांकीत येत होते. ती वेळ रात्रीची असून ते सरस्वती नदीचे तीरानें चालले होते. त्यांचे मार्गालगतच एक विहीर ( कूप ) होती. इतक्यांत एकत व द्वित या दोघांचे मनांत मत्सर व लोभ उत्पन्न झाला, " त्रित हा यज्ञकुशल व वेदवेत्ता आहे; त्यास दुसऱ्या वाटेल तितक्या गाई मिळतील " असें म्हणून एकत व द्वित हे त्रितास सोडून देऊन मागच्या मागें गाई घेऊन वांकड्या वाटेनें आश्रमास पळून जाण्याचा विचार आपसांत करूं लागले. इतक्यांत रस्त्यांवरून समोरून एक अक्राळविक्राळ लांडगा येण्यास व त्रित त्या कूपाजवळ येण्यास एकच गांठ पडली. लांडग्यास पाहून भिऊन त्रित बाजूस सरूं लागला, तों तो त्या खोल कूपांत पडला! त्यानें आपल्या दोघां भावांस मोठमोठ्यानें पुष्कळ हांक मारल्या, व त्या त्यांस ऐकूंही आल्या. परंतु लोभाविष्ट झाल्यामुळें व लांडग्याचे भीतीनें तिकडे लक्ष न देतां गाई घेऊन ते मागचे मागें पळाले, व दुसऱ्या वाटेनें आश्रमास परत आले. इकडे, आपण या बहुतेक निर्जल, धुळीनें भरलेल्या व गवत-वेलींनीं झांकलेल्या अंधेऱ्या कूपांत कां पडलों, याचा त्रित शांतपणानें विचार करूं लागला. लांडग्यापासून आपणांस मरण येईल या भीतीनें—अर्थात् मृत्युभयामुळें—आपण या कूपांत पडलों; असें त्यास दिसून येतां

मृत्युभय-नाशार्थ तेथेंच सोमयज्ञ करण्याचा त्यानें संकल्प केला. त्या भयंकर कूपांत यज्ञ-सामुग्री मिळण्याचें कांहींच साधन नसतांही त्यानें एक कोरडी जागा पाहून तेथें अग्नि स्थापिला, तो स्वतः होता झाला; तेथलेच कांहीं गोटे घेऊन त्यांस ग्रावे ( सोमवल्ली कुटण्याचे दगड ) कल्पिले, व कूपावर लोंबणारी एक लता तोडून घेऊन व तीच सोमवल्ली कल्पून तिचा रस काढिला; आणि त्याचे यथायोग्य हविर्भाग करून ते तो ऋचा, यजुर्मंत्र व सामें मोठमोठ्यानें म्हणत देवांस अर्पण करूं लागला. त्रिताचें हें तपःसामर्थ्य व भावनाशक्ति पाहून बृहस्पतीसह सर्व देवांनीं तेथें येऊन त्रितास प्रत्यक्ष दर्शन दिलें; व त्यानें दिलेले हविर्भाग भक्षण करून ते संतुष्टही झाले. **यज्ञयागादि धर्मकर्मांत सामुग्री किंवा बिनचूक विधि यांपेक्षां श्रद्धा व भावना हींच श्रेष्ठ आहेत**, हें यावरून सिद्ध होतें. ‘ मला या भयंकर कूपांतून बाहेर काढावें व इतउत्तर या कूपास जो स्पर्श करील त्यास देवलोक प्राप्त व्हावा ’ असा त्रितानें प्रसन्न झालेल्या देवांपाशीं वर मागितला. इतक्यांत त्या कूपांतून एकदम सरस्वती नदी प्रगट झाली ! व तिनें तो कूप भरून काढून त्रितासही पाण्याचे ओघाबरोबर वर काढलें ! त्रितानें तेथें जमलेल्या देवांची स्तुति केल्यावर व देवांनींही मागितलेला वर त्यास दिल्यावर उभयतां आपापल्या मार्गानें गेले. आश्रमास परत आल्यावर आपल्या लोभी व भ्याड भावांना पाहून त्रितास फार संताप आला, व ‘ ज्या अर्थीं तुम्हीं पशूंच्या लोभानें माझा त्याग करण्याचें पाप कर्म केलेंत, त्या अर्थीं तुम्ही व तुमची संतति क्रूर लांडगे, माकडें, वानर व अस्वलें होईल ’ असा त्यानें रागाचे भरांत त्यांस शापही दिला ! त्याप्रमाणेंच लागलीच एकत

व द्वित आणि त्यांची संतति वरील पशु बनून चोहोंकडे संचार करूं लागली. मत्सर, लोभ वगैरे दुर्गुण जडून कायम झाले म्हणजे मनुष्य प्राण्याची माणुसकी जाऊन त्याची अवनती होत होत अखेर तो पशुकोटींत जातो, हें नीतितत्त्व या कथेवरून स्पष्ट होतें. ( शल्य० अ० ३६ )

## वसिष्ठ-विश्वामित्रांची स्पर्धा.



सरस्वतीचे पवित्र तीरावर भगवान् स्थाणूनें मोठी तपश्चर्या व हवन करून तेथें एक तीर्थ स्थापन केलें; त्याचें पुढें ' स्थाणुतीर्थ ' हेंच नांव पडलें. या तीर्थावर देवांनीं स्कंदास देवसेनेच्या सेनापतित्वाचा अभिषेक केला. या स्थाणुतीर्थावर मैत्रावरुणि वसिष्ठऋषींचा आश्रम असून त्याचे पूर्वेस कांहीं अंतरावर स्वतःचा वेगळा आश्रम बांधून विश्वामित्र घोर तपश्चर्या करीत होता. अर्थात् या तपाचे बाबतींत उभयतांत मोठी स्पर्धा व चुरस होती. उभयतांचें तपःसामर्थ्य जरी बहुतेक सारखेंच होतें, तरी विश्वामित्र अत्यंत रागीट, तामसी व मत्सरी होता. अर्थात् त्यानें वसिष्ठाइतका मनोविजय संपादिलेला नसल्यामुळें त्यास आपल्या तपाचेंही पूर्ण फळ मिळालें नाहीं वसिष्ठांचें तेज व मानमान्यता सहन न होऊन त्यांचा जीव घेण्याचा अखेर विश्वामित्रानें संकल्प केला. त्यानें सरस्वती नदीस अशी आज्ञा केली कीं, ' तूं आपल्या पुरानें वसिष्ठांचा आश्रम बुडवून त्यांस मजकडे वाहवून आण, म्हणजे मी त्यांस ठार मारून टाकतों. ' वसिष्ठ व विश्वामित्र या

उभयतांचेंही तप:सामर्थ्य माहीत असल्यामुळें सरस्वती नदी भयानें कंपित होऊन मोठ्या चिंतेंत पडली. ' विश्वामित्राची आज्ञा न ऐकावी तर तो शाप देणार, ऐकावी तर वसिष्ठही आपणास शापणार; अशा स्थितींत काय करावें व कसें वागावें, म्हणजे आपण दोघांच्याही शापांत सांपडणार नाहीं ? ' असा ती विचार करूं लागली. तिनें विश्वामित्राची आज्ञा मोकळ्या मनानें वसिष्ठांस सांगितली. तेव्हां, ' तूं मला खुशाल वाहून नेऊन विश्वामित्राचे शापापासून आपला बचाव कर ' असें **शांति, क्षमा व कृपा यांची केवळ मूर्ति असलेल्या** वसिष्ठांनीं तिला उत्तर दिलें ! वसिष्ठांस पुराबरोबर वाहून तर न्यावयाचें पण त्यांचा जीवही बचवावयाचा, अशा प्रकारचा एक उपाय सरस्वतीनें मनांत योजून ठेवला. पुढें एके दिवशीं नदीतीरावर विश्वामित्र जप व हवन करीत बसला आहे, अशी संधी पाहून सरस्वती नदी एकदम फुगली; व तिनें वसिष्ठांस पुराबरोबर वाहून नेऊन विश्वामित्रापाशीं आणून सोडलें. त्यांस पाहतांच त्यांचा जीव घेण्यासाठीं विश्वामित्र लांकूड वगैरे आसपास शोधूं लागला; तेवढ्या अवधींत सरस्वतीनें पुनः वसिष्ठांस वाहून तेथून दूर नेलें ! ( हा प्रकार जेथें घडला त्या स्थलास पुढें ' वसिष्ठप्रवाह ' तीर्थ असें नांव पडलें. ) नदीनें आपणास अशा रीतीनें फसविलें, हें पाहून विश्वामित्रास फार राग आला; व त्याचे भरांतच, ' तुझें येथील पाणी रक्तमय होईल ' असा त्यानें सरस्वतीस शाप दिला ! त्याप्रमाणें लवकरच तेथील पाणी रक्तमिश्रित होऊन गेलें. रक्ताचा येवढा संचय निर्माण झाल्याचें कळतांच अनेक राक्षस तेथें येऊन राहूं लागले; व रक्त प्राशन करून आपली तहान भागवूं लागले. पुढें कांहीं काळानें अनेक तपोधन

मुनि सरस्वतीचीं तीर्थें करीत करीत या स्थलीं आले. तेव्हां विश्वामित्राच्या शापानें पवित्र सरस्वतीची झालेली ती दुर्दशा पाहून त्यांस दया आली; आणि त्यांनीं कांहीं दिवस तेथेंच राहून व अनेक तपें करून सरस्वतीचें उदक पुनः पूर्ववत् स्वच्छ, निर्मळ व पवित्र केलें. येवढेंच नव्हे तर सरस्वती व अरुणा यांचे संगम-तीर्थावर स्नान करावयास लावून तेथील सर्व राक्षस जातीही उद्ध-रल्या. याप्रमाणें **कोपिष्ठ व मत्सरग्रस्त विश्वामित्राचा हेतु पूर्ण न होतां त्याचा शापही निष्फळ झाला.** (शल्यपर्व, अध्याय ४२–४३).

## असित देवल व जैगीषव्य.



सरस्वती नदीच्या आदित्य तीर्थावर धर्मशील, तपोधन व सदाचरणी असे असित देवल ऋषि गृहस्थाश्रम करून राहत होते. एके समयीं जैगी-षव्यनामक ब्रह्मज्ञानी मुनि भिक्षुरूपानें त्यांचे येथें येऊन राहिले. परंतु त्यांस पाहूनही असि-तानीं त्यांचें आदरातिथ्य केलें नाहीं. कांहीं काळानें जैगीषव्य गुप्त होऊन पुनः भिक्षु रूपानें त्याजपाशीं आले, व त्यांनीं भिक्षा मागि-तली. तेव्हां मात्र असितानीं त्यांचें योग्य स्वागत करून त्यांस आपणापाशीं ठेवून घेतलें. जैगीषव्य त्यांचे येथें भोजन करून कांहीं न बोलतां स्वस्थ तप करीत बसत. याप्रमाणें बराच काळ लोट-ल्यावर **असिताचे मनांत जैगीषव्यांसंबंधानें अनादर व तिरस्कारबुद्धि उत्पन्न झाली.** ‘ मीं पुष्कळ वर्षें सेवा केली तरी हा आळशी भिक्षु एक शब्द सुद्धां कसा बोलत नाहीं ? ’ असें ते मनांत म्हणूं लागले. नंतर असित कलश घेऊन अंतरिक्ष

मार्गानें समुद्रावर स्नानास गेले; पण तेथें पाहतात तों जैगीषव्य आपल्या आधीं येऊन समुद्रस्नान करून तप करीत बसले आहेत, असें असितांचे दृष्टीं पडलें! तेव्हां त्यांचे मनास हुरहुर लागली. जैगीषव्यांचें तपःसामर्थ्य व योगसामर्थ्य फारच मोठें आहे, असा त्यांस प्रत्यक्ष प्रत्यय येऊं लागला. नंतर असितानीं स्नान, जपजाप्य व आन्हिक आटोपलें व ते पुनः त्वरेनें आश्रमास परत आले; पण तेथेंही पुनः जैगीषव्य आपल्या आधींच येऊन बसलेले त्यांस आढळले! जैगीषव्याच्या अपूर्व सामर्थ्याचें हें कोडें उकलण्यासाठीं असित देवल हे आकाश मार्गानें जाऊं लागले. पण या वेळीं असा चमत्कार झाला कीं, असित ज्या ज्या लोकीं जात तेथे तेथें जैगीषव्य आपल्या आधींच येऊन बसले आहेत, असें त्यांस दिसून येई! याप्रमाणें पितृलोक, सोमलोक, निरनिराळे यज्ञयाग करणारांचे अनेक लोक, वरुण लोक, आदित्य लोक, गोलोक व पतिव्रता लोक हे सर्व असितानीं पाहिले; पण प्रत्येक ठिकाणीं जैगीषव्य त्यांचे आधीं आलेले होते! पतिव्रता लोकांतून पुढें जे जैगीषव्य गुप्त झाले, ते असितांस मुळींच दिसले नाहींत. त्यांनीं तेथील सिद्धांपाशीं या संबंधानें विचारपूस केली. तेव्हां, जैगीषव्य शाश्वत ब्रह्मलोकीं गेल्याचें त्यांनीं त्यांस सांगितलें तेव्हां तिकडे जाण्यासाठीं असितांनीं उड्डाण केलें; पण ते लागलींच खालीं पडले! याप्रमाणें फजीत झाल्यावर असित पुनः क्रमानें वरील लोक ओलांडीत मृत्युलोकांतील आपल्यां आश्रमांत परत आले व पाहतात तों जैगीषव्य पुनः त्या आश्रमांत पूर्ववत् आहेत तसेच आहेत! **हा सर्व प्रकार पाहून असितांचे मनांतील त्यांचे विषयींचा अनादर पूर्णपणें नष्ट झाला व ते नम्रपणानें त्यास शरण गेले!**

जैगीषव्यानींही संन्यास दीक्षा देऊन असितांस मोक्षधर्माचा उपदेश केला. जैगीषव्यांचे सन्निध राहून व त्यांचे कृपेनें असितांस अखेर परमसिद्धि व श्रेष्ठ असें योगसामर्थ्य प्राप्त झालें.(शल्य० अ० ५०)

## सारस्वत-चरित्र.



र्वीं दधीचिनामक एक महातपस्वी होते. ते मोठे ज्ञानी व जितेंद्रिय असून त्यांचें तप पाहून इंद्रास फार भीति पडली. त्यानें अलबुषानामक एक सुंदर अप्सरा त्यांचें सत्वहरण करण्यास पाठविली. सरस्वती नदीवर दधीचि देवतार्चन करीत असतां ही अप्सरा त्यांच्या जवळ येऊन उभी राहिली; तेव्हां तिचें अप्रतिम लावण्य पाहून दधीचांचें जें वीर्य स्खलन झालें तें सरस्वती नदीनें मोठ्या आदरानें आपल्या उदरीं धारण केलें. योग्य समयीं त्या गर्भापासून पुत्र झाला; सरस्वतीनें लागलीच हा पुत्र आणून दधीचींस दाखविला. आपला हा पुत्र पाहून व आपणासाठीं त्याचा भार नऊ महिने सरस्वतीनें वाहिला हें लक्षांत घेऊन, दधीचांस आनंद झाला. त्यांनीं कृतज्ञतापूर्वक सरस्वतीची स्तुति केली; आणि माझा पुत्र तुझेंच नांव पुढें चालवील, असा तिला वर दिला. त्याप्रमाणें त्याचें सारस्वत असें नांव ठेवून हा मोठा तपस्वी व वेदवेत्ता होईल असा त्यासही त्यांनीं आशीर्वाद दिला. सरस्वतीही आनंदित होऊन सारस्वत पुत्रास घेऊन निघून गेली; व त्याचें ममतेनें पालन-पोषण करूं लागली. पुढें कांहीं दिवसांनीं, दानववधार्थ इंद्रास वज्र हवें-होतें तें बनविण्यासाटीं, दधीचींनीं प्राणत्याग करून आपल्या अस्थी दिल्या ! ( पृ० १८९–१९० पहा ).

पुढें कांहीं काळानें अवर्षण होऊन बारा वर्षें मोठा दुष्काळ पडला. मोठेमोठे तपस्वी ऋषिही पोट भरण्यासाठीं दश दिशांस भटकूं लागले. सारस्वतही देशांतरास जाणार होता; पण आपल्या मातेचे आज्ञेवरून तो सरस्वती तीरींच राहिला. तेथें नदींतील मुबलक मत्स्यांवर उदरपोषण करून बारा वर्षांच्या दुष्काळांत सारस्वतानें आपले प्राण व वेद यांचें संरक्षण केलें. बारा वर्षांचा दुष्काळ संपल्यावर देशोधडीस गेलेले इतर ऋषि पुनः सरस्वतीतीरीं आले. बारा वर्षांच्या या भयंकर काळांत अध्ययन न झाल्यामुळें हे सर्व ऋषि वेद विसरले होते. सारस्वतापासून पुनः सर्व वेदविद्या शिकावी, अशी त्यांस इच्छा झाली; तथापि त्याच्यासारख्या बाल मुनीचें शिष्यत्व पतकरण्यास ते कचरूं लागले. पण ' **शिष्यत्व पतकरल्याखेरीज दुसऱ्यास विद्या शिकवूं नये, अशी धर्माज्ञा आहे**. तिचे विरुद्ध मी वागलों तर अधर्म होईल. **पुष्कळ वय, पांढरे केस, संपत्ति किंवा पुष्कळ आप्तेष्ट असल्यानें थोरपणा येत नसून, जो विद्वान् असेल तोच थोर होय**. यासाठीं विद्या संपादण्याचे कामीं वयाकडे पाहण्याचें कारण नाहीं. ' असा पोक्त उपदेश या बालमुनि सारस्वतानें ऋषींस केला. तेव्हां त्यांनीं सारस्वताचें शिष्यत्व पतकरून त्याजपासून पुनः वेदविद्या संपादन केली. याप्रमाणें सारस्वत ऋषीनें इतर ६० हजार ऋषींस विसरलेली वेदविद्या पुनः दिली. *(शल्यपर्व, अध्याय ५१)



## वृद्धकन्येची कथा.

प्राचीन काळीं कुणिगर्ग नांवाचा एक मोठा तपस्वी व वीर्यशाली ऋषि होता. त्यानें अनेक वर्षें तपश्चर्या केल्यावर एक अत्यंत लावण्यवती व गुणवती मानस कन्या निर्माण केली. ती तारुण्यांत आल्यावर तिला त्यानें एके ठिकाणीं देऊं केली होती, पण तें स्थल तिला आवडलें नाहीं; व पुढेंही कोणी अनुरूप असा वर तिला मिळाला नाहीं. तेव्हां ती ब्रह्मचारिणी होऊन तपामध्येंच निमग्न होऊन राहिली. कांहीं काळानें कुणिगर्ग परलोकवासी झाला; तरीही पुढें कन्येचा पूर्वक्रम तसाच चालला होता. याप्रमाणें तिनें पुष्कळ वर्षें * तप केलें. पुढें तिला इतकें वार्धक्य आलें कीं, तिला स्वतः जागचेंही हालवेना. तेव्हां अशा स्थितींत जास्त जगण्यापेक्षां देहत्याग करून स्वकष्टार्जित परलोक साधावा, असा तिनें विचार केला. पण **स्त्रीनें कितीही तपाचरण केलें, तरी तिला ( विवाह ) संस्कार झालेला नसेल तर पुण्यलोकप्राप्ति होणार नाहीं**, असें नारदानीं तिला सांगितलें. तेव्हां ती ऋषींच्या सभेंत जाऊन म्हणाली कीं, ' जो माझें पाणिग्रहण करील त्यास मी आपले तपाचें अर्धें पुण्य देईन. ' वृद्ध कन्येचें हें भाषण ऐकून गालवपुत्र प्राक्शृंगवान् म्हणाला कीं, ' मी तुजशीं विवाह करण्यास कबूल आहें; पण मी फक्त एकच रात्र तुजपाशीं राहीन. ' गालव पुत्राची ही अट वृद्ध कन्येनें मान्य केल्यावर उभयतांचा यथाविधि विवाह झाला.

* अध्यायाचे अखेर कथेची व तीर्थाची जी फलश्रुति सांगितली आहे, तीवरून हिनें ५८ वर्षें तप केलें असें दिसतें.

ठरल्याप्रमाणें त्या रात्रीं दिव्य वस्त्रेंभूषणें अंगावर घालून आणि सुगंधित काजळ, कुंकुं व उटी लावून ती पतीकडे जाण्यास सिद्ध झाली, तों ती सुंदर तरुणीप्रमाणें दिसूं लागली! एकसत्र उभयतां एकत्र राहिल्यावर, पतीची अट शिरसा मान्य करून तिनें दुसरे दिवशींच देहत्याग केला, व ती स्वर्गास गेली! गालवपुत्रानेंही तिच्या रूप-गुणांनीं मोहित व दुःखित होऊन देहत्याग केला; आणि पत्नीनें दिलेल्या अर्ध्या तपाचे बलावर तोही तिला भेटण्यासाठीं स्वर्गीं गेला! ( शल्य० अ० ५२ )

## अरुंधती व श्रुतावती.





सरस्वती नदीवरील एका तीर्थाचे सन्निध अरुंधतीसह सप्तर्षि तपश्चर्या करीत असत. ते नेहमीं फळें आणण्यासाठीं हिमालय पर्वतावर जात. एके समयीं बारा वर्षें एकसारखी अनावृष्टि होऊन मोठा दुष्काळ पडला; त्या वेळीं हे सप्तर्षि अरुंधतीला आश्रमांत ठेवून फळें आणण्यासाठीं म्हणून जे हिमालयावर गेले ते तिकडेच आश्रम बांधून राहिले. इकडे अरुंधती एकटीच त्या तीर्थावर तपश्चर्या करीत राहिली असतां महादेवांनीं ब्राह्मणाचे वेषानें तिजकडे येऊन तिजजवळ भिक्षा मागितली. त्या वेळीं तिजपाशीं बोरांशिवाय कांहींच नसल्यामुळें तिनें तीं बोरेंच त्या ब्राह्मणास देऊं केलीं; तेव्हां त्यानें तीं बोरें शिजविण्यास तिला सांगितलें. त्याप्रमाणें अरुंधती तीं बोरें चुलीवर ठेवून शिजवूं लागली; व ब्राह्मण-वेषधारी महादेव तिला पुण्यकारक दिव्य कथा सांगूं लागले. याप्रमाणें सारखा बारा वर्षें

क्रम चालला होता, तरी तीं बोरें शिजलीं नाहींत व महादेवाचें कथा सांगणेंही संपलें नाहीं! बारा वर्षानंतर ऋषि परत आल्यावर महादेव त्यांस म्हणाले:--'तुमच्या तपापेक्षां अरुंधतीचें तप श्रेष्ठ आहे. आज बारा वर्षें बोरें शिजवीत निराहार राहून तिनें अत्यंत दुर्घट असें तप केलें आहे.' अरुंधतीचे विनंतीवरून महादेवानीं तेव्हांपासून या तीर्थास 'बदरपाचन' हें नांव ठेवलें आणि जो कोणी येथें त्रिरात्र व्रतस्थ राहील त्यास बारा वर्षें उपोषण केल्याचें पुण्य प्राप्त होईल, असा त्यांनीं वरही दिला.

यानंतर पुढें भारद्वाजकन्या श्रुतावती हिनें याच तीर्थावर तप केलें. ही कन्या भारद्वाजांस घृताची अप्सरेपासून झाली होती. इंद्र हाच आपणास पति मिळावा, अशी तिची फार इच्छा असून ती सफळ होण्यासाठीं तेथें उग्र तपश्चर्या करूं लागली. तिची कसोटी पाहण्यासाठीं वसिष्ठ मुनींच्या रूपानें इंद्र तेथें आला; आणि त्यानें तिजपाशीं पांच बोरें देऊन हीं मला शिजवून दे असें तिला सांगितलें. वसिष्ठांचे आज्ञेप्रमाणें तिनें बोरें भांड्यांत घालून तीं चुलीवर ठेवलीं; पण कांहीं केल्या तीं शिजेनात. आश्रमांत आणलेलीं सर्व लांकडें संपलीं; तेव्हां त्यांचे ऐवजीं ती आपले पायच चुलींत घालून बोरें शिजवूं लागली! अग्नीनें तिचे सगळे पाय व शरीरही जाळलें; तरी तिला तिळमात्रही दुःख झालें नाहीं! श्रुतावतीचा हा **विलक्षण निर्धार व तपःसामर्थ्य हीं पाहून इंद्र प्रसन्न झाला** व देवांनींही तिजवर पुष्पवृष्टि केली. ह्या देहत्यागानंतर तूं इंद्रलोकीं येऊन माझी भार्या होशील, असा तिला इंद्रानें वर दिला. त्याप्रमाणें श्रुतावती पुढील जन्मीं इंद्रभार्या होऊन इंद्रलोकीं अक्षय्य सुख भोगूं लागली. ( शल्य० अ० ४८ )

## सात्यकि व भूरिश्रवा.





अत्रि ऋषींस सोम नांवाचा एक मुलगा होता. त्या-पासून पुढें वंशवृद्धि होऊन त्यांस बुध, पुरूरवा, आयु, नहुष, ययाति, यदु, देवमीढ, शूर व वसुदेव याप्रमाणें पुत्र-पौत्रादि पराक्रमी वंशज झाले. हा वसुदेव महापराक्रमी, धनुर्धरश्रेष्ठ व युद्धांत कार्तवीर्याची बरोबरी करणारा होता. या वसुदेवास शिनीनामक पुत्र झाला. देवकाचे येथें देवकीचें स्वयंवर चालू असतां या शिनीनें तेथें जाऊन जमलेल्या सर्व राजांस जिंकिलें; व देवकी रथांत घालून तो निघाला. सोमदत्तानें त्यास अडवून त्याशीं बाहुयुद्ध केलें. पण या युद्धांत सोमदत्त चीत होऊन भूमीवर पडला असतां शिनीनें त्याची शेंडी धरून तरवार उपसली, व हजारों राजांसमक्ष त्यास लाथ मारली ! पण इतक्यांत दया आल्यामुळें त्यानें त्याचा वध न करतां त्यास जिवंत सोडलें. परंतु या जीवदानाबद्दल आनंद न वाटतां शिनीनें केलेल्या अपमानाचें दुःख सोमदत्तास फार होऊं लागलें. तेव्हां त्यानें तीव्र तप करून महादेवास प्रसन्न करून घेतलें; आणि ‘ शिनीच्या पुत्रास हजारों राजांसमक्ष लाथेनें तुडविणारा पुत्र मला दे ’ असा त्यांजपासून वरही मागून घेतला. या वर-प्रदानामुळेंच भारतीय युद्धांत सोमदत्त-पुत्र भूरिश्रवा याला अजिंक्य सात्यकीस जिंकून सर्वराजांसमक्ष लत्ताप्रहार करतां आला. ( द्रोणपर्व, अ० १४४ )

## दक्षयज्ञ-विध्वंस.






त-सृष्टि स्वतःच उत्पन्न करावी, असें मनांत आणून ब्रह्मदेव शंकरास म्हणाले कीं, ' तुम्ही प्रजा उत्पन्न करण्याचें काम पुष्कळ काळपर्यंत बंद ठेवा. ' ब्रह्मदेवाची ही विनंति मान्य करून शंकर पाण्यांत बुडून राहून तप करूं लागले. याप्रमाणें बराच काळ लोटल्यावरही शंकर वर येत नाहींत, असें पाहून ब्रह्मदेवानें मनापासून एक प्रजापति उत्पन्न केला. मज-पेक्षां कोणी श्रेष्ठ नसेल तर मी प्रजा उत्पन्न करीन, असें हा ब्रह्म-देवास म्हणाला. तेव्हां ' तुजहून श्रेष्ठ कोणीही नाहीं; शंकर श्रेष्ठ आहेत, पण ते पाण्यांत बुडून राहिले आहेत. तूं खुशाल सृष्टि उत्पन्न कर ' असें ब्रह्मदेवानीं त्यास आश्वासन दिलें. तेव्हां प्रजा-पतीनें दक्षादि सात इतर प्रजापति उत्पन्न करून त्यांचे करवीं चार प्रकारची भूतसृष्टि निर्माण करविली. पण या भूतसृष्टीचें भक्ष्य उत्पन्न झालेलें नसल्यामुळें ती प्रजापतीसच खाण्यासाठीं त्याचे अंगावर धांवली. तेव्हां प्रजापतीचे विनंतीवरून पितामहानें भूतसृष्टीचें भक्ष्य म्हणून तृण-धान्यादिक व दुर्बळ प्राण्यांचें मांसान्न उत्पन्न केलें. तेव्हां भूतसृष्टीचें समाधान झालें; व ती या भक्ष्याचा उपयोग करून स्वतःचेच सामर्थ्यानें आपापले योनीचे ठायीं प्रजो-त्पत्ति करूं लागली. कांहीं काळानें शंकर पाण्यांतून वर आले. तेव्हां ब्रह्मदेवानें प्रजा उत्पन्न केली असून ती स्वसामर्थ्यानेंच एक-सारखी वृद्धि पावत आहे, असें पाहून शंकरांस क्रोध आला; व प्रजोत्पत्तीचें कार्य स्वतंत्रपणें सुरू झाल्याचें दिसून आल्यावरून

रागाच्या आवेशांत लिंगच्छेद करून शंकर मुंजवान् पर्वतावर तपश्चर्या करण्यास निघून गेले. पुढें कृतयुगाचे अखेरीस देवांनीं वेदाचे आधारानें यागादिकर्में करण्यासाठीं यज्ञ निर्माण केला; व यज्ञांतील हविर्भाग, त्यांचीं द्रव्यें व देवता हींही ठरवून टाकलीं. यांत शंकरांस यज्ञांत मुळींच हविर्भाग ठेवलेला नव्हता. हें पाहून त्यांस अतिशय क्रोध आला; व दक्षप्रजापति यज्ञसामुग्री जमवून यज्ञ करीत असतां त्याचा विध्वंस करण्याचा त्यांनीं निश्चय केला. त्यांनीं पांच वितीचें धनुष्य तयार करून वषट्काराची दोरी त्यास लावली. हें धनुष्य घेऊन शंकर देवांचा यज्ञ चालला होता तेथें वेगानें येऊं लागतांच पृथ्वी कांपूं लागली, पर्वत विदीर्ण झाले, वारा बंद पडला, अग्नि विझाला, नक्षत्रमंडळ डळमळूं लागलें, सूर्यप्रकाश लोपला, चंद्र निस्तेज झाला व सर्व आकाश अंधकारानें व्याप्त झालें! यज्ञ-देवतांची त्रेधा उडून यज्ञपुरुष पळून जाऊं लागला. तेव्हां शंकरानीं त्याचे काळजावर तीक्ष्ण बाण मारून त्यास विव्हल केलें. तेव्हां तो मृगरूप धारण करून आकाशांत पळून गेला; तरीही व्याधरूपानें शंकर त्याचे मागें लागले. शंकरानीं सवित्याचे हात तोडले! भगाचे डोळे काढले व पुरोडाश भक्षण करणाऱ्या पूषाचे दांत पाडले! याप्रमाणें सर्व देवांची दाणादाण होऊन ते पळूं लागले असतां शंकरानीं तिरस्कारपूर्वक हास्य केलें, व धनुष्याचें टोंक दाबून सर्व देवांची हालचालही बंद केली! मग सर्व देव यज्ञपुरुषासह शंकरांस शरण येऊन दीनवाणीनें प्रार्थना करूं लागले; तोंच शंकरांच्या धनुष्याची दोरी गळून धनुष्यही नाहींसें झालें. शंकरानीं पुनरपि भगाला डोळे, सवित्याला हात व पूषाला दांत दिले, व त्यांनीं आपला क्रोध

समुद्रांत ठेवून दिला. हाच क्रोध वडवाग्निरूपानें समुद्रोदक शोषून टाकीत असतो. देवांनींही तेव्हांपासून यज्ञांत शंकरांस योग्य हविर्भाग ठरवून दिला. तेव्हां पुनः शांतता होऊन यज्ञयागादि क्रिया पूर्ववत् निर्विघ्नपणें चालूं लागल्या. ( द्रोणपर्व, अध्याय २०–२१; सौप्तिक० अ० १७–१८ )

## त्रिपुराख्यान.





प्राचीन काळीं देव–दैत्यांचा दीर्घकालपर्यंत निकराचा संग्राम होऊन दैत्यांचा बलाढ्य राजा तारकासुर याचा वध झाला; व देव विजयी झाले. पण या पराभवानें हताश न होतां तारकासुराचे तिघे पुत्र ताराक्ष, कमलाक्ष व विद्युन्माली यांनीं विजयार्थ अनेक वर्षे घोर तपश्चर्या केली. या तपानें संतुष्ट होऊन ब्रह्मदेवानीं त्यास वर देऊं केला. तेव्हां त्यानीं ‘ आपणांस कोणत्याही प्राण्यापासून केव्हांही मृत्यु येऊं नये ’ असा वर मागितला. पण अमरत्वाचा हा अनुचित व विपरीत वर देण्याचें नाकबूल करून ब्रह्मदेवांनीं या दैत्यांस परत पाठविलें. पण आपसांत खलबत करून हे तिघे भाऊ ब्रह्मदेवांकडे पुनः आले, व म्हणूं लागले:—“ तुमच्या कृपेनें तीन पुरांचा आश्रय करून आम्हीं एक हजार वर्षे भूमंडळ आक्रमण करावें; यानंतर आम्ही व आमचीं पुरें एकत्र झाल्यावर ह्या तीनही पुरांस जो देव एकच बाणानें भस्म करील, त्याजपासून मात्र आम्हांस मरण यावें; इतरांपासून आम्हांस मृत्यु येऊं नये. ” ब्रह्मदेवानीं लागलीच त्या दैत्यबंधूंस हा वर देऊन टाकला. ह्या वरप्राप्तीनें आनंदित होऊन त्या

दैत्यराजांनीं मयासुराकडून स्वतःकरतां तीन अपूर्व पुरें निर्माण करविलीं. त्यांपैकीं ताराक्षाचें सुवर्ण-पुर स्वर्गांत, कमलाक्षाचें रजत-( रुप्याचें ) पुर अंतरिक्षांत, व विद्युन्मालीचें लोहपुर पृथ्वीवर होतें. ह्या प्रत्येक पुराची लांबी-रुंदी शंभर शंभर योजनें असून राजधानींतील सर्व सुखसोई त्यांत होत्या. शिवाय हें प्रत्येक पुर जणूं एका चक्रावर बसविल्याप्रमाणें वाटेल तिकडे संचार करीत असे ! या पुरांत पुनः सर्व दैत्य जमले; व हे बंधुही मयासुराचे सल्ल्यानें चांगल्या रीतीनें राज्य करूं लागले. ह्या त्रिपुरप्राप्तीनें व ब्रह्मदेवाच्या वरानें प्रबळ होऊन हे तिघे दैत्य बंधु उन्मत्त झाले; व कृतघ्नतेनें प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचाही उपमर्द करूं लागले ! **तपश्चर्येनें वैभव व विजय हीं मिळतात हें खरें; पण प्राप्त झालेल्या या वैभवानें व विजयानें उन्मत्त न होतां पहिल्या तपश्चर्येचें सामर्थ्य आणि वैभव व विजय हीं कायम राखणें बिकट असतें.** अशीच स्थिति या दैत्यांची झाली. तारकाक्षाच्या हरिनामक पुत्रानेंही तीव्र तप करून ब्रह्मदेवापासून वर मिळविला होता. तो असा कीं, रणांत शस्त्रघातानें मरण पावलेले दैत्य आंत टाकले कीं ते सर्व पुनः जिवंत व बलिष्ठ होतील, असें मृतसंजीविनी पाणी ( विहीर ) सुवर्णपुरींत निर्माण व्हावें. ह्या वरानें तर हे दैत्य फारच अनावर होऊन ते अधिकाधिक अविचारी, लोभी, उन्मत्त, निर्लज्ज, उच्छृंखल व दुष्ट होत चालले. त्यांनीं देवांचीं उद्यानें, ऋषींचे आश्रम व पृथ्वीवरील इतर सर्व सुंदर स्थळें उध्वस्त केलीं. तेव्हां सर्व देवसैन्यासह येऊन इंद्रानें दैत्यांच्या या त्रिपुरांस चारी बाजूंनीं वेढिलें; व त्यांवर वज्रप्रहारांचा सारखा तडाखा चालविला. पण ब्रह्मदेवाच्या वरानें अभेद्य झालेल्या या पुरांवर इंद्राच्या

वज्राचा कांहींच परिणाम झाला नाहीं. तेव्हां भयभीत होऊन सर्व देवांसह इंद्र ब्रह्मदेवांकडे आला; आणि त्यांच्या वरप्रदानानें बलिष्ठ झालेल्या दैत्यांनीं त्रैलोक्यांत कसा हाःहाःकार उडविला आहे, याचें गाऱ्हाणें देवांनीं त्यांजजवळ गाइलें. पण हे तिघे दैत्यबंधु व त्यांचीं तीनही पुरें यांचा एकदम व एका बाणानें संहार करण्याचें सामर्थ्य महापराक्रमी, विजयी व रणधुरंधर श्रीशंकरांवांचून इतर कोणांतही नाहीं, करतां सर्व देवांनीं त्यांसच शरण जावें; अशी मसलत ब्रह्मदेवानीं सांगितली. तत्प्रमाणें सर्व देवांनीं श्रीमहादेवाकडे जाऊन स्तुति-प्रार्थनापूर्वक आपलें दुःख त्यांस निवेदन केलें. तेव्हां श्रीशंकर म्हणाले कीं " सुरद्वेष्टे दैत्य-दानव हे फार प्रबळ असल्यामुळें मला एकट्याला किंवा तुम्हां सर्वांना त्यांचा संहार करतां येणार नाहीं; तेव्हां माझी अर्धी शक्ति घेऊन व तींत सर्व देवांची शक्ति एकवटून तुम्ही त्यांचा नाश करा. कारण ( संघातो हि महाबला ) एकवटलेली संघशक्तिच अनिवार होते. " परंतु महादेवांची अर्धी शक्ति धारण व सहन करण्याचें सामर्थ्य कोणत्याही एकट्या किंवा सर्व देवांत नसल्यामुळें तें म्हणणें त्यांस मानवलें नाहीं. तेव्हां इतर सर्व देवांचीच निमी शक्ति स्वतःचे ठिकाणीं धारण करून दैत्यांच्या त्रिपुरांचा नाश करण्याचा श्रीशंकरानीं संकल्प केला. इतर देवांचें निमेनिमे सामर्थ्य एकवटल्यामुळें शंकरांची शक्ति वृद्धिंगत झाली. व तेव्हांपासून त्यांस 'महादेव' ही संज्ञा प्राप्त झाली त्यांचे आज्ञेवरून देवांनीं विश्वकर्म्याकडून युद्धाकरतां एक अपूर्व दिव्य रथ व शस्त्रसामुग्री तयार केली. त्यांनीं सबंध पृथ्वीमंडळाचा रथ बनविला; सूर्य, चंद्र व उदयास्त पर्वत यांचीं चक्रें केलीं, मंदराला रथाचा आंस केला;

नक्षत्रमंडळास रथाचे अलंकार केले; धर्म, अर्थ व काम यांस रथांतील बैठकी केल्या; अनेक नागांच्या दोऱ्या केल्या; इंद्र, वरुण, यम व कुबेर यांस रथाचे चार अश्व बनविले; * षड्ऋतुमय संवत्सराचें धनुष्य केलें; आणि अग्नि, सोम व विष्णु यांस अनुक्रमें कांडें, फळ व अग्र या स्थानीं योजून त्यांचा एक बाण बनविला. कालरात्रि ही धनुष्याची दोरी केली; मेरु पर्वताचा ध्वज केला; आणि विद्युद्युक्त मेघांच्या पताका बनविल्या; व ध्वजाग्रीं नंदिकेश्वराची स्थापना केली ! अशा प्रकारच्या त्या दिव्य रथांत शंकरांचें सारथ्य करण्यासाठीं प्रत्यक्ष भगवान् ब्रह्मदेव हेच बसले. नंतर श्रीशंकर स्वतः रथावर आरूढ होऊन तो चालू होतांच, सर्वत्र सुगंधित व अनुकूल वारे वाहूं लागले, गंधर्व गायन करूं लागले, अप्सरा नाचूं लागल्या, व देवांनीं आणि ऋषींनीं स्तुतिपूर्वक शंकरांचा जयजयकार केला ! थोड्याच वेळांत हा रथ अति वेगानें दैत्यांच्या त्रिपुरांचे समोर येऊन थडकला, तों नंदिकेश्वरानें एवढी प्रचंड गर्जना केली कीं, ती ऐकूनच तीनही पुरांतले हजारों दैत्य मरून पडले ! श्रीशंकरानीं आधीं धनुष्याचा नुसता टणत्कार करतांच त्यांचा रथ अंतरिक्षांतून खालीं येऊं लागला; तेव्हां विष्णूनीं वृषरूप धारण करून तो रथ वर उचलला. शंकरानीं अश्वांच्या पाठीवर व नंदिकेश्वराचे मस्तकावर उभें राहून प्रचंड सिंहनाद केला व वृषभाचे खूर द्विधा केले आणि अश्वांचे स्तन कापून टाकले. तेव्हां पासून बैलांचे पायांस गेळें उत्पन्न झालीं, व अश्वाचे स्तन नष्ट झाले. नंतर शंकरानीं वरील बाण धनुष्यास जोडून त्यास पाशुपतास्त्रानें अभिमंत्रित केलें. याप्रमाणें सज्ज होऊन कांहीं काळ

* याच अध्यायांत पुढें, चार वेदांस चार अश्व केले, असें म्हटलेलें आहे.

शंकर त्रिपुरांचें ध्यान करीत स्वस्थ राहिले. तों दैत्यांचीं तीनही पुरें एकत्र झालीं. तेव्हां आपलें दिव्य धनुष्य ओढून शंकरानीं तो अपूर्व बाण सोडला असतां तीं तीनही पुरें एकदम जमिनीवर कोसळलीं. त्यांना व त्यांतील दैत्यांना दग्ध करून शंकरानीं तीं पश्चिम समुद्रांत फेंकून दिलीं! त्रिभुवन—कल्याणार्थ व दैत्यनाशार्थ उत्पन्न झाला. त्यांचा क्रोधाग्नि जेव्हां सर्व जग व्यापूं लागला, तेव्हां तो अग्नि शंकरानींच पुनः आवरून त्रिजगताचें रक्षण केलें. याप्रमाणें कृतकृत्य झाल्यावर सर्व देव आनंदानें आपापल्या स्थानीं गेले. ( कर्ण० अ० ३३–३४ ) *

* **टीप**—हीच त्रिपुरनाशाची कथा द्रोणपर्वांत त्रोटक रीतीनें आलेली आहे. पण तेथें सुवर्ण नगर कमलाक्षाचें व रौप्यनगर तारकाक्षाचें होतें असें म्हटलें आहे. रथाच्या वर्णनांतही असाच फरक आहे. गंधमादन व विंध्य या रथाच्या पताका केल्या; मलयपर्वताचें जूं केलें, उपवेदांचे लगाम केले, ओंकाराचा चाबुक केला, मंदराचलाचें धनुष्य केलें, व वासुकीचा चाबूक केला; तसेंच विष्णूचा बाण करून त्यास अग्नीचें फळ बसविलें, वायूचे पंख केले व यमास पुच्छाचे जागीं बसविलें; आणि विजेचा निसणा केला; असें वर्णन द्रोणपर्वांतील कथेंत आहे. शिवाय या कथेचे शेवटीं असें सांगितलें आहे कीं, "हा त्रिपुरनाश पाहण्यास तेथें पार्वती आली होती; तिचे मांडीवर एक पांच शेंड्यांचें बाळक हंसत पडलें होतें. या बाळकास नमस्कार न करतां इंद्रादि देवांनीं त्याचा उपमर्द केला; एवढेंच नव्हे तर इंद्रानें त्याजवर टाकण्यासाठीं हातीं वज्र घेऊन तें उगारलें. तों तें बाळक मोठ्यानें हसलें, व इंद्राचा हात वज्रासह तसाच कुंठित होऊन राहिला! पुढें ब्रह्मदेवानें बाळकाचें खरें स्वरूप सांगतांच इंद्रादि सर्व देवांनीं येऊन पुनः त्या बाळकास नमस्कार करून त्याची प्रार्थना केली. तेव्हां तें बाळक पुनः मोठ्यानें हंसलें, व इंद्राचा कुंठित झालेला हात पूर्ववत् मोकळा झाला. श्रीशंकरानींच पार्वतीकरतां हें बाळरूप धारण केलेलें होतें." ( द्रोणपर्व, अ. २०२ )

# संवर्त व मरुत्त.





कृतयुगांत मनु हा दंडधारी राजा होऊन गेला. त्याचे वंशांत पुढें प्रसंधी, क्षुप व इक्ष्वाकु असे राजे झाले. इक्ष्वाकूला शंभर पुत्र असून त्या सर्वांस त्यानें राज्याच्या वांटण्या करून दिल्या; व वडील पुत्र विंश हा मुख्य गादीवर बसला. त्याचे मागून विविंश व खनीनेभ हे क्रमानें सिंहासनावर बसले. खनीनेभानें प्रजाजनांस अत्यंत पीडिलें; तेव्हां त्यांनीं त्यास पदच्युत करून त्याचा पुत्र सुवर्चा यास राज्याभिषेक केला. हा राजा मोठा प्रजावत्सल, सत्यवादी व धर्मशील होता. दान-धर्माचे पायीं याचा खजिना रिकामा झाल्या-मुळें मांडलिकांनीं व शत्रूंनीं त्यास व त्याचे प्रजेस फार त्रास दिला. त्याजजवळ द्रव्य किंवा सैन्य फारसें उरलें नव्हतें, तरी त्याचे शत्रूंस त्याचा वध करतां आला नाहीं. पण पुढें या धार्मिक व सदाचारी राजानें केवळ टाळी वाजवून चतुरंग सैन्य उत्पन्न केलें; आणि नगरास वेढा देऊन बसलेल्या शत्रूंस जिंकलें ! तेव्हांपासून या राजाचें ' करंधम ' असें नांव पडलें. याचा पुत्र अविक्षित् ऊर्फ कारंधम हा असून त्यानें बृहस्पतीकडून १०० अश्वमेध यज्ञ करविले. त्याचा पुत्र आविक्षित् ऊर्फ मरुत्त हा तर पित्याहूनही सर्व गुणांत श्रेष्ठ होता. यानें हिमालयाच्या उत्तर बाजूस मेरु पर्व-तावर एक सोन्याची टेंकडी होती, तेथें अनेक सोन्याचीं यज्ञ-पात्रें करवून मोठमोठे यज्ञ केले. ( आश्वमेधिक पर्व, अ० ४ )

अंगिरस् मुनि करंधमराजाचें पौरोहित्य करीत असत; त्यांचे पश्चात् त्यांचा ज्येष्ठ पुत्र बृहस्पति हा अविक्षिताचा व मरुत्ताचाही पुरोहित झाला. मरुत्त व इंद्र यांचेमध्यें मोठी स्पर्धा होती. इंद्रानें पुष्कळ प्रयत्न केला, पण त्यास मरुत्तावर ताण करतां आली नाहीं. तेव्हां त्याच्या **स्पर्धेचें मत्सरांत रूपांतर झालें**. मरुत्ताप्रमाणें इंद्राचेंही पौरोहित्य बृहस्पतीकडेच होतें. इंद्रानें बृहस्पतीस आपल्या सभेंत बोलावून आणलें; आणि बजाविलें कीं, ' मजसारख्या देवराज इंद्राचें पौरोहित्य मिळालें असतां तुम्हीं मरुत्तासारख्या मृत्युलोकच्या राजाचें देवकार्य व पितृकार्य करणें अनुचित आहे; याकरतां त्याचें पौरोहित्य सोडून द्या. तुम्हांस त्याचें पुरोहितपण करणें असेल तर माझें सोडून दिलें पाहिजे. ' याप्रमाणें इंद्राचें भाषण ऐकून, देवराजाच्या पौरोहित्याचा लोभ सुटून बृहस्पतीनें इंद्राचें म्हणणें मान्य केलें; येवढेंच नव्हे तर ' अग्नि थंड होईल, पृथ्वी पालथी होईल, रवि प्रकाश पार्डीनासा होईल, परंतु मीं सत्य सोडणार नाहीं, अशी त्यानें शपथ क्रियाही केली ! ( आश्वमेधिकपर्व, अध्याय ५ )

यानंतर मरुत्तराजानें एक मोठा यज्ञ करण्याचा बेत करून त्याची सर्व सिद्धता केली; व या यज्ञाचें ऋत्विजत्व बृहस्पतीनें ध्यावें, अशी त्यानें त्याजकडे जाऊन विनंति केली. पण त्यानीं ती साफ नाकारली. ' आपण माझे परंपरागत कुलोपाध्याय आहां. आपणास पूज्य मानून आपली भक्ति करणारा मी एक शिष्य आहें; याकरतां माझें याजन आपण केलेंच पाहिजे ' असें मरुत्त आग्रहानें म्हणूं लागला. पण बृहस्पतीनें आपला हट्ट सोडला नाहीं. ' अमरराज इंद्राचें पौरोहित्य पत्करल्यापासून, मर्त्यांचें पुरोहितपण

करावयाचें नाहीं, अशी मीं प्रतिज्ञा केली आहे. तूं वाटेल तो दुसरा पुरोहित कर. ' याप्रमाणें बृहस्पतीनें निर्वाणीचें उत्तर देऊन त्यास निरोप दिला. राजा उद्विग्न व लज्जित होऊन परत जात असतां वाटेंत त्यास नारदमुनि भेटले. त्यानीं त्याच्या खिन्नतेचें कारण विचारल्यावरून मरुत्तानें त्यांस सर्व हकीकत सांगितली. तेव्हां नारद म्हणाले.कीं, ' या बृहस्पतीचा धाकटा भाऊ संवर्त व हा यांची चुरस असून वडील भावानें फार त्रास दिल्यामुळें संवर्त हा सर्व मालमत्ता टाकून देऊन दिगंबर स्थितींत हिंडत असतो. तो तुला वाराणसी क्षेत्रांत भेटेल. त्याजकडे जाऊन तूं त्याला आपलें पौरोहित्य स्वीकारण्याची विनंति कर. ' असें सांगून, संवर्तास कसें ओळखावयाचें व त्याचें मन कसें वळवावयाचें, तेंही सर्व नारदानीं मरुत्तास निवेदन केलें.

नारदानीं सांगितल्याप्रमाणें मरुत्तराजा वाराणसीस गेला; आणि नगराचे वेशीनजीक एक प्रेत ठेवून तो दूर बसला. इतक्यांत एक दिगंबर ब्राह्मण महेश्वराचें दर्शन घेण्यासाठीं नगरांत जाऊं लागला असतां, वाटेंत प्रेत पाहतांच दचकून मागें सरला. ह्या प्रकारावरून संवर्त तो हाच, असें मरुत्तानें ओळखलें, व तो जिकडे जाईल तिकडे राजा त्याचे मागोमाग जाऊं लागला. संवर्तानें त्याचे अंगावर धूळ व चिखलच काय पण थुंकी व शेंबूड यांचाही वर्षाव केला ! तरी तिकडे लक्ष न देतां तो तसाच संवर्ताचा पाठपुरावा करूं लागला. अखेर संवर्त एका विस्तीर्ण व गर्द छायेच्या वटवृक्षाखालीं थांबला. ' तूं मला कसें ओळखलेंस किंवा मी अमुक म्हणून तुला कोणीं सांगितलें तें खरें सांग. खरें बोलशील तर तुझें कल्याण होईल, खोटें बोलशील तर तुझ्या मस्तकाचे शतशः

तुकडे होतील.' याप्रमाणें संवर्तानें प्रश्न विचारला असतां नारदांनीं शिकविल्याप्रमाणें मरुत्तानें उत्तर दिलें कीं, 'नारदानीं मला हें सर्व सांगितलें; व हें सांगून लागलीच त्यांनीं अग्निप्रवेश केला.' याप्रमाणें सांगून मरुत्तानें आपला मनोदय संवर्तास निवेदन केला. परंतु राजाचें पौरोहित्य पत्करण्यास संवर्त कबूल होईना. 'मी असा वायूनें वेड लागून वाटेल तिकडे भटकत हिंडत असतों; मला कशाला यज्ञाचें काम सांगतोस? बृहस्पति हा थोर व इंद्राचा आश्रित असून त्यास यज्ञकर्माचा सरावही आहे, त्याजवरच तूं हें काम सोंपीव. त्यानें माझे यजमान, माझ्या गृहदेवता व माझें घरदार हिरावून घेऊन मला माझें हें शरीर मात्र शिल्लक ठेविलें आहे. तथापि तो वडील भाऊ असल्यामुळें मला पूज्यच आहे; त्याची अनुमति असल्याखेरीज मला तुझें याजन करतां येत नाहीं.' अशा सबबी सांगून संवर्त टाळाटाळ करूं लागला. पण इंद्राची व आपली प्रतिस्पर्धा, इंद्राचा आश्रय मिळाल्यामुळें आपल्यासारख्या मर्त्य राजाचें यज्ञकर्म करण्याचे बाबतींत अवमानपूर्वक बृहस्पतीनें दिलेला नकार, वगैरे सर्व हकीकत मरुत्तानें संवर्तास निवेदन केली; तेव्हां मात्र तो यज्ञ करण्यास तयार झाला. तथापि त्यानें मरुत्तास बजावलें कीं 'मी तुझा यज्ञ करूं लागलों कीं इंद्र व बृहस्पति हे रागावून तुझा द्वेष करूं लागतील; याकरतां तुला फार जपलें पाहिजे. मला राग न येतां माझें चित्त नेहमीं स्थिर राहील, असें वर्तन तुम्हीं सर्वांनीं ठेवलें पाहिजे. कारण मला राग आल्यास तुम्हां सर्वांचा नाश होईल.' ही शर्त मरुत्तानें आनंदानें मान्य केल्यावर संवर्तास समाधान झालें. 'मला तुझ्या द्रव्याची मुळींच इच्छा नाहीं; पण इंद्राचे वर सरशी करण्याचे कामीं साहाय्य

करून मी तुला इंद्रतुल्य बनवीन, आणि इंद्र व बृहस्पती यांचें अप्रिय करीन. तुझा कोश केव्हांही रिकामा न होतां सदैव अक्षय्य राहील ' असाही संवर्तानें मरुत्त राजास वचनपूर्वक आशीर्वाद दिला. (आश्व० अ० ६–७) नंतर संवर्ताचे सांगण्याप्रमाणें मरुत्त मुंजवान् पर्वतावर गेला. हा पर्वत हिमालयाचे पृष्ठभागीं आहे, त्याचे सर्व बाजूंतून सुवर्णाचे प्रवाह निघत असून शस्त्रधारी कुबेरानुचर त्याचें संरक्षण करीत होते. या मुंजवान् पर्वतावर श्रीशंभु उमेसह नानाप्रकारची क्रीडा करीत. या पर्वतावर विशेष उष्णताही नाहीं व थंडीही नाहीं, सूर्याचें प्रखर ऊनही नाहीं व मोठा वाराही नाहीं, भूक नाहीं, तहान नाहीं, जरा नाहीं, मृत्यु नाहीं व कसलें भयही नाहीं, ! अशी स्थिति होती. या पर्वतावर येऊन मरुत्तानें संवर्तानें सांगितल्याप्रमाणें महादेवाची स्तुति केली; आणि नंतर तेथील सुवर्णाचा उपयोग करून यज्ञासाठीं दिव्य यज्ञपात्रें व इतर साहित्य तयार केलें.

देवांसही अलभ्य अशी ही मरुत्ताची समृद्धि पाहून बृहस्पतीस विषाद वाटूं लागला; आणि तो तेजोहीन व कृश होत चालला. ' आतां आपला दायाद जो संवर्त तो आपणाहूनही श्रीमान् होईल ' अशी त्याचे मत्सरी मनास बोंचणी सुरू झाली. ( आश्व० अ० ८ ) तुम्हांस सर्व कांहीं गोष्टी अनुकूळ असतांही तुम्ही विषण्ण व उद्विग्न कां असतां, अशी इंद्रानें बृहस्पतीपाशीं चौकशी केली. तेव्हां बृहस्पतीनें सांगितलें, कीं मरुत्तराजा महायज्ञ करणार असून हें यज्ञकर्म तो माझा दायाद संवर्त याचे हस्तें करणार आहे व या प्रसंगीं तो अपरिमित दक्षिणा देणार आहे. तर कसेंही करून मरुत्त हा यज्ञ करणार नाहीं, निदान संवर्ताकडे

याजनकर्म देणार नाहीं, असें कर.' अमरराज इंद्राचें पौरोहित्य मिळाल्यावर त्यांतच संतुष्ट राहण्याचें सोडून बृहस्पति मरुत्ताचे व संवर्ताचे वाटेस कां जात आहे, याचें इंद्रास गूढ पडलें; पण यावर बृहस्पतीनें उत्तर दिलें कीं, 'तुला स्वर्गराज्य मिळालें असून तुझा तरी असुरांवर—विशेषतः जास्त भरभराटींत असतात अशांवर—येवढा कटाक्ष कां? व तूं त्यांशीं युद्ध करून त्यांस ठार कां मारतोस? याचें कारण येवढेंच कीं,

दुःखं सपत्नेषु समृद्धभावः।

शत्रूची भरभराट पाहून दुःख वाटणें हा मनुष्य-स्वभावच आहे.' बृहस्पतीचें हें भाषण ऐकून इंद्र निरुत्तर झाला. त्यानें बृहस्पतींतर्फे अग्नीला मरुत्ताकडे पाठवून असा निरोप कळविला कीं, 'तूं महायज्ञ करतोस हें ठीक आहे. या कामीं बृहस्पती तुझें याजन करील, येवढेंच नव्हे तर तुला अमरही करील.' इंद्राचे आज्ञेवरून हा निरोप घेऊन अग्नि, अरण्यें व मोठमोठे वृक्ष जाळीत व वाऱ्याप्रमाणें सोसावत मरुत्ताकडे आला, व त्यानें इंद्राचा निरोप त्यास निवेदन केला. पण मरुत्तानें उत्तर दिलें कीं, 'बृहस्पति हे अमरराज इंद्राचे याजन आतां करूं लागले आहेत; त्यांनीं माझ्यासारख्या मर्त्याचें पौरोहित्य केल्यास तें शोभणार नाहीं.' यावर अग्नि पुनः पुनः आग्रहपूर्वक तोच निरोप सांगून मरुत्तास स्वर्गसुखाची, कीर्तीची, किंबहुना देवराज्याचीही लालूच दाखवूं लागला. तेव्हां संवर्तानें रागानें अग्नीला बजावलें कीं, 'तूं पुनः असला निरोप घेऊन इकडे येशील तर मी आपल्या तीव्र दृष्टीनें तुलाच दग्ध करून टाकीन.' कडकडित ब्रह्मचारी असलेल्या कोपिष्ठ संवर्ताचें हें भाषण ऐकून अग्नि भयभीत होऊन

परत गेला; व त्यानें हा सर्व प्रकार इंद्रास कळविला. तेव्हां इंद्रानें धृतराष्ट्रनामक गंधर्वाचे तोंडीं मरुत्तास पुनः असा निरोप पाठविला कीं, बृहस्पतीस आपल्या यज्ञकर्मांतील पुरोहितपणा मुकाट्यानें दे, नाहीं तर मी तुजवर वज्रप्रहार करीन! धृतराष्ट्रानें येऊन हा निरोप मरुत्तास सांगितला; परंतु या धमकीनेंही त्याचा निश्चय ढळला नाहीं..' बृहस्पतींना इंद्राचेंच याजन करीत राहूं दे; माझें याजन हा संवर्तच करील. संवर्तास सोडून मीं आतां हें यज्ञकर्म बृहस्पतींस दिलें तर तो मित्रद्रोह होईल.

मित्रद्रोहे निष्कृतिर्नास्ति लोके ।
महत्पापं ब्रह्महत्या समं तत् ॥

मित्रद्रोह हें पातक ब्रह्महत्येसमान असून त्यांतून पातक्याची कदापि मुक्तता होत नाहीं.' असें मरुत्तानें धृतराष्ट्रास स्पष्ट उत्तर दिलें. इतक्यांत जोराचा वारा सुटून आकाशांतून गर्जना करीत व वज्र सरसावीत इंद्रही मरुत्ताकडे येऊं लागला; तेव्हां मात्र त्यास भीति वाटून तो संवर्ताजवळ आला. संवर्तानें त्यास अभयपूर्वक धीर दिला कीं, ' केवढाही वारा सुटो कीं मुसळधार पाऊस पडो; मेघांचा गडगडाट होवो कीं त्यांत पोहणारें इंद्रवज्र दाही दिशांनीं चमकून त्याचा तुजभोंवतीं गराडा पडो; तूं मुळींच भिऊं नको. मी स्तंभिनी विद्येचे योगानें इंद्रासह सर्व देवांस व त्यांचे आयुधांस जागचे जागीं खिळून टाकीन, किंवा मी स्वतःच वायुरूप धारण करून या वज्राचा नाश करीन. ' पण इतक्यांत मरुत्तानें संवर्तापाशीं असा वर मागितला कीं, इंद्र व इतर देव यांनीं स्वतः माझे यज्ञांत हजर राहून प्रत्यक्ष सोमप्राशन करावें. मरुत्ताचें हे म्हणणें मान्य करून संवर्तानें एक तांबड्या रंगाचा व एक चित्र-

विचित्र रंगाचा अशा दोन वृषभांचें अग्नीस समर्पण करून मंत्रांनीं आवाहन करतांच इंद्रासह सर्व देव तेथें आले; येवढेंच नव्हे तर संवर्ताचे आज्ञेवरून इंद्रानें त्या यज्ञांत सर्वोपदेष्टयाचें व सदस्याचें काम केलें, व इतर देवांनींही यज्ञाची बाकीची सर्व व्यवस्था ठेविली. किंबहुना गंधर्वांचीं गायनें व अप्सरांचीं नृत्यें यांनीं त्या यज्ञास प्रत्यक्ष स्वर्गाचीच शोभा आली. संवर्ताचे आवाहनाप्रमाणें इंद्र व इतर देव यांनीं क्रमानें तेथें प्रत्यक्ष सोमपान करून मरुत्तास संतुष्ट केलें. * ( आश्व० अ० ९-१० )

## उत्तंक व श्रीकृष्ण.





भारतीय युद्धानंतर धर्मराजा व इतर आप्त-स्वकीय यांचा निरोप घेऊन सुभद्रेसह श्रीकृष्ण द्वारकेस परत जात असतां त्यांचा रथ सपाट मरुधन्व प्रदेशांत आला; त्या वेळीं उत्तंकऋषि त्यांस भेटले. कौरव-पांडवांचे मध्यें मध्यस्थी करून युद्धाचा व भयंकर रक्तपाताचा प्रसंग श्रीकृष्णानीं टाळला असावा, अशी उत्तंकांची समजूत असल्यामुळें ते त्यांस तसे प्रश्न करूं लागले. पण श्रीकृष्णांचे तोंडून, सर्व कौरवांचा व पांच पांडवांखेरीज इतर सर्व पांडवपक्षीयांचा युद्धांत संहार झाला, असें जेव्हां समजलें तेव्हां त्यांस फार क्रोध येऊन ते श्रीकृष्णांस शापही देण्यास उद्युक्त झाले! उभयतांचा समेट करण्याचें किंबहुना उभयतांसही युद्धापासून परांङ्मुख करण्याचें श्रीकृष्णांस सामर्थ्य असू-

* मंत्रपुष्पांतील शेवटचा श्लोक-' मरुतः परिवेष्टारो मरुत्तस्यावसन् गृहे । आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासद इति ' ह्याच कथेस अनुलक्षून आहे, हें सांगणें नकोच.

नही, त्यानीं मुद्दाम युद्धाचा प्रसंग आणून कौरवपक्षीयांचा नाश केला असावा, अशी उत्तंकांस शंका असल्यामुळेंच त्यांस फार संताप आला होता. पण श्रीकृष्णानीं सर्व हकीकत सविस्तर सांगून कौरवांचें अधर्माचरण व दुष्टपणा त्यांस यथास्थित निवेदन केला; आणि त्यांस म्हटलें कीं, 'तुम्हांसारख्या तपोनिष्ठांनीं विनाकारण व विचार न करतां रागावून शाप देण्यास प्रवृत्त होणें चांगलें नाहीं. त्यानें माझें तर कांहीं वाईट होणार नाहींच, पण तुमच्या मात्र तपाचा क्षय होईल.' याप्रमाणें बजावतांच उत्तंकांचा क्रोध शांत झाला; त्यांचे विनंतीवरून श्रीकृष्णानीं अर्जुनास दाखविलें होतें तसें विश्वरूप त्यांस दाखवून वर देऊं केला. 'मरुधन्व प्रदेशांत पाणी फार दुर्मिळ असल्यामुळें मी इच्छा करीन तेथें पाणी उत्पन्न व्हावें' असा उत्तंकानीं वर मागितला व तो श्रीकृष्णानींही दिला.

पुढें कांहीं दिवसांनीं उत्तंक मरुप्रदेशांत हिंडत असतां त्यांस तहान लागली; तोंच त्यांस श्रीकृष्णाच्या वराचें स्मरण झालें. इतक्यांत तेथें, बरेचसे कुत्रे बरोबर घेऊन एक मांग आला. त्याचें सर्व अंग चिखलानें व धुळीनें भरलें असून तो दिगंबर होता. तो फार उग्र दिसत असून त्याचे कमरेस तरवार व हातांत धनुष्य-बाण होते; आणि त्याचे पायापासून पुष्कळसें पाणी वाहत होतें! उत्तंकांस पाहतांच हा मांग हंसत हंसत त्यांस म्हणाला:—'उत्तंका, तुला तहान लागलेली पाहून मला तुझी दया येत आहे. इकडे ये, व हें पाणी पी.' जातीच्या या चांडाळानें आपलें पायवणी आपल्यासारख्या ब्राह्मणास पिण्यास सांगावें, याचा उत्तंकांस फार राग आला; व त्यांनीं पाणी न पितां, श्रीकृष्णानीं आपणांस अशा रीतीनें फसविलें असावें असें मनांत आल्यामुळें उलट

त्या मांगाचा फारच धिक्कार व निर्भत्सना केली. इतक्यांत तो मांग व त्याचे कुत्रे एकदम गुप्त झाले ! हें पाहून उत्तंक फारच खजिल झाले. इतक्यांत श्रीकृष्णही तेथें आले; त्यांनीं उत्तंकास पडलेल्या या गूढाचा असा उलगडा केला:—‘ तुजकरतां मी उदकच नव्हे तर उदकरूपानें अमृतच देण्याचें योजून इंद्रास तशी आज्ञाही केली होती. परंतु मर्त्यास अमृत पाजून अमर करण्यास तो तयार होईना. अखेर आम्हीं आपसांत असें ठरविलें कीं, इंद्रानें मांग-रूपानें तुजकडे येऊन पायवणीचे रूपानें तुला अमृत पिण्यास द्यावें. त्याप्रमाणें तो तुजकडे आला असतां तूं त्यास ओळखलें असतेंस तर तुला अमृतपान घडलें असतें; पण तूं त्याचा उलट धिक्कार केल्यामुळें तुला त्याची प्राप्ति झाली नाहीं. असो; यापुढें तूं जेव्हां पाण्याची इच्छा करशील तेव्हां जलपूर्ण मेघ येऊन तुला उदक देतील व तुजवरूनच या मेघांस ‘ उत्तंकमेघ ’ असें नांव पडेल. ’ याप्रमाणें श्रीकृष्णाचा वर मिळाल्यामुळें उत्तंकास आनंद झाला. हे उत्तंक मेघ अजूनही मरुदेशांत पर्जन्यवृष्टि करीत असतात. ( आश्व० अ० ५३–५५ )



# श्रीरामचरित्र.

( रा. ब. चिं. वि. वैद्य यांनीं लिहिलेलें. )

**श्रीमत् वाल्मीकि रामायण हा ग्रंथ** आर्यांचे वाङ्मयांतील **श्रेष्ठ ग्रंथांपैकीं** एक आहे व **महाभारताप्रमाणेंच** तो भारतीय वाचकांस अत्यंत **प्रिय** व पूज्य आहे या पुस्तकांत प्रथम उपोद्-घातांत **रामायण ग्रंथाची** व **रामकथेची थोरवी** थोडक्यांत सांगून पुढें **वाल्मिकींनीं** रामायणांत वर्णिलेली **रामकथा** दिलेली आहे. **गोष्ट** व **वर्णनें** मूळ ग्रंथांत जशीं आहेत तशींच दिली असून, एकदोन ठिकाणें खेरीज करून बाकीच्या सर्व **कल्पना** कवीच्याच आहेत. पुस्तकाचे शेवटीं लहानसा **उपसंहार** जोडून त्यांत **रामकालीन स्थिति** व **रामचरित्राचें रहस्य** यांचें लहानसें **शब्दचरित्र** रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. ग्रंथाची **भाषा** व **विषयविवेचनशैली** स्त्री-पुरुषांस सहज समजण्यासारखी **सुलभ** व **सरळ** आहे. सारांश, हें पुस्तक सर्व दर्जाच्या व वयांच्या मराठी वाचकांस अत्यंत **बोधपर** व **वाचनीय** असेंच आहे. पुस्तकांत एकंदर **२३** निरनिराळ्या प्रसंगांचीं अत्यंत **मनोहर चित्रें** दिलीं असून त्यांतील **५ चित्रें रंगित** आहेत. पुस्तकास **अन्टीक कागद** वापरला असून त्याचीं पानें क्राऊन षोडशपत्री सुमारें ३०० आहेत. बाइंडिंग **मजबूत** व सुंदर आहे. किं. अवघी १ रुपया.

